## शरत्साहित्यमाला

| | |
|---|---|
| श्रीकांत भाग १ ते ४ | ६–०–० |
| देवदास आणि बिंदूचें बाळ | ४–०–० |
| गांवगंगा | १–८–० |
| भैरवी | ३–०–० |
| काशीनाथ | १–८–० |
| माधवी | १–८–० |
| विजया | ३–८–० |
| चंद्रमान, दर्पचूर्ण, हेमांगिनी | ३–०–० |
| चार मिनार | १–८–० |
| विराज वहिनी | १–८–० |
| ब्राह्मणाची मुलगी | २–०–० |
| विप्रदास | ४–०–० |
| परिणीता | ३–१२–० |
| पंडित महाशय | १–१२–० |

## नाथमाधवमाला

| | |
|---|---|
| वीरधवल | ६–०–० |
| ( शालेय ) | १–२–० |
| डॉक्टर कादंबरी | ६–०–० |
| सोनेरी टोळी | ५–०–० |
| देशमुखवाडी | ४–८–० |
| विमलेची ग्रहदशा | ३–०–० |
| विहंगवृंद | ३–०–० |
| शिवाजी महाराजांचें-आरमार अथवा सांवळ्या तांडेल | २–०–० |
| ( शालेय ) | १–२–० |
| सुहासिनी | २–८–० |
| हेमचंद्र रोहिणी | १–८–० |
| दोन भावंडें | १–८–० |
| ( शालेय ) | –१२–० |
| मराठ्यांचा आत्मयज्ञ | १–८–० |
| जातिवंत मराठा वीर | १–८–० |

पुढील प्रकाशन :

# चरित्रहीन

डॉ. शरच्चंद्र चतर्जी

यांच्या कादंबरीचा अनुवाद

पृष्ठे ५०० किं. ४ रु.

# १

कृष्णप्रिया ब्राम्हणीनं गंगेच्या पाण्यांत गळ्यापर्यंत खोल उतरून डोळे आणि कान बंद करून तीनदां बुडी मारली आणि मग आपल्या पितळेच्या कळशींत पाणी भरतां भरतां म्हणाली,

" एखाद्याचं फुटकं नशीब असलं म्हणजे अस्सं होतं !"

गंगेच्या घाटावर आणखीहि तीन चार स्त्रिया स्नान करीत होत्या. ब्राह्मणीचे ते शब्द ऐकून आश्चर्यचकित मुद्रेनं त्या तिच्याकडे पाहूं लागल्या. एवढ्याशा गोष्टीवरून भांडण उकरून काढणाऱ्या कृष्णाब्राम्हणीला धैर्य धरून वास्तविक प्रकार काय आहे हें विचारायची छाती कुणाचीच होत नव्हती. शिवाय घाटावर ज्या स्त्रिया होत्या त्या सगळ्या कृष्णाब्राम्हणीपेक्षां वयानं लहान; त्यामुळें तिच्याशीं बोलायला त्या जास्तच घाबरत होत्या.

" म्हणूनच म्हणतें, बिन्दू, कीं, एकाद्याचं फुटकं नशीब असलं म्हणजे अस्सं होतं, बरं."

ज्या बाईला उद्देशून ब्राम्हणी बोलत होती त्या भाग्यवतीचं नांव बिन्दुवासिनी असं होतं. बिन्दु मोठ्या घरची मुलगी होती आणि मोठ्याच्याच घरीं पडली होती. या वेळीं ती आपल्या बापाकडे माहेरीं आली होती.

ती गोष्ट आपणाला उद्देशून सांगण्यांत आली आहे हें बिन्दूच्या लक्ष्यांत येतांच तिनं विचारलं,

" काय झालं, आत्या ?"

" अग, त्या हारान मुकर्जींची गोष्ट आठवली बघ. देव तरी किती निष्ठुर आहे, पाहा ! अग, जसं कांहीं त्या लोकांचे शेंडीचे केस पकडून त्यांना तो

सारखा पाण्यांतच बुडवतो आहे ! ”

हारान मुकर्जींच्या फुटक्या नशिबाविषयीं ब्राह्मणी चर्चा करते आहे हें आतां बिन्दूला समजून चुकलं. तिलाही पण वाईट वाटलं. हारान मुकर्जींचा पांच–सहा वर्षांचा मुलगा नुक्ताच एक महिन्यापूर्वी मृत्युमुखीं पडला होता. त्याची आठवण होऊन बिन्दूनं म्हटलं :

“ अग, आत्या, ह्या गोष्टी का मनुष्याच्या हातच्या आहेत ? देवानं ओढून नेलं, त्याला माणसांनीं काय करावं ? आणि शिवाय जन्म–मृत्यु कुणाला चुकले आहेत ? ”

बिन्दु काय म्हणते आहे हेंच पहिल्यांदा कृष्णाब्राह्मणीच्या लक्षांत येईना, परंतु कांहीं वेळानंतर आठवल्यासारखं करून म्हणाली :

‘ हां, हां, बिचाऱ्याचा मुलगा गेला ! एकच महिना झाला. अग, पण बिन्दु, मी म्हणतें ती ती गोष्ट नव्हे. मारणं आणि तारणं या गोष्टी देवाच्याच हातांतल्या. परंतु हें––असं वाटतं......बरं, तूं आणखीन् कांहीं ऐकलं आहेस का, मुली ? ”

यावर बिन्दुवासिनीनं कांहींच उत्तर दिलं नाहीं. ती तशीच स्तब्धतेनं तिच्या तोंडाकडे पाहात होती.

ब्राम्हणीनं परत विचारलं :

‘ हारान मुकर्जींच्या-विषयीं दुसरं कांहींच तुझ्या कानावर आलं नाहीं अजून ? ”

“ काय घडलंय दुसरें आणखी त्याच्या घरीं, आत्या ? ” बिंदूनें विचारलं.

“ आहा ! म्हणूनच मी म्हणत होतें, मुली, देवाचा एकदां कोप झाल मग काय होईल काय नाहीं कुणी सांगावें ? परंतु हारान मुखर्जीला काय त्याचं ? त्या काळतोंड्याविषयीं का कष्ट होतात मनाला ? कष्ट होतात माझ्या सोन्यासारख्या सुनेला पाहून. त्याच्या बायकोकडं पाह्यलं म्हणजे उर कसं भरून येतं ! त्या नीचाच्या घरीं पडल्यानंतर त्या बिचारीला एक दिवसही सुख कसं तें लाभलं नाहीं. ”

बिंदु पूर्वी ज्याप्रमाणें तिच्या तोंडाकडे पाहात उभी होती तशीच ती आतांही पण उभी राहिली. तिच्या लक्षांत ब्राम्हणीच्या म्हणण्याचा आशय कांहीं येईना. खरा प्रकार काय आहे ह्याविषयीं तिला अंदाज करितां आला नाहीं. तरी पण ब्राम्हणीनं सांगितलेली गोष्ट कांहीं वायां गेली नाहीं. ज्या धोरगानं आणि मतलबीपणानं गोष्टीचं मूळ न सांगतां फक्त शाखा–उपशाखांविषयींच ती बोलत होती, तें तिचें धोरण तडीस गेलं. घाटावर जितक्या स्त्रिया जमल्या होत्या त्यांच्यामध्यें ही गोष्ट वाऱ्यासारखी पसरली आणि त्यांच्या कुतूहलाला आणि विस्मयाला सीमा राहिली नाहीं. प्रत्येक जण आपल्याशींच विचार करीत होती: हारान मुकर्जीच्या घरीं अशी कुठली गोष्ट घडली कीं ती साऱ्या गांवाला माहीत आहे आणि आपल्यालाच तेवढी कळली नाहीं ?

पुष्कळ वेळ विचार केल्यानंतर बिंदु म्हणाली, "आत्या, झालं आहे तरी काय, हें नीट सांगशील मला ?"

"कां नाहीं सांगणार, मुली ? पण गोष्ट कांहीं चांगली आनंदाची नाहीं. म्हणूनच सांगण्याची इच्छा होत नाहीं. बघ, त्या गोष्टीचा विचार मनांत आला कीं हृदयांत कसंसंच होऊन जातं. कालवाकालव होते सारखी. आहा! अशा सुंदर आणि सुलक्षणी मुलीच्या नशिबींदेखील देवानं एवढा त्रास लिहिला असेल ह्याची कल्पनासुद्धां करवत नाहीं. देवा रे देवा!!"

"कसला त्रास ?"

"त्रास काय, एकाच प्रकारचा आहे ? किती त्रास, किती यातना, किती प्रकारचे कष्ट ...काय–काय सांगूं तुला ?"

"तरी पण सांग ना, आत्या."

"नाहीं. आतां नको. कुठलीच गोष्ट लपून राहाणार नाहीं. मग सगळींच ऐकतील– आतांपर्यंत ऐकलंही असेल म्हणा. कांहींजणांनीं आधीं ऐकलं असेल, कांहीं नंतर ऐकतील– तुम्हां सगळ्यांनाही पण कळल्याशिवाय रराहाणार नाहीं."

"पण तूंच सांग ना."

"नाहीं ग बाई, मी कांहींच सांगणार नाहीं. दुसऱ्यांच्या गोष्टींत मन घालायचं नाहीं आणि पडायचं पण नाहीं, असा मी निश्चय केला आहे."

तें ऐकून बिन्दूनं हसून म्हटलं : पण आत्या आम्हीं तुला दुसरे का आहोंत ? मला सांगितल्याशिवाय राहणार नाहीस, अशी खात्री आहे माझी."

"बिन्दू, तर काय, मग गंगेच्या पाण्यांत उभी राहून मी खोटं बोलेन,, अशी का तुझी समजूत ?"

"खोटं कसं ? आणि मी तुला खोटं बोलायला सांगते आहे का ?"

"तर मग मी कशी सांगूं बरं ? आतांच नाहीं का गंगेच्या पाण्यांत उभी राहून मी म्हटलं, आतां यापुढं मी दुसऱ्याच्या गोष्टींत पडणार नाहीं म्हणून. तर मग मी ती गोष्ट कशी सांगेन तुला ?"

कलहप्रिया कृष्णाब्राम्हणी निघून गेल्यानंतर सगळ्याच जणी एकमेकींच्या तोंडाकडे टकमका पाहूं लागल्या. कुणाच्याही लक्षांत येईना. आणि शिवाय गोष्ट सांगतां सांगतां तशीच मधून निघून गेलेली कृष्णाब्राम्हणीला अजूनपर्यंत कुणीही पाहिलं नव्हतं. कुठलीही गोष्ट अर्धवट सांगून आणि लपवून ठेवून जाणं ब्राम्हणीच्या स्वभावाच्या विरुद्ध होतं.

स्नान आटोपल्यानंतर सगळ्याजणी आपापल्या घरीं निघून गेल्या.

घरीं आल्यानंतर कपडे बदलून बिन्दु आपल्या आईपाशीं येऊन बसली. तिच्या आईनं म्हटलं :

"बिन्दु, एवढा वेळ पाण्यांत डुंबत राहणं चांगल नाहीं. उद्यां आजारी पडलीस तर ?"

"तर काय होईल ? आजारी पडलेंच तर दोन दिवस भोगून घेईन."

"हो, खरंच कीं." बिन्दुच्या आईनं हंसून म्हटलं, "एवढीशी तर गोष्ट त्याची कशाला एवढी चिन्ता ?"

"आई, हारान मुकर्जीच्या घरीं पुन्हां काय झालंय ग ?"

"कुठं काय झालं आहे ?"

"आज घाटावर कृष्णा आत्या पुसट पुसट बोलली त्यावरून त्याच्या घरीं आणखी कांहीं तरी नवीन संकट उपस्थित झालं आहे. तुला कांहींच माहीत नाहीं का ? तुझ्या कानांवर कांहींच आलं नाहीं ?"

" मी कांहींच ऐकलं नाहीं आणि मला कांहीं ठाऊक पण नाहीं. काय म्हणत होती कृष्णा ? "

" कृष्णा आत्या म्हणत होती, 'देव हारान मुकर्जीची शेंडी धरून त्याला सारखा पाण्यांत बुडवतो आहे! परंतु त्या काळतोंड्याविषयीं का कुणाला वाईट वाटतं.? दुःख होतं तें त्याच्या सोन्यासारख्या सुंदर बायकोकडे पाहून.' ती स्वढंच बोलली आणि पुढं म्हणाली, 'मी आतां दुसऱ्यांच्या भानगडींत पडायचं सोडून दिलं आहे. "

" ब्राह्मणीला इतक्या दिवसांनंतर शहाणपण सुचलं म्हणायचं? "

" खरंच का, आई, तुला कांहींच माहित नाहीं ? "

" मला कांहींच माहित नाहीं, बिंदू. "

" तर मग आज दुपारीं मी त्याच्या घरीं जाऊन येतें. "

" कशाला ? त्यांच्यावर काय प्रसंग ओढवला आहे, हें काढून घेण्यासाठीं? "

" हो. "

" तुला वेडबिड तर नाहीं ना लागलं ? ज्या गोष्टींत त्यांनीं मन घालायचं नाहीं असं ठरवलंय ती गोष्ट समजून घेऊन तूं काय करणार आहेस ? "

" त्यांनीं म्हणजे कुणी ? "

बिन्दूच्या आईनं थोडसं इकडं–तिकडं करून म्हटलं :

" त्याच कृष्णाब्राम्हणीनं. "

" कृष्णाब्राम्हणीचा कित्ता का आपणाला गिरवायचा आहे ? आणि तिनं जें केलं नाहीं तें आपण करूं नये, असं थोडंच आहे ? "

"होय. अशा सगळ्या गोष्टींत तिचाच कित्ता एक प्रकारें गिरवावा, असं मानायला कांहींच हरकत नाहीं. "

" कांहीं का असेना; मी जाणारच. "

" दुसऱ्याच्या गोष्टींत आपण पडूं नये हेंच चांगलं. "

" बरं. आई, कुणी जर पाण्यांत बुडून मरत असलं तर दुसऱ्यांच्या गोष्टींत आपण पडूं नये असं म्हणून त्याला वांचविण्याचा प्रयत्न न करणं चांगलं का ? "

" परंतु तू तर त्यांना वांचविण्यासाठीं त्यांच्या इथं जात नाहींस, बिन्दू."

" म्हणून काय झालं ? आणि कोण बुडतं आहे हें समजलं तर वांचवायला देखील जाईन मी."

बिंदूच्या आईनं कांहीं वेळ स्तब्ध राहून म्हटलं,

" बिंदू, त्यांच्या घरीं जाण्याची तुला जरूर नाहीं. हारान मुकर्जी हा चांगला माणूस नाहीं. तुझ्या वडिलाचं आणि त्याचं वैर आहे. त्याच्या घरीं जाणं तुला शोभून दिसेल का ?"

" हारान मुकर्जी हा चांगला माणूस नाहीं हें मला माहीत आहे; परंतु त्याच्याकडे कुठं मी जातें ? मी त्याच्या बायकोकडं जातेंय्. त्याच्या बायकोकडे जाण्यांत तर कसलाच दोष नाहीं ना ? एवढ्या सगळ्या बोलण्यावरनं मला स्पष्ट दिसून येतंय कीं त्यांच्यावर कुठली तरी आपत्ति ओढवली आहे खास. आणि अशा वेळीं आपण शेजारींच राहून त्याच्याकडं न जाणं हें तरी शेजारधर्माला शोभून दिसेल का ? उद्यां ही गोष्ट माझ्या सासरीं कळली तर ते माझं तोंडसुद्धां पाहणार नाहींत!"

" तुझ्या सासरचीं माणसं तुझं तोंड पाहणार नाहींत, असं म्हणतेस, तर काय वस्ती–वस्तींतून हिंडून प्रत्येकाच्या घरीं काय चाललं आहे हें पाहून ठेवण्यासाठीं अघोरनाथनीं तुला बजावलं आहे ? आणि शिवाय मी इथं तुझी प्रत्यक्ष आई तुला सांगत आहे कीं त्यांच्या इथं जाऊ नकोस. तर त्याचं तुला कांहींच वाटत नाहीं ?"

" आई, मला जावंच लागेल."

" जाऊन काय करणार ? हारान मुकर्जीवर कसलं संकट आलं आहे हें त्याच्या घरीं सुद्धां कुणाला माहीत नाहीं."

" मग तुला हें कसं माहीत झालं ?"

" — तुझ्या वडिलांच्याकडून."

" मग हारान मुकर्जीवर कसली आपत्ति ओढवली आहे, तें तरी सांग."

" नन्दीबाबूंच्या हिशोबांतला पैसा खाल्ल्याबद्दल त्या लोकांनीं त्याला पोलिसाच्या हवालीं केला आहे."

" नन्दीबाबू कोण ? "

" ब्राह्मणपाड्याचे जमीनदार. त्यांच्या कचेरींत हारान मुकर्जी नौकरी करीत होता. "

" किती रुपयांची चोरी केली आहे त्यानं ?"

" जवळ जवळ दोनशें रुपयांची. "

" कुणीच जामीन नाहीं राहिलं त्याला? "

" कोण जामिन रहाणार ? साऱ्या गांवांत फक्त तुझ्या वडिलांनाच काय ते लोक ओळखतात आणि फक्त त्यांनाच जामीन म्हणून घेतलं असतं. पण त्यांच्याबरोबरही त्या अभाग्यानं वैर धरलं आहे ! जामीन राहण्याविषयीं त्यानं यांना एकदां सांगून पाहिलं पण हे कांहीं त्या गोष्टीला तयार झाले नाहींत. "

बिंदु न बोलतां पुष्कळ वेळ विचार करीत होती. कसला कोण जाणे. नंतर ती म्हणाली,

" कांहीं का असेना, मी एकदां दुपारीं त्यांच्या घरीं जाऊन येईन. इथं येऊन मला किती तरी दिवस झाले, तरी अजून हारानच्या बायकोचं तोंड सुद्धां पाहिलं नाहीं मी. "

बिंदूच्या आईला आश्चर्य वाटलं आणि ती थोडीशी नाराज होऊन म्हणाली,

" एवढ्या सगळ्या गोष्टींची माहिती झाल्यानंतरही तूं जाणार ? "

" हो. " बिंदूनं सहज आणि स्वाभाविक रित्या मान हालवून म्हटलं.

त्यानंतर मात्र पुढें बिंदूची आई कांहींच बोलली नाहीं.

कांहीं वेळ स्तब्ध राहून बिंदु पुढें म्हणाली,

" मी त्यांच्या घरीं गेलें तर त्यांत कुणाचंच नुकसान नाहीं. आणि शिवाय पुरुषां-पुरुषांमधलं भांडण त्यांच्या बायकांतहि पसरावं हें कांहीं चांगलं नाहीं. "

बोलतां बोलतां बराचसा वेळ निघून गेला हें लक्षांत येतांच बिन्दूची आई उठून उभी राहिली आणि जातां जातां म्हणाली,

" हें जर त्यांनीं ऐकलं तर रागावतील ते. "

"मी हारानच्या घरीं अशी जाऊन येईन कीं बाबांना समजणार सुद्धां नाहीं."

"त्यांना खात्रीनं कळेल तें."

"तूं सांगितलंस तरच त्यांना कळेल तें."

"कळल्यानंतर फार रागवतील हं."

बिन्दूनं ऐकलं न ऐकलंसं करून म्हटलं,

"आई-बाप स्वतःच्या मुलांवरचा राग चट्दिशीं विसरून जातात. त्याची काळजी नको तुला, आई."

## २

या गावांचं नांव आहे हलुदपूर. हें गांव कुठल्या जिल्ह्यांत आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं; कारण हें सांगून तिथं जाण्याचे कष्ट मी कुणालाच देऊं इच्छित नाहीं; आणि शिवाय तिथं जाण्याची कुणालाही आवश्यकता भासणार नाहीं. इथं कांहीं न पाहण्यासारखं आहे; न ऐकण्यासारखंही कांहीं आहे. हां, जर तुम्हांला जिज्ञासाच असेल तर पुढलं वर्णन वाचून जेवढं समजेल तेवढ्यावरच तृप्ति आणि समाधान मानून घ्या म्हणजे झालं.

या गांवांत पूर्वी किती तरी धनिक आणि श्रीमंत लोक राहात होते असं म्हणतात, आज ही गोष्ट खोटी मानण्याचं कांहीं कारणही नाहीं; एक तर, हें नांव गंगेच्या किनारीं वसलेलं आहे आणि दुसरं, इथं फार पुरातन काळापासून दोन-चार जीर्ण-शीर्ण शिवालयें बाबूंच्या आणि इतर झाडांच्या दूर-

न्यांनं मौनं धारण केलेल्या योग्यांच्या मूर्तीप्रमाणें विराजमान झालीं आहेत. एक दोन पक्क्या घाटांच्या पोकळींत गाय बैल अधून मधून चरत फिरत असतांना दृष्टीस पडतात. हें सगळं पाहून असं वाटतं कीं ह्या गांवाची स्थिती नेहमींच अशी नसावी; कधीं काळीं ह्या गांवानेंही चांगले दिवस पाहिलेले असावेत. परंतु आतां फक्त दहा वीस ब्राह्मण कायस्थांचीं घरं आणि पन्नास साठ शेतकऱ्यांच्या झोपड्या, एवढीच काय ती वस्ती आतां या गांवांत शिल्लक राहिली आहे. ह्या घरांना आणि झोपड्यांना सोडून बाकी जिकडं तिकडं जंगलच जंगल पसरलं आहे. त्या जंगलामधून एक दोन माणसांना जाण्यायेण्यासाठीं एक दोन पायवाटा आहेत.

ह्याच गांवांत श्रीयुत हारानचंद्र मुखोपाध्याय महाशयांचं घर आहे. तें जुन्या विटांनीं बांधलेलं, दुमजली असं आहे. त्या घरांत वरच्या मजल्यावर दोन खोल्या आणि खालीं चार पांच खोल्या आहेत. ह्या घराच्या सभोंवतालीं कांहीं बाबूचीं, कांहीं आंब्याचीं आणि कांहीं केळीचीं झाडं आहेत. बस्स, मुखोपाध्याय महाशयांचं हेच तें खानदानी घर आणि एवढीच काय ती त्यांची भौतिक संपत्ति.

हलुदपुराहून एक मैलाच्या अंतरावर असलेल्या ब्राम्हणपाड्याचे जमीनदार नन्दीबाबू यांच्या कचेरींत मुखोपाध्याय महाशय नोकरी करीत होते. दरमहा वीस रुपये त्यांना मिळत असत. एवढ्या रकमेंत पूर्वीं त्यांचं चांगल्या प्रकारें भागत असे; परंतु अलीकडे ही रक्कम त्याना अपुरी पडूं लागली होती. त्यामुळें हात नेहमीं आंखडलेला असे. वैभवाच्या अभावीं त्यांचें घर नेहमीं ओकं ओकं दिसत असे.

घरीं त्यांचे आश्रित—त्यांच्यावर अवलंबून असलेली कुटुंबांतली मंडळीही बरीच होती बायको, दोन मुलं, दोन मुली आणि एक विधवा वडील बहीण—अर्थात् हिंदु कुटुंबांत साधारणतः ज्या लोकांचं पालनपोषण केलं जातं ते सगळे लोक त्यांच्या परिवारांत होते. पूर्वीं दर महिन्याला चांदीच्या वीस मुद्रिका ज्या वेळीं ते आपल्या बायकोच्या हातांत न चुकतां आणून देत असत, त्या वेळेस त्यांच्या कुटुंबीयांचं व्यवस्थित प्रकारें तेवढ्या रकमेंत भागून जाई, परंतु हल्लीं काय झालं होतं कोण जाणे, तेवढ्या रकमेंत त्यांचं भागेनासं झालं होतं आणि घराला

कायमचं दारिद्र्य चिकटून बसलं होतं. पूर्वी त्यांची पत्नी आणि वडील बहीण मिळून संसार नीटनेटका चालवीत असत; परंतु आजकाल कधीं त्यांच्या घरीं तांदूळ असले तर डाळ नसायची आणि डाळ असली तर तांदूळ नसायचे. पुष्कळदां असं होई कीं सरपण नसल्यामुळें त्यांच्या घरची चूलसुद्धां बंद राहत असे. 'हें नाहीं' 'तें नाहीं' या दररोज्च्या कटकटीला कंटाळून आणि दारिद्र्य व टंचाई यांनीं बेजार होऊन मुकर्जी महाशयांनीं हळूहळू वाईट मार्गाचा अवलंब केला होता. अर्थातच मालकाच्या पैशांतील कांहीं रक्कम ते आपल्या खर्चासाठीं वापरूं लागले होते. हारान बाबूवर प्रत्येकाचा विश्वास असे; त्यामुळें पहिल्यादां तर कुणीहि त्यांचा वहीम घेतला नाहीं. परंतु हें असं फार दिवस चालणं शक्य नव्हतं. हळूहळू जमिनदारांना संशय येऊं लागला. संशय पक्का झाला त्या वेळीं त्यांनीं एके दिवशीं जमा-खर्चाची वही पहावयाला मागितली. जमा-खर्चाची वही तपासीत असतांना खात्यांत किती तरी चुका आणि पुष्कळच गोलमाल केलेला आहे असें जमिनदारांना दिसून आलं. मग काय? हारान बाबूची चोरी पकडली. हारानबाबू आतांपर्यंत पुष्कळच रुपये पचवून मोकळे झाले होते. जमिनदार श्री. भगवान नन्दी दयाळू आणि धर्मात्मा होते. त्यांनीं हारानबाबूला बोलावून विचारलें,

"आतांपर्यंत किती रुपयांची चोरी केली आहे?"

"बरोबर सांगतां येत नाहीं."

"बरोबर सांगतां येत नाहीं? वहीखात्यावरून तर असं दिसून येतं कीं जवळ जवळ तीन हजाराच्या वर तुम्ही रुपये चोरले आहेत. एवढ्या रकमेचं काय केलं?"

"एवढी रक्कम खर्च केली."

"खर्च तर केलीतच, परन्तु चोरी कां केली?"

"वीस रुपयांत भागत नव्हतं म्हणून चोरी करावी लागली."

"इतक्या दिवसानंतर वीस रुपयांत तुमचा संसार अचानक चालेनासा झाला हें ऐकून मला आश्चर्य वाटतं. बरं कांहीं कां असेना, तुम्ही मला कां नाहीं येऊन सांगितलं कीं माझं वीस रुपयांत भागत नाहीं म्हणून?"

" तसं सांगितलं असतं तर काय तुम्ही मला जास्त पगार दिला असता ? "

" कदाचित दिलाही असता ! बरं जें झालं तें होऊन गेलं. वापरलेल्या रकमेपैकीं अर्धी रक्कम जरी तुम्ही परत केली तरी मी तुम्हांला सोडून देईन. "

" कुठून परत देऊं ? माझ्याजवळ तर कांहींच नाहीं. "

" तुमचा जमीन-जुमला असेल, तो विकून टाका. "

"जमीन-जुमल्याच्या नांवानं वंशपरंपरागत असं एक माझं जुनं घर आहे; तें विकून तुम्ही पैसे घेऊं शकतां. "

" मग तुमचीं मुलं—बाळं राहतील कुठं ? "

" झाडाखालीं. " भगवान बाबू बऱ्याच वेळपर्यंत हारान बाबूंच्या चेहऱ्याकडे पाहात राहिले.

नंतर म्हणाले,

" तुमचे डोळे इतके लाल कां दिसत आहेत ? "

" मला काय माहित ? "

प्रश्नोत्तरानंतर हारान बाबूंला सुट्टी देऊन दुसऱ्या एका कारकुनाला बोलावून जमिनदारांनीं विचारलं,

" हारान बाबूंची घरची परिस्थिती कशी आहे याची माहिती काढतां येईल का ?"

" काय काय माहिती काढावी लागेल ? "

" हीच कीं त्यांची परिस्थिती कशी आहे, धनसंपत्ति केवढी आहे, कुणाचं देणं घेणं किती आहे ? हीच, हीच सगळी माहिती. "

या गृहस्थाला हारान बाबूंची बरीचशी माहिती होती. तो म्हणाला. मुकर्जी महाशयाची जेवढी म्हणून मला माहिती आहे तेवढ्यावरून मी सांगतों, त्यांची सांपत्तिक स्थिती चांगली नाहीं आणि त्याच्या घरची स्थितीहि फार वाईट आहे; परंतु त्याच्या देण्या—घेण्याच्या बाबतींत मला एक अवाक्षरहि माहित नाहीं.'

" सगळ्या गोष्टींचा नीट तपास लावून मला कळवा. "

दोन दिवसांनंतर त्या गृहस्थाने जमिनदारांना कळवलं कीं मुकर्जी महाशयांची परिस्थिती कल्पनेच्या बाहेर खालावलेली आहे. आणि ह्यापूर्वी त्यानें जी माहिती मुकर्जी महाशयाच्यविषयीं त्यांना सांगितली होती तीहि पण अक्षरक्षः खरी.

जमिनदार भगवान नंदीबाबूंनीं प्रश्न केला,

" मुकर्जीला नशापाण्याची संवय आहे का ?"

" होय, तो गांजा पितो. "

" तरीच त्या दिवशीं त्याचे डोळे इतके लाल होते. बरं, ह्या व्यसनाबरोबरच त्याच्यांत आणखीन कांहीं दुसरा दोष आहे का? "

त्या कारकुनानं खालीं मान घालून उत्तर दिलं,

" होय, असं ऐकलं आहे खरं. "

" मग तूं एक काम कर—उद्यां कोर्टांत जाऊन चोरीच्या अपराधाबद्दल मुकर्जीविरुद्ध फिर्याद कर आणि तसाच ठाण्यावर जाऊन पोलिसांत ही खबर देऊन ये. "

शेवटीं या सगळ्या गोष्टींचा परिणाम म्हणून मुकर्जी महाशयांना पोलिसांनीं पकडून कच्च्या कैदेंत ठेवून दिलं.

हलुदपूर गांव जमिनदाराच्या कचेरीजवळ असूनही हारान मुकर्जीला कच्च्या कैदेंत ठेवण्याच्या गोष्टीचा गवगवा गांवांत झाला नाहीं फक्त ही गोष्ट बिन्दूच्या वडिलांना, भवतारण गांगुली ह्यानांच माहीत होती. कदाचित् नन्दीबाबूंनीं स्वतःच त्यांना ती सांगितली असावी. भवतारण गांगुली वयोवृद्ध होते आणि त्यांचा मानही खूप लोक ठेवीत असत. त्यामुळें हारान मुकर्जीला कच्च्या कैदेंतून सोडवून आणणं त्यांना फारसं कठिण नव्हतं. परंतु त्यांनीं त्या बाबतींत कांहींच केलं नाहीं. निस्सहाय, निरुपाय होऊन मुकर्जी महाशय कच्च्या कैदेंतच दिवस कठूं लागले. परंतु एक गोष्ट राहूनच गेली—ही गोष्ट कलहप्रिय कृष्णाबाम्हणीला कशी कळली, हें एक तीच सांगूं जाणे.

वैशाख महिन्यांतील दोन प्रहर, तरी आकाशांत काळ्या मेघांनीं दाटी केल्यामुळें हळूहळू अंधार पसरत चालला होता. ह्याच वेळेला हारान बाबूच्या

स्वयंपाकघराच्या व्हराड्यांत त्यांची पत्नी आणि मोठी मुलगी ललना एकमेकींसमोर बसल्या होत्या. दोघींचेंही चेहरे सुकून गेलेले दिसत होते. आज एकादशी होती. आणि ललना बाल-विधवा होती! परंतु तिची आई? तिनंही अजनपर्यंत कांहींच खाल्लं नव्हतं.

ललनानं म्हटलं, " आई, आजही, मला वाटतं, बाबा येणार नाहींत. आकाशांत मेघांची दाटी होऊं लागली आहे. कदाचित पाऊस आला तर मग स्वयंपाकघरांत पाणी सांचेल आणि मग उभं राह्यला जागा सुद्धां राहणार नाहीं; जेवढं तुझ्याच्यानं खाववेल तेवढं खाऊन कां घेत नाहींस ? "

" अजून थोडा वेळ वाट पाहीन म्हणतें." ललनाच्या आईनं उत्तर दिलं.

" तीन दिवस झाले. अजून ते आले नाहींत. कदाचित् आज येतील."

" आई, बाबांनीं पूर्वी असं कधीच केलं नव्हतं ग. तीन दिवस होऊन गेले, अजूनही आले नाहींत ! आज येतील ह्याचा तरी काय नेम ? "

" देवाची मर्जी ! "

एकादशीच्या दिवशीं रासमाणि ( हारान बाबूची मोठी बहीण ) उशीरा स्नान-पूजा करीत असे. ह्या वेळीं आपलं नित्य कर्म आटोपून आणि हातानं माळ फिरवित फिरवित त्यांच्या जवळ येऊन ती ओरडून म्हणाली,

" सूनबाई, अजूनपर्यंत तूं कांहींच खाल्लं नाहींस ? "

" अजून वाट पहावी म्हणतें " सुनेनं खिन्न होऊन उत्तर दिलं.

" कपाळ माझं ! अजून किती वेळ वाट पाहणार ? आणि वाट पाहून पाहून काय होणार आहे हें मला दिसतच आहे. तुझेच डोळे दुखूं लागतील पण तो कांहीं येणार नाहीं. तो नीच काय आतां इतक्या उशीरा परत येणार आहे ? जा, पाहून ये हवं तर—गांजा पिऊन कुठल्या तरी रांडेच्या घरीं पडला आहे कीं नाहीं तें. "

उपवास केल्यानंतर रासमणीचा चित्तक्षोभ वाढत असे. कुणीच उत्तर देत नाहीं असं पाहून तिनं तणतणच म्हटलं, " मेला काळतोंड्या मरत सुद्धां नाहीं एकदांचा. म्हणजे सुटूं तरी एकदां आम्ही त्याच्या तावडींतून. मेला म्हणजे आत्मा तरी थंड होईल आमचा! "

ह्या वेळीं ललना गप्प कशी राहाणार ? दु :खी होऊन ती म्हणाली, " आत्या, एकादशीच्या दिवशीं शिव्या कां देतेस ?"

एकादशीच्या दिवशीं शिव्या दिल्याची जाणीव करून देतांच रासमणीचा चेहरा लाजेनें काळा ठिक्कर पडला. आणि आंतल्या आंत तिच्या हृदयाला वेदनाही झाल्या; तरीपण ललनासारख्या पोरीनें त्या गोष्टीची जाणीव करून दिली याबद्दल रास• रमणीला चीड आली.तिनं म्हटलं,"तू दहा दिवसाची पोरगी! माझ्यासारख्या म्हातारीला एकादशी-द्वादशीचा उपदेश देतेस. हारान काय तुझाच बाप आहे ? माझा कुणीच लागत नाहीं तो?" असं म्हणतां म्हणतां तिचे डोळे पाण्यानं भरून आले. बाळ माझा, तीन दिवस झाले, घरीं नाहीं आला, माझ्या हृदयांत काय होतं आहे हें फक्त त्या देवालाच माहीत! " आणि त्यानंतर पदरानं डोळे पुसून तिनं म्हटलं, "मी एक म्हातारी झालें, माझ्या तोंडून एखादा शब्द निघाला तर तुम्ही डोळ्यांत बोट खुपसून एकाच्या जागीं मला पांच शब्द सुनवणार नाहीं कशावरून? राहूं दे मुली, आतां मी तुमच्या कुठल्याच गोष्टींत पडणार नाहीं. कांहींहि न खातां पितां सूनबाई प्राण देते आहे हें पाहून कधीं कधीं दोन शब्द तोंडावाटे बोलायची इच्छा होते, आणखिन् दुसरं कांहीं नाहीं बरं."

ललना अतिशय दुःखीकष्टी झाली. तिच्या एका गोष्टीचे इतके अर्थ होऊं शकतात आणि त्यावर इतकं रडणंभेकणं होऊं शकतं ह्याची तिला स्वतःलाच कल्पना नव्हती; तिनं दुःखी स्वरानं म्हटलं,

" माझी चूक झाली आत्या, मी पुन्हां असं म्हणणार नाहीं. "

खरोखरीच तिच्या हातून चूक झाली होती. त्यामुळें तिच्या आईनं म्हटलं,

"ललना, तूं आतां मोठी झाली आहेस. माणसानं आतां समजून उमजून बोलायला हवं. "

त्यानंतर सगळ्यांच्या जुलूम—जबरदस्तीमुळें ललनाची आई चार घांस खाऊन जेव्हां उठली त्यावेळीं बिन्दुवासिनीनें पांच वर्षांच्या आपल्या मुलीचा—प्रमिलेचा—हात धरून हारान बाबूच्या घरांत प्रवेश केला. रासमणि समोरच उभी होती. बिन्दूला आलेली पाहतांच तिनं म्हटलं,

" बिंदू, अलीकडे येतच नाहींस तूं ? "

अशा टोमण्यानं बिन्दु निष्प्रभ होणारी मुलगी नव्हती. तिनं हंसून म्हटलं,

" तुम्ही तरी कुठं येतां, आक्का, आमच्याकडे ! "

" यायचं म्हटलं तरी कसं येणं होईल, बिंदू ? लहान मुलाच्या आजारामुळें घराबाहेर देखील पडणं कठिण होऊन जातं. "

" काय झालंय त्याला ? "

" हेंच—ताप, पोटदुखी वगैरे. आणखीन व्हायचं काय राहिलं आहे ? कांहीं व्हायचं शिल्लक उरलं नाहीं आतां. "

" सूनबाई कुठं आहे ? "

" आतां इतक्यांतच दोन घास खाऊन त्या खोलींत मुलाजवळ जाऊन बसली आहे. "

" इतक्या उशिरां सुनबाईनं जेवून घेतलं ?"

" काय करील बिचारी ? हारानची वाट पाहात बसली होती ना. आज तीन दिवस झाले, हारानचा पत्ताच नाहीं. आतां येईल, मग येईल, आणखिन् थोड्या वेळानं येईल, अशी वाट पाहतां पाहतां इतका उशीर झाला. "

बिन्दु पुढें झाली आणि सूनबाई ज्या खोलींत आपल्या मुलाच्या--माधवाच्या डोक्याशीं बसून त्याला गोष्ट सांगत होती तिथें जाऊन पोंचली. माधव हारान मुखोपाध्यायाचा धाकटा मुलगा होता. त्याचं वय आठ वर्षांपेक्षां जास्त नव्हतं आणि आज जवळ जवळ एक वर्ष होऊन गेलं—मलेरियामुळं तो अंथरुणावर खिळून पडला होता. खरं पाहिलं असतां त्याला त्रास असा मुळींच होत नव्हता आणि त्याचं औषधपाणी व्यवस्थित झालं असतं तर एव्हांना तो बराही झाला असता; परंतु गरीबीमुळें त्याच्या औषधपाण्याची सारखी हेळसांड होत होती, त्यामुळें नाईलाज होता. फक्त काढा, क्विनाईन किंवा कुठली तरी जडीबुटी त्याला देत असत. त्यामुळें त्याची प्रकृति सुधारत नव्हती. आपल्या दोन्ही शांत उज्ज्वल डोळ्यांनीं आईकडे पाहात त्यानं विचारलं,

" आई, आज तीन दिवस झाले, बाबा माझ्याकडे कां येत नाहीत ग ? "

" ते इथं नाहींत रे ."

" कुठं गेले ग आई ? "

आईनं थोडंसं इकडे तिकडे करून म्हटलं,

" तुझ्यासाठीं औषध आणायला गेले आहेत. "

मुलगा आनंदित होऊन म्हणाला,

" त्याना म्हणावं गोड औषध घेऊन या. कडू औषध माझ्याच्यानं घेववत नाहीं; आणि हें पाहा आई, बरा झाल्यावर पहिल्याप्रमाणें हिंडण्या—फिरण्याची माझी फार इच्छा आहे. " कांहीं वेळ गप्प राहिल्यानंतर अतिशय आग्रहपूर्वक त्यानं परत म्हटलं, " आई, मी खरोखरीच बरा होईन ना ? "

आईच्या डोळ्यांत अश्रूंनी गर्दी केली होती; मनांतल्या मनांत ती म्हणत होती—देवाच्या मनांत काय आहे कुणास ठाऊक ? उघडपणानं ती त्याला उत्तर देणार इतक्यांत बिन्दूनं पुढं होऊन माधवला म्हटलं,

" कां नाहीं बरं होणार बाळ तूं ? मी तुझ्या जवळ राहून तुला बरा करीन. "

माधव अथवा माधवच्या आईला बिन्दू आल्याची अजूनपर्यंत कल्पना नव्हती त्यामुळें बिन्दुला एका एकी पुढ्यांत उभी असलेली पाहतांच दोघेही आश्चर्यचकित झालीं.

अंथरुणावर बसल्यानंतर बिन्दूनं विचारलं,

" खाऊन पिऊन घेतलंस ना शुभदा ? "

हारान्‌बाबूच्या स्त्रीचं नांव शुभदा होतं. बिन्दु वयानं तिच्याहून जरी लहान होती तरी तीचं नांव घेऊनच तिला हांक मारीत असे. शुभदा मान हालवून म्हणाली,

" हो. "

" तुझी मोठी मुलगी कुठं आहे ? "

" कदाचित वर असेल. "

" तर मग बोलाव न् तिला खालीं " असं म्हणून तिनंच स्वतः हांक मारली—" ललना,—अग ए ललना—"

ललना वरूनच होकारली " काय ? "

" खाली तर ये पाहूं थोडी. "

ललना आल्यानंतर प्रमिलेला तिच्या हातांत देत बिन्दूनं म्हटलं, " प्रमिलेला घेऊन माधवजवळ थोडा वेळ बैस तर खरी. फार दिवसानंतर तुझ्या आईची भेट झाली आहे. ना त्यामुळें तिच्याशीं शेजारच्या खोलींत मी बोलत बसणार आहे. ऐकशील ना माझं एवढं काम ? "

ललनानं मान हालवून होकारार्थी उत्तर दिलं. बिन्दूनं मग प्रमिलेला ललनाच्या हवालीं करून शुभद्राचा हात धरून तिला एकदम वर नेलं. खोलीचा दरवाजा आंतून बंद करून घेत तिनं विचारलं,

" सूनबाई, किती दिवसापासून हारानदादा घरीं येत नाहीं ? "

" तीन दिवसापासून. "

" कां येत नाहीं कांहीं माहीत आहे तुला ? "

" नाहीं, मला कांहींच माहित नाहीं. "

बिन्दूच्या बोलचालीवरनं तिला भीति वाटूं लागली होती. बिन्दु कसली तरी अशुभ बातमी तर नाहीं ना सांगणार ह्या संशयानं तिची छाती धडधड करूं लागली होती. बिन्दु कसल्या तरी काळजींत गप्प बसली होती आणि तेवढ्यांत शुभद्राचं अंग घामानं डंवरून निघालं होतं. पुष्कळ वेळानंतर बिन्दूनं म्हटलं,

" शुभदा, तुला माहितच आहे ना कीं कांहीं गोष्टी अशा असतात कीं मनुष्यानं लाख प्रयत्न करून पाहिले आणि खूप इच्छा केली तरी त्यांच्यांत गोडवा उत्पन्न होत नाहीं. "

शुभद्राचा चेहरा पांढरा फटफटीत पडला. तिनं हळूच म्हटलं,

" हो, मला माहित आहे—परंतु कां, काय गोष्ट आहे ? "

" हारानदादा आज तीन दिवस झाले घरीं आले नाहींत. समज, त्यांच्या-विषयीं मला तुला कांहीं अशुभ बातमी सांगावयाची असेल तर ? "

शुभद्राच्या साऱ्या शरिरांत एकदम वीज चमकून गेली.

" काय ते आतां नाहींत ? "

" अग, हें काय ? कांपते आहेस काय अशी ? "

कुणी म्हटलं कीं ते जिवंत नाहींत म्हणून ? "

" तर मग ते—? "

" किती वेडी आहेस तूं ? होय जिवंत आहेत, कां बरं जिवंत नाहीं राहणार ? जिवंत आहेत आणि चांगले धडधाकट आहेत. "

ते जिवंत असून चांगले धडधाकट आहेत हें ऐकल्यानंतर शुभदाच्या अंगांत बोलण्याची शक्ति उरली नाहीं. पुष्कळ वेळानंतर उतरलेल्या चेहऱ्यानं तिनं विचारलं,

" मग ? "

" तेंच तर तुला सांगायला आलें आहे. परंतु तुझी अवस्था जर अशी होऊं लागली तर मी सांगूं तरी कशी ? "

" नाहीं, मी पुन्हा असं करणार नाहीं." शुभदानं दीर्घ श्वास घेऊन म्हटलं, " सांग, काय झालं आहे ? "

" चोरीच्या अपराधाखालीं हारानदादांना नन्दीबाबूंनीं कच्च्या कैदेंत डांबून ठेवलं आहे. "

" कच्च्या कैदेंत ? " शुभदाचा चेहरा फटफटीत पडला होता. " आतां कसं होईल ? "

बिन्दूनं सहज स्वरांत उत्तर दिलं, " कुठं काय होईल ? त्यांना सोडवून आणावं लागेल. "

" असं कुठं झालं आहे का ? "

" असं झालं नाहीं तरी कच्च्या कैदेत गेलं म्हणून सगळेच जेलमध्यें जातात असं थोडंच आहे ? "

पुष्कळ वेळ स्तब्ध राहिल्यानंतर शुभदानं म्हटलं,

" बिन्दु एकदां मी तुझ्या वडिलांच्याकडे जाणार आहें. "

बिन्दूनं मान हालवली. शुभदाचं तोंड पाहून दगडालाही पाझर फुटेल हें तिला माहित होतं. परंतु भवतारण गांगुलीच्या हृदयाला फुटणार नाहीं हेंही तिला पक्कं माहित होतं, म्हणून मान हालवून तिनं म्हटलं,

" माझ्या बाबांच्याकडे जाऊन फायदा ? "

" आमचं तर आतां कुणीच नाहीं. कदाचित् त्यांच्यातला अंतर्यामि जागृत होऊन कांहीं तरी केलं तर पाहायचं. "

" ज्यांचं कुणीच नाहीं त्यांचा देव तर आहे ? हारानदादाचं आणि बाबांचं वैर आहे. त्यामुळें बाबांकडे जाऊन तुझा फायदा होणार नाहीं. "

" तर मग काय करायचं ? "

" तेंच मी तुला आतां सांगतें. तुला काय वाटलं, मी फक्त हीच बातमी तुला सांगायला आलें आहे असं ? पण मी जसं सांगेन तसं करशील ? "

" हो."

" कितीही संकटं आलीं तरी ? "

" हो," शुभदानं दृढ स्वरानं म्हटलं.

" तर मग ऐक. दोन-तीनशें रुपये चोरल्याच्या आरोपावरून नन्दीबाबूंनीं हारानदादावर फिर्याद केली आहे. "

" दोन-तीनशें रुपये ? " शुभदाला खोटं वाटलं, इतके रुपये एकदम कुणी चोरूं शकेल ? आणि समजा, चोरले; तरी ते ठेवणार कुठें ? —

" एवढे रुपये त्यांनीं कधींच चोरले नाहींत ग, बिन्दू ! "

" त्यांनीं चोरले नसले तर ठीकच आहे, परंतु होय नाहीं करून आतां त्याचा काय उपयोग ? एवढी रक्कम नंदीबाबूंना देऊन त्यांची क्षमा मागितली तर ते हारानदादाला सोडून देतील. "

" परंतु हें कसं होणार, बिन्दू ? माझ्याजवळ इतके रुपये कुठून असणार आणि मला मिळणार तरी कुठून ? "

" तेंही पण मी तुला सांगतें. लाज, संकोच धरायची ही वेळ नाहीं, शुभदा. माझ्या ह्या दोन सोन्याच्या बांगड्या घेऊन आजच तूं रात्रीं नंदीबाबूंच्याकडे जा. त्यानंतर तुला जसं जमेल तसं कर. "

" तुझ्या बांगड्या ? " शुभदानं विस्मयचकित होऊन म्हटलं.

" होय, माझ्याच बांगड्या. ह्यांची किंमत कमींत कमी तीन-चारशें रुपये तरी सहज आहे. या त्यांना देऊन त्यांचे पाय धरलेस म्हणजे त्यांना दया येऊन ते हारानदादाला सोडून देतील. "

" पण बिन्दू......... ? "

" हं आतां पण-बिण कांहीं नाहीं हं. पहिल्यांदा आपल्या पतीला सोडव; त्यानंतर पण-बिण ऐकून घेईन. ही काय संकोच करण्याची वेळ आहे, शुभदा ? आणि रुपये परत करायची चिन्ता तुला आतांपासूनच कां ? तुझा मुलगा मोठा झाल्यानंतर तो परत देईलच की मला ! "

" तर मग मी आजच जाऊं ? "

" हो, आजच. "

" कुणाच्या बरोबर जाऊं ? "

" कुणी असा विश्वासाचा मनुष्य नाहीं ? "

" कुणीच नाहीं. "

" मग तूं एकटीच जा. मला तर वाटतं कीं, तूं एकटीनंच गेलेलं अधिक चांगलं. पांच जणांच्या कानांवर ही गोष्ट गेली तर पांच प्रकारच्या कंड्या उठतील. "

" तर मग मी आजच जाईन. "

" हो. आजच जा. अंधार पडल्यानंतर मळलेलीं वस्त्रं नेसून आणि डोक्यावर पदर घेऊन जा. उद्यां याच वेळेला मी पुन्हा एकदां येऊन जाईन."

ती जायला निघाली. तेव्हां शुभदाच्या डोळ्यांतून आंसवांची धार लागली. बिन्दूनं आपल्या पदरानं तिचे अश्रू स्नेहपूर्वक पुशीत म्हटलं,

" परमात्मा सगळं कांहीं भलंच करील बरं— यानं जर काम नाहीं झालं तर परत दुसरा उपाय आणि मार्ग आहेतच— तूं मात्र कसलीच चिंता करूं नकोस म्हणजे झालं. "

त्यानंतर आपल्या पदराच्या गांठींतून पांच रुपये काढून शुभदाच्या मुठींत देत ती म्हणाली,

" सुनबाई, मी तुझ्या आईच्या पोटची तुझी सख्खी बहीण आहे. माझ्याशीं कसली लाज ? हे रुपये घे आणि मुलासाठीं कांहींतरी घेऊन ये."

खालीं येऊन बिन्दूनं आपल्या मुलीचे—प्रमिलेचे हात धरून म्हटलं,

" फार उशीर झाला. चल आपण आतां घरीं जाऊं." त्यानंतर विधवा ललनाकडे एक प्रेमपूर्ण आणि कारुण्यपूर्ण कटाक्ष टाकून ती घराबाहेर गेली.

# ३

त्या वेळीं दुपारीं वाऱ्यामुळें मेघांची पांगापांग झाली होती. परन्तु आतां अंधार पडतांच मेघांनीं पुन्हां आकाशांत दाटी केली. आज रात्रीं पाऊस पडल्याशिवाय राहणार नाहीं असाच सगळ्यांचा तर्क होता. पाऊस पडला तर बरं होईल असंच सगळ्यांना वाटत होतं, कारण वैशाखाच्या उकाड्यामुळें सगळेच त्रस्त होऊन गेले होते. पावसामुळें हवेंत थोडासा तरी गारवा येईल आणि जीव भांड्यांत पडेल म्हणून सगळे लोक पावसाची त्या रात्रीं मोठ्या उत्सुकतेनं वाट पाहात होते. मेघाच्छादित आकाशांतून होणाऱ्या वर्षावामुळें गांवांतील सगळ्या लोकांचा फायदाच होणार होता. परंतु शुभदाच एक अशी होती कीं तिचं त्यामुळें नुकसान होणार होतं. शुभदा आकाशाकडे पाहून कपाळाला हात लावून विचार करूं लागली—आपल्याच फुटक्या नशिबामुळं आज हें दुसरं संकट आपल्यावर कोसळणार आहे. एक तर हलुदपुरचा रस्ता घनदाट जंगलांतून होता आणि त्यावर मेघाच्छादित आकाश! तरी

शुभदानं दोन्ही बांगड्या पदरांत बांधून घेतल्या आणि अंगावरील वस्त्र ठीक-ठाक करून व बिछान्यावरील एका चादरीनं सारं शरीर लपेटून घेऊन ती घराबाहेर पडली. पूर्वी ती कधींच ब्राम्हणपाड्याला गेली नव्हती. तिनं नुसतं ऐकलं होतं कीं उत्तर दिशेला अर्धा कोस रस्ता चालून गेल्यानंतर एक पक्की सडक लागते आणि त्या सडकेनं थोडंसं पुढें चालत गेलं कीं ब्राह्मणपाडा गांव लागतो. तिथं एकदां पोहचल्यानंतर जमिनदाराचं घर शोधून काढण्यास फारशी यातायात करावी लागणार नव्हती. कारण गांवांत प्रवेश केल्यानंतर जमिनदार नंदीबाबूंची हवेली दिसूं लागते हें ऐकून तिला माहीत होतें. हलुदपुरची अंधारी वाट पार करून पक्की सडक गांठणंच तिला कठीण होऊन बसलं. हळुहळू काळोख जास्तच वाढत चालला होता आणि पावसालाही सुरवात झाली होती. टप्‌दिशी पडलेल्या पाण्याच्या थेंबाचा आवाज ऐकतांच तिच्या जिवाचा थरकांप होऊन जाई. थोड्याच वेळांत टप्‌टप् करून पडणाऱ्या पावसाचं मुसळधार वृष्टींत रूपांतर झालं. निरुपाय होऊन शुभदा एका झाडाच्याखालीं आसऱ्याला जाऊन उभी राहिली. पुढें जाणं अशक्यप्राय होतं. कारण त्या काळ्याकुट्ट काळोखांत एका हाताच्या अंतरावरील वस्तूसुद्धां दिसत नव्हती. घोर वृष्टि, मेघांचा गडगडाट, आणि विजेचा चमचमाट यांमुळें शुभदाच्या साऱ्या शरीराला भीतीनं कांपरं सुटलं होतं. घोर वृष्टीमुळं जंगली जनावरं आणि जीवजंतू त्याच झाडाखालीं आश्रयासाठीं येत होते आणि तिथें मनुष्याची आकृति पाहून भयंकर चीत्कार करून पळून जात होते, हें शुभदा उघड्या डोळ्यांनीं पाहात होती.

शुभदाच्या मनांत विचार आला—"ह्या झाडाखालीं चोर—डाकू आसऱ्यासाठीं येणार तर नाहींत ?" तिला आपल्या जीवाबद्दल भीति वाटत नव्हती; प्राणाहूनही मौल्यवान् अशा त्या दोन बांगड्यांबद्दल तिला भिती वाटली. त्या बांगड्यांतच तिचं जीवनसर्वस्व गुंतलेलं होतं. त्यांच्यामुळेंच आपल्या पतीला मुक्त करून ती परत आणणार होती ! भयभीत होऊन शुभदा त्या झाडाखालून पळत सुटली. चिखलानं तिचं सारं शरीर भरून गेलं होतं, झाडांच्या फांद्यांशीं टक्करा खाल्ल्यामुळं आणि कांटे बोचल्यामुळें शरीराचें अंग—प्रत्यंग क्षत—विक्षत होऊन गेलें होतें, तरी कशाचीच पर्वा न करतां शुभदा चालतच होती.

एक क्षणभरसुद्धां वृष्टीचा जोर कमी होत नव्हता आणि एक पळभरही मेघांचा गडगडाट थांबला नव्हता. तरी शुभदा झाडा–झुडुपांतून वाट काढीत पुढें पुढें जात होती. आपण जात आहोंत कुठं, हें देखील तिला ठाऊक नव्हतं. ही काळोखी वाट संपून पक्क्या सडकेला आपण केव्हां ना केव्हां येऊन पोहचूं एवढंच ज्ञान तिला होतं. त्याचप्रमाणें कांहीं वेळ चालत गेल्यानंतर तिला असं वाटलं कीं पूर्वीपेक्षां रुंद अशा रस्त्यावरनं आपण सध्यां चालत जात आहोंत. दुप्पट उत्साहानं तो रस्ता पार करून ती खरोखरीच पक्क्या सडकेवर येऊन पोहचली.

एकदां पक्क्या सडकेला येऊन लागल्यानंतर तिच्या मनांत दुसऱ्याच एका शंकेनं डोकं वर काढलं. आतांपर्यंत पक्क्या सडकेवर आपण केव्हां आणि कसें येऊन पोहचूं, ह्याच विवंचनेनं तिला घेरलं होतं, परंतु एकदां सडकेला येऊन लागल्यानंतर दुसऱ्याच विचारानं तिच्या पोटांत भीतीचा गोळा उठला होता. ज्या कामाकरितां ती निघाली होती त्या कामाची तिला आठवण झाली होती.

एवढ्या अपरात्रीं जमिनदारबाबूंची भेट कशी होईल आणि झाली तरी आपल्या कामांत आपल्याला यश मिळेल कीं नाहीं, ह्याच शंकेनं तिला आतां सतावून सोडलं होतं.

यश मिळो न मिळो, एवढ्या संकटांना पार करून येथपर्यंत आल्यावर ती परत तशीच कशी जाणार? हळू हळू तिनं ब्राम्हणपाडा गांवांत प्रवेश केला.

थोडसं अंतर चालून गेल्यानंतर एक विशाल हवेली आणि तिच्या चहूंबाजूला असलेली बाग पाहून जमिनदारांचा हाच वाडा अशी तिची खात्री झाली.

ती आतां आंत कशी जाणार? आणि समजा, आंत ती गेली तरी तिची आणि जमिनदार नंदीबाबूंची एवढ्या अपरात्रीं भेट कशी होणार? तिला कांहींच सुचेना. शुभदाला आतां रडूं कोसळलं—हाय! आतां कसं होणार? मी घरीं कशी परतूं? अगोदर पोटांत अन्न गेलेलं नव्हतं, त्यांत वाटचालीच्या श्रमांनीं ती अतिशय दमलेली होती; वर काळजीनें बावरलेली होती. त्यामुळें तिच्या शरीरांतली सगळी शक्ति नाहींशी झाली होती.

नंदीबाबूंच्या घरासमोर असलेल्या शिवालयाच्या ओसरीवर येऊन ती आडवी झाली.

पावसाची वृष्टि तोंपर्यंत थांबली नव्हती. पण तिचा वेग कमी झाला होता. वैशाखी मेघ क्षणार्धांत जसं समळं आकाश व्यापून टाकतात तसंच क्षणार्धांत ते कुठल्या कुठें पांगून जातात आणि आकाश निरभ्र होतं.

आताही तसंच झालें. आकाशांत दाटी करून राहिलेले मेघ पाहतां पाहतां लुप्त होत चालले होते; चन्द्राच्या शीतल प्रकाशांत वृष्टींत न्हालेली धरती चमचम चमकत होती. दूर क्षितिजाजवळ काळ्या मेघाच्या एका पट्ट्याखालीं मधून मधून आपल्या प्रकाशाचा झोत आणि लोळ दाखवून जणूं कांहीं चंद्राला हिणविण्यासाठीं मोठ्या दिमाखांत वीज चमकून जात होती.

शुभदाचं कशाकडेच लक्ष नव्हतं. ती मेल्यासारखी व्हराड्यांत आडवी झाली होती. घरीं परत जायची वेळ झालेली पाहून शुभदा उभी राहिली आणि अंगावरील ओले कपडे सावरूं लागली. ती आपले ओले कपडे पिळून टाकून ठीकठाक करीत होती तेवढ्यांत जमीनदाराच्या हवेलीचं फाटक उघडलं आणि कंदील घेतलेला एक गडी आणि त्याच्या मागोमाग एक वृद्ध गृहस्थ असे दोघे शिवालयाकडेच येत असलेले तिला दिसले. कदाचित् ह्यांच्यामुळें तरी निदान जमीनदारबाबूंची भेट होईल अशी एक क्षीण आशा तिच्या मनांत निर्माण झाली. ते दोघे जवळ आलेले पहतांच ती एका कोपऱ्यांत जाऊन उभी राहिली. एक स्त्री तोंडावरनं पदर घेऊन शिवालयाच्या दाराशीं उभी आहे हें त्या वृद्ध गृहस्थानें पाहिलं. परंतु तिच्याकडे दुर्लक्ष करून ते दोघे मंदिरांत गेले. बऱ्याच वेळानंतर ती स्त्री जशीच्या तशीच कोपऱ्यांत उभी असलेली बाहेर आल्यानंतर त्यांना दिसली. त्या स्त्रीच्या तोंडावर पदर पाहून, असेल कुठल्यातरी चांगल्या घरची बाई—पावसामुळें आश्रयासाठीं उभी असेल आणि नंतर निघून जाईल असं सकृद्दर्शनीं त्या वृद्ध गृहस्थाला वाटलं होतं, परंतु तिला अजूनही तिथेंच उभी असलेली पाहून त्यानं तिला विचारलं,

" तूं कोण आहेस, बाई ? "

त्या स्त्रीनं कांहींच उत्तर दिलं नाहीं.

" कुठं जाणार आहेस, मुली ? "

शुभदाला उत्तर देतांना खूपच लाज आणि संकोच वाटत होता, तरी पण मधुर आवाजांत तिनं उत्तर दिलं,

" जमीनदारबाबूंच्या घरीं."

" जमीनदारबाबूंचं घर तर हें पुढंच आहे. मग तिथं न जातां इथं कां उभी आहेस ? "

शुभदा कांहीं उत्तर देऊं शकली नाहीं.

वृद्ध पुरुषानेंच पुन्हां प्रश्न केला,

" जमीनदाराच्या घरीं तुला कुणाकडे जायचं आहे ? "

" बाबूंच्याकडे. "

" कुठल्या बाबूंच्याकडे ? "

" भगवान् बाबूंच्याकडे. "

वृद्ध पुरुषानं विस्मित होऊन विचारलं,

" भगवान् बाबूंच्याकडे ? "

" हो. "

" तर मग माझ्याबरोबर ये. "

वृद्ध गृहस्थ पुढें चालूं लागला. चांदण्याच्या प्रकाशांत त्याचे शुभ्र केस आणि सौम्य मूर्ती पाहून शुभदा विनासंकोच त्याच्या मागोमाग जाऊं लागली. क्रमशः फाटक पार करून, बगिच्यांतून, एका खोलीच्या दरवाजापाशीं येऊन तीं उभी राहिली.

खोलीचं दार उघडून त्या वृद्ध गृहस्थानं म्हटलं,

" याच खोलींत ये. "

शुभदानं खोलींत प्रवेश करून पाहिलं—खोली खूपच सजवलेली होती. सगळ्या जमिनीवर मूल्यवान् गालीचा पसरला होता. आणि त्याच्यावर एक शुभ्र चादर आंथरलेली होती. तिथेंच तक्कियांच्यामध्यें बसायची जागा होती.

वृद्ध गृहस्थ तिथेंच जाऊन बसला आणि कंदिलाच्या प्रकाशांत शुभदाला त्यानें पायापासून डोक्यापर्यंत न्याहाळलं. कधीं काळीं शुभदा सुन्दर होती

पण वय आणि संसारांतील दुःख-कष्टांमुळे पूर्वींसारखं तेज तिच्या चेहऱ्यावर आतां उरलं नव्हतं, तरी पण त्या निस्तेज सौंदर्यांतच जेवढं म्हणून माधुर्य आणि तेज शिल्लक उरलं होतं तेवढ्यानेंच तो वृद्ध गृहस्थ चकित होऊन गेला.

पुष्कळ वेळ तिच्याकडे एकसारखं एकटक पाहात राहिल्यानंतर तो तिला म्हणाला,

" मुली, तुझी कांहीं तरी चूक झाली असावी, विनोदबाबूंना कां तूं भेटायला आली आहेस ? "

" विनोदबाबू कोण ? "

" विनोदबाबू ? भगवानबाबूंचे लहान भाऊ आहेत. "

" नाहीं, मी त्यांना भेटायला आलें नाहीं " शुभदानं उत्तर दिलं.

" तर मग काय भगवानबाबूंशींच तुझं काम आहे ? "

" हो. "

" भगवान् नन्दी हें माझंच नांव आहे, परन्तु पूर्वीं मी तुला कधीं पाहिल्याचं मला आठवत नाहीं. "

" नाहीं. " शुभदानं मान हलवून म्हटलं.

" तर मग माझ्याशीं तुझं दुसरं काय काम असणार ? "

शुभदानं उत्तर दिलं नाहीं.

भगवानबाबूंनींच पुन्हां म्हटलं, " माझ्या समजुतीप्रमाणें एवढ्या अपरात्रीं एखाद्या स्त्रीचं विनोदबाबूंशींच काम असायचं. माझ्याशीं तुझं काय काम असावं हेंच मला समजेनासं झालं आहे. "

शुभदानं तरीही कांहींच उत्तर दिलं नाहीं.

" तुझं घर कुठं आहे ? "

" हलुदपूर. "

" हलुदपुर ? माझ्याशीं काय काम आहे ? हारानची तर तूं बायको नाहींस ? "

शुभदानें पदरांतून मान हलवून म्हटलं, " हो. "

" मग बोल काय काम आहे ? "

आपल्या पदरांतून त्या दोन सोन्याच्या बांगड्या काढून भगवानबाबूंच्या पायांजवळ ठेवीत शुभदानं गद्‌गद् स्वरांत म्हटलं, " त्यांना सोडून द्या."

वृद्धाच्या डोक्यांत सगळ्या गोष्टीचा प्रकाश पडला. दोन्ही बांगड्या हातांत घेऊन त्यांचं व्यवस्थित निरीक्षण करून शेवटीं त्यांनीं म्हटलं, " एवढं तरी त्यानं तुला दिलं आहे ह्यांतच मला आनंद आहे ! " त्यानंतर दोन्ही बांगड्या खालीं ठेऊन ते म्हणाले, " या तूं परत घेऊन जा. ब्राह्मणकन्येच्या हातच्या बांगड्या मी घेऊं इच्छीत नाहीं. त्याला सोडायचा तर मी तसाच सोडून देईन. त्यानं माझे पैसे इतके चोरले आहेत कीं हा दागिना घेऊनही त्यानं चोरलेल्या पैशाची थोड्या अंशानेंही भरपाई होणार नाहीं. मग ह्या बांगड्या घेणं न घेणं सारखंच आहे. असं असतांना मी त्याला तसाच कां सोडूं नये ? "

शुभदानं आपले डोळे पदरानें पुशीत विचारलें, " तर मग तुम्ही त्यांना सोडून देणार ना ? "

" असाच त्याला सोडून द्यायची माझी इच्छा नव्हती; माझ्या मनांत चांगली अद्दल घडवायची होती त्याला. त्याची दानत चांगली नाहीं. त्याला कडक शिक्षा मिळणं आवश्यक होतं; पण मुली तुझ्या तोंडाकडे पाहून मी त्याला सोडून देत आहें. "

शुभदाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. ब्राह्मणकन्या असूनही त्या वृद्धाच्या शुभ्र केसांकडे पाहून उघड उघड त्याला आशीर्वाद देण्याचं धैर्य तिला झालं नाहीं. मनांतल्या मनांत तिनें त्याला असंख्य धन्यवाद दिले. हात जोडून त्याचें कल्याण करण्याबद्दल तिनें देवाची प्रार्थना केली आणि जाण्यासाठीं म्हणून ती उठून उभी राहिली.

भगवान्‌बाबूंनीं मान वर करून विचारलं, " आजच घरीं जाणार मुली ? "

शुभदानें मान हालवून होकार भरला.

" तुझ्याबरोबर दुसरं कुणी आहे का ? "

" कुणीच नाहीं. "

" कुणीच नाहीं ? तर मग एवढ्या अपरात्रीं तूं एकटीच जाऊं नकोस. मी एक गडी देतों त्याला बरोबर घेऊन जा. "

शुभद्रानें त्यालाही नकार दिला आणि ती एकटीच त्या जंगलांतून घरीं परत आली.

घरीं येईपर्यंत चांगलं उजाडलं होतं.

ललना उठली होती आणि घरचा कामधंदा पाहात होती. ओल्या वस्त्रांत आईला पाहून तिनं विचारलं, " आई, इतक्या पहांटे नदीवरून स्नान करून आलीस ? "

" हो. "

# ४

शुभदानं आपल्या दोन्ही मुलींचीं नांवं राममणि आणि दुर्गामणि न ठेवतां ललना आणि छलना हीं ठेवलेली पाहून तिच्या नणंदेचा—रासमणीचा रागाचा पारा नेहमींच चढलेला असायचा. ललना आणि छलना हीं दोन्हीं नांवं अष्टौप्रहर त्यांच्या कानावर आदळत असल्यामुळें रासमणीला तीं नांवं खुपत असत. ललना हें नांव त्यांतल्या त्यांत थोडंस तरी चांगलं होतं, परंतु छलना—छीः हें काय नांव झालं ? छलनाकडे ती कधीं उघड्या डोळ्यानं ढुंकूनही पाहात नव्हती; ह्याचं अर्धं कारण तिच्या नांवांत होतं. सगळे लोक आपल्या मुलींचीं नांवं देव-देवतांवरून ठेवीत असतात. कारण तीं नांवं घेतलीं म्हणजे नामस्मरणाचं पुण्य पदरीं पडून पापक्षालन होतं. पण ह्या

दोन मुलींचीं नांवं घेऊन हांका मारायला सुरुवात केली की उलट पापाचा भार दिनीं—प्रतिदिनीं वाढतच जातो अशी रासमणीची कल्पना होती.

ललनामयी आणि छलनामयी ह्या दोन्ही हारान-मुकर्जींच्या मुली होत्या. ललना मोठी होती आणि छलना धाकटी. ललनाचं वय सतरा वर्षांचं होतं आणि छलनाचं अकरा वर्षांचं. पहिली विधवा तर दुसरी अजून कुमारिकाच होती.

हें झालं त्यांच्या नांवाविषयीं, आतां राहिलें त्यांचें रूप. त्यांच्या रूपाचं वर्णन मला करतां येणार नाहीं. हां, एवढं मात्र मी सांगू शकेन कीं जेव्हां जेव्हां ललना गंगेच्या घाटांवर स्नानासाठीं म्हणून जात असे तेव्हां तेव्हां वयस्क बाया तिला पाहून असं म्हणत असत, “ विधवा करण्यासाठींच का देवानं पोरीला इतकं रूप दिलं ! ”

लगेच ललना तोंड लपवावं म्हणून पाण्यांत बुडी मारून राही.

तिला पाहून समवयस्क मुली तिच्याविषयीं कानगोष्टी करीत. त्यांच्या आपसांत कानगोष्टी काय चालत होत्या हें त्यांचं त्यांनाच माहीत. परंतु ललने-बद्दल त्यांच्या तोंडून कांही फार मोठ्या चांगल्या गोष्टी निघत नव्हत्या एवढं मात्र नक्की! ललनाचं त्यामुळें कांहींच बिघडत नसे. ती कुणाशीच जास्त बोलत नसे आणि कुणाच्या भानगडींतही पडत नसे. एकाद्दुसराच शब्द तोंडांतून निघायचा. गुपचुप स्नान करून, कळशी भरून घेऊन ती घरीं जात असे.

परंतु छलना तशी नव्हती, तिचं सगळंच निराळं. गप्पा मारायला, हुदळायला आणि खेळायला तिला फार आवडत असे.आठ वाजतां स्नानाला म्हणून जी घरून निघत असे ती अकरा वाजायच्या आंत घरीं कधींच परत जात नसे. अंगावर दागिना नसला कीं तिच्या कपाळाला आठ्या पडत. मोठ्या तांदुळाचा भात तिला चालत नसे आणि आज ताटांत मासळी कां नाहीं म्हणून ती ताट भिरकावून देई. एक का दोन, रोज ती असे हजारों उत्पात घरीं करत असे. तिच्याही शरीरांतून लावण्य आणि रूप ओसंडून वाहात होतं. तापलेल्या सोन्यासारखा रंग, गुलाबाच्या फुलाप्रमाणें चेहरा—ज्याच्यांतले डोळे चित्रकाराच्या कुंचल्यानें काढ-ल्यासारखे रेखीव होते—आणि पान खाऊन खाऊन दोन्ही ओठ लाल लाल करून जेव्हां आपलं रूप छलनामयी आरशांत पाहात असे तेव्हां तिची छाती गर्वानं

आणि अभिमानानं फुलून उठत असे. मनांतल्या मनांत ती आपल्याशींच म्हणत असे— "इतक्या लहान वयांतच माझं एवढं रूप आहे तर मोठी झाल्यावर तर माझ्या रूपाला सीमाच राहणार नाहीं! सगळ्या अंगावर दागिने राहतील, इथें बांगड्या, इथें बाजूबन्द, हार, गोफ, कंठमाला, आणखिन् किती तरी अन् किती प्रकारचे दागिने माझ्या अंग-प्रत्यंगावर राहतील; आणि मग त्यावेळेस काय होईल ह्या कल्पनेनें तिला जो आनंद होई तो गगनांत मावत नसे. अशा वेळीं पळत पळत आपल्या आक्काकडे ती जात असे.

ललना तिला विचारीत असे, "कां ग, पळत पळत कुठं चाललीस ?"

"आक्का, माझी अंगकान्ति पूर्वीपेक्षां काळी पडली आहे कां ग ?"

"काय म्हणून काळी पडेल ?"

"नाहीं ना पडली ? बरं, आक्का, आपल्या गावांत एखादा ज्योतिषी आहे का ग ?"

"कां ?"

"मी त्याला माझा हात दाखवीन."

"कशाला ?"

"माझा हात पाहून मी मोठी झाल्यावर माझ्या अंगावर दागिने पडतील कीं नाहीं हें तो सांगेल."

ललनाचे डोळे टच्दिशीं भरून येत आणि ती म्हणे, "पडतील बरं, तुझ्या अंगावर दागिने पडतील. माझी बहीण राजाची राणी होईल बरं."

ललना मग अगदीं लाजून चूर होऊन जात असे. तिचा चेहरा लाल लाल होऊन जाई आणि मग तिथून आणखिन् दुसरीकडं कुणीकडं तरी ती पळून जाई. अंगावर दागिने पडतील की नाहीं हेंच तिनं विचारलं होतं, राजाची राणी होणार की नाहीं हें कुठं तिनं विचारलं होतं ?

कधीं कधीं ती ललनाला विचारी, "आक्का, आपल्या घरीं कांहींच कसं नाहीं ग ?"

ललना उत्तर देई, "आपण गरीब आहोंत म्हणून."

“आम्ही गरीब कां आहोंत, आक्का? आमच्यासारखं गांवांत दुसरं कुणीच रहात नाहीं आणि आमच्यासारखा त्रासही पण भोगत नाहीं.”

“देव ठेवील तसंच राहावं लागतं बाई.”

“देवानं दुसऱ्यानां आमच्यासारखं कां नाहीं ठेवलं? आम्हालाच कां त्यानं असं ठेवलं आहे आक्का?”

“आमच्या पूर्वजन्मीचें पाप म्हणून.”

“कसलं पाप आक्का?”

“पापं काय एकाच तऱ्हेचीं असतात छलना? पापं नाना तऱ्हेचीं असतात. कुणाला माहिती किती पाप आम्हीं केलं आहे तें! – आई–बापांचा मान ठेवला नसेल, दुसऱ्यांना विनाकारण त्रास दिला असेल, न जाणों, आणखिन् काय काय केलं असेल तें?”

छलनेचा चेहरा खरकन् उतरून जाई. मग ती प्रश्न करीत असे, “तर मग जन्मभर आम्हाला गरिबीतच राहावं लागेल का? कधींच आम्हाला सुख मिळणार नाहीं का गं आक्का?”

“असं कुणी म्हटलंय? वेडे, वाईट दिवस गेल्यानंतर चांगले दिवस नक्कीच येतील!” आणि मग प्रेमानं आपल्या बहिणीचे हात आपल्या हातांत घेऊन ललना म्हणत असे, “पाहशील तुला केवढं सुख लाभेल तें.—केवढं ऐश्वर्य—किती दास–दासी रहातील—किती दागिने—साक्षात् लक्ष्मीच जशी. माझी बहीण राजाची राणी होईल!”

ललना अशाच तऱ्हेनं तिची समजूत काढींत असे. छलनामयीनं कांहींही विचार न करतां एकदम म्हटलं होतं, “आक्का, तूं?......?”

छलनामयीला माहीत होतं कीं आपली आक्का विधवा आहे, तरी सुद्धां बालिकेला सुलभ अशा चंचल स्वभावामुळं तिच्या तोंडून ते शब्द बाहेर पडले होते. त्यांत त्या मुग्ध बालिकेचा कांहींच अपराध नाहीं हे उमजून ललनामयी खालीं मान घालून कांहीं उत्तर न देतां गप्प बसून राहिली. थोडया वेळानें ललना वर तोंड करून हंसून म्हणाली, “मीही सुखी होईन बरं—बघ आई मला आंत बोलावते आहे.” असं म्हणून ललना आंत आईकडे निघून गेली.

खराखरीच तिची आई त्यावेळीं तिलाच हांका मारीत होती. आईजवळ जाऊन तिनं विचारलं, " काय आई ? "

" तुझे वडील आले आहेत त्या खोलींत—" आईचं म्हणणं पूर्ण ऐकायचं सोडून ललना तशीच आंत पळाली.

जेवायला बसल्यानंतर रासमणीनं विचारलं, " इतके दिवस कुठं होतास ? "

तोंडांत घांस टाकून हारानबाबूंनीं मोठ्या गंभीरतेनं म्हटलं, " ती एक फार मोठी हकीकत आहे. "

" मोठी हकीकत कसली रे ? "

तो घांस गळ्यांतून खालीं उतरल्यानंतर तसाच पूर्ववत् गंभीर चेहरा ठेवून हारान बाबूंनीं म्हटलं, " मोठी हकीकत म्हणजे एवढीच कीं माझा प्रलय-काल जवळ आला होता. "

रासमणीच्या विस्मयाला सीमा राहिली नाहीं. दारुण चिंतेनं व्याप्त होऊन भरलेल्या कंठानं तिनं विचारलं, " नीट सांग ना हारान काय झालंय तें ? "

हाराननें आपल्या गंभीर चेहऱ्यावर हसं आणून म्हटलं, " चौथीच्या चंद्राला कलंक लागला ती गोष्ट तुला माहीत आहे ना ? माझंही थोडं तसंच झालं आहे. चोरीच्या अपराधाखालीं नंदीबाबूंनीं मला— नाहीं माझ्याविरुद्ध कोर्टांत फिर्याद दाखल केली होती. "

" फिर्याद केली होती ? "

" हो, फिर्याद केली होती; परंतु खोटी गोष्ट किती दिवस टिकाव धरणार ? माझ्यावर आरोप शाबीत झाला नाहीं त्यामुळेंच केस जिंकून आज मीं घरीं परत आलों आहे." पदराआड शुभदानें आपले डोळे पुसले. रासमणीनें नंदीबाबू आणि त्यांच्या कुटुंबांतील लोकांचा उद्धार होवो अशी देवाजवळ प्रार्थना केली आणि त्यांचं कल्याण व्हावं म्हणून दुर्गेला हजारों नमस्कार केले. नंतर तिनं विचारलं, " बरं, आतां तुला ते लोक परत नोकरीवर घेतील ? "

रासमणीच्या प्रश्नामुळें हारान बाबूचे डोळे लालभडक होऊन गेले; त्यानें भडकूनच म्हटलं, " नोकरीवर घेतील ? हं, परंतु त्यांच्याकडे आधीं नोकरी करायला मी तयार पाहिजे ना ? त्या हरामजाद्या नन्दीचं तोंड मी ह्या

जन्मांत पुन्हा कधीं पाहीन तरी का ? जिवंत राहिलों तर ह्याचा बदला जरूर घेईन; सूड घेईनच घेईन. "

रासमणी कांहीं वेळ भयभीत आणि विस्मित डोळयांनीं आपल्या वीर-शिरोमणी भावाकडे पाहात होती, नंतर हळू हळू ती म्हणाली,

" नौकरी करणार नाहीं तर घरखर्च कसा भागेल ? "

" त्याची तूं काळजी करूं नकोस आक्का—मी पुरुष आहें, मला कसली, काळजी ? उद्याच दुसरीकडे कुठं तरी नौकरी पाहतों."

हारानच्या शब्दावर रासमणीचा विश्वास बसला असं मुळींच नाहीं, परंतु पूर्णपणें अविश्वास दाखविण्यापेक्षां अशा वेळीं थोडासा विश्वास दाखवून भीषण चिंतेंतून कांही काळ का होईना सुटका करून घेण्याची माणसाची इच्छा असते. रासमणीनंही असाच विश्वास दाखवून मनाचं तात्पुरतं समाधान करून घेतलं. तिनं मनाचें समाधान केलं—आपल्या म्हणण्याप्रमाणेच वागेना का तो. निदान या संकटाच्यामुळें जरी त्याचे डोळे उघडले तरी पुरे आहे.

कांहीं क्षण स्तब्ध राहून ती म्हणाली, " तुला जें ठीक दिसेल तेंच कर बाबा, नाहीं तर त्या भानगडींत मुलाबाळांच्या हालअपेष्टांना सीमा राहणार नाहीं."

एक भलं मोठं उत्तर देऊन बाबू हारानचंद्र एकदांचा जेवण करून उठला. जेवल्यानंतर तो माधवाच्या खोलींत गेला. बाबा आले आहेत हें त्याला आधींच कळलं होतं म्हणून तो बिछान्यावर उठून बसून वाट पाहात होता. माधवाच्या अंगावरून हात फिरवून हारानबाबूनें विचारलं, " तुला कसं वाटतं बाळ आतां ? "

" आज बरं वाटतं बाबा; पण बाबा तुम्ही इतके दिवस घरीं कां नाहीं आलांत ? कुठं होतां तुम्ही ? "

हारानचंद्र चांगलं एक खासं उत्तर शोधीतच होता.

माधवानें वाट न पाहतांच म्हटलें, " तुम्ही माझ्यासाठीं औषध आणायला गेला होता ना ? औषध आणलंत ? "

हारानबाबूंनी सुकलेल्या तोंडानें उत्तर दिलं,

" हो, आणलं आहे औषध."

" औषध चांगलं आहे ना? औषध घेतल्यावर बरं वाटेल ना मला?"

" वाटेल हो बाळ !"

" तर मग द्या" माधवानं हर्षभरित अंतःकरणानें हात पुढें करून म्हटलं.

बिचारा हारानबाबू संकटांत पडला. त्यानें थोडसं इकडं तिकडं करून म्हटलं, " आतां नाहीं घ्यायचं औषध; रात्रीं घ्यायचं आहे."

" बरं" त्यानं हसून म्हटलं. हारानबाबूच्या ह्या उत्तरावरही माधव संतुष्ट झाला. कांहीं वेळ आपल्या बापाकडे पहात राहिल्यानंतर त्यानं परत विचारलं, " बाबा, मला एक डाळींब आणून देतां ?"

हारानबाबूनें मान हलवून म्हटलं, " हो, देईन आणून हं बाळ."

थोड्याच वेळांत शुभदाही तिथें आली; तिला आपल्याजवळ बोलावून हारानबाबूनें म्हटलं, " दोन आण्याचे पैसे देतेस का मला ?"

" कशाला हवेत ?"

" मला एका गृहस्थाचें द्यायचे आहेत. तो मागायला आला आहे."

शुभदाने पैसे देण्याकरितां पेटी उघडली. तेवढ्यांत हारानबाबूने मान उंच करून पेटींत पाहिलं. त्यांत त्याला बरींच नाणीं दिसलीं.

दोन आण्याचे पैसे घेत त्यानें म्हटलं, " आणखिन् चार आणे असले तर दे. माधवला डाळींब आणून देतों."

शुभदानं दीन मुखानं पतीच्या चेहऱ्याकडं पाहिलं. इतके पैसे काढून द्यायला कदाचित तिला कठीण जात असावं. तरी पण तिने हारानबाबूला हवे तेवढे पैसे पेटींतून काढून दिले.

पैसे हातांत पडल्यावर हारानबाबूनें हंसत हंसत म्हटलं, " उद्याच मी हे तुझे पैसे परत करीन."

आपल्या नवऱ्याच्या बोलण्यावर विश्वास किती ठेवायचा हें ती जाणून होती. त्याच्या म्हणण्याला नुसतीच मान हलवून तिनं विचारलं, " आतां ह्या वेळीं बाहेर नाहीं गेलं तर चालणार नाहीं का ?"

" कां ?"

" थोडा वेळ विश्रांति घ्या. "

हारानचंद्रानें तोंड फिरवून म्हटलं, " असं कुठं झालं आहे ? विश्रांति घेऊन का कुठे आपला निर्वाह चालणार आहे ? अग माझ्या पाठीमागं कितीतरी कामं आहेत. "

" तर मग जा. "

हारानबाबू निघून गेल्यानंतर शुभदानें पेटी उघडली. आतां फक्त एकच रुपया शिल्लक उरला होता तींत. बिन्दूनं त्या दिवशीं दिलेले पैसे आतां संपत आले होते. एकच रुपया काय तो आतां तिचा आधार होता. तो रुपया पेटीच्या एका चोरखणांत लपवून ठेऊन ती माधवच्या जवळ येऊन स्वस्थ बसली.

" आई, बाबा डाळींब केव्हां आणतील ग ? "

" संध्याकाळीं. "

" संध्याकाळ झाली, रात्र पडली. तरी हारानबाबूंचा पत्ता नव्हता. बाबा केव्हां येतील, डाळींब केव्हां आणतील असे प्रश्न,माधवनें किती तरी वेळ विचारले. शुभदेचा " आतां " म्हणून उजाडेना. शेवटीं तो रडूं लागला.

शुभदा त्याच्याजवळ येऊन बसली. आणि समजूत घालूं लागली ललनाने नाना तऱ्हा करून त्याला विसर पडावा म्हणून प्रयत्न करून पाहिला; पण डाळींबाचा त्याला कांहीं विसर पडेना. शेवटीं तो रडून रडून थकला आणि झोपीं गेला.

उजाडायच्या आधीच त्याला जाग आली. त्यानं डोळे उघडून विचारलं, " आई, डाळींब बाबांनीं आणलं का ग ? "

शुभदानें मोठ्या कष्टानं आपले अश्रू आवरीत म्हटलं, " तूं डाळींब कसा खाणार बाबा ? "

" कां ? "

" डाळींब खाल्ल्यानं आजार वाढतो बाळ. "

माधव उठून बसला होता तो परत आडवा झाला.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं हारानचंद्राची स्वारी घरीं परत आली. रासमणि नाराज होऊन त्यांच्याशीं बोललीसुद्धां नाहीं. हारानबाबूला पाय धुण्यासाठीं ललनानं पाणी आणून दिलं; स्नानाची व्यवस्था केली आणि हुक्का ओढण्यासाठीं चिलीम भरून आणून दिली. हारानचंद्रांचं स्नान वगैरे करून जेवण आटोपलें.

शुभदानं हळूच भीत भीत त्याला विचारलं, "माधवाला डाळिंब आणणार होतां ना ?"

"अग हो— पण काय करूं? खिशांत ठेवले होते पैसे. डाळिंब घेतलं आणि खिशांत हात घातला तों खिसा फाटका ! पडले कुठं तरी ते. आणखी असले तर दे चार आणे. आतां जाऊन आणतो डाळिंब. घाबरूं नको. संध्याकाळीं तुला परत करीन तुझे."

शुभदानं सुकलेल्या तोंडानं म्हटलं, "माझ्याजवळ आतां एक पैदेखील नाहीं."

हारानचंद्रानं हसून म्हटलं, "असं कुठं झालंय् ? घरची लक्ष्मी तूं— लक्ष्मीचं भांडार रितं कधीं होईल का ?"

शुभदाच्या डोळ्यासमोर क्षणभरच लक्ष्मीच्या भांडाराचं चित्र नाचून गेलं.

तिनं खालीं मान घालून म्हटलं, "खरंच माझ्याजवळ आतां कवडी देखील नाहीं."

एवढं बोलून शुभदा गप्प बसली.

हारानबाबूनीं परत म्हटलं, "दोन पैशांसाठीं सुद्धां माझ्यावर विश्वास नाहीं तुझा ? रुपया नको. चार आणे पुरेत."

ह्यावर शुभदानें आणाखिन कांहीं आढेवेढे घेतले नाहींत. मुकाट्यानें हारानबाबूनं मागितले तेवढे पैसे तिनें काढून त्याला देऊन टाकले.



त्या रकमेचा सदुपयोग कसा चालला आहे हें पाहा. हारानचंद्र हलुदपूर गांव पार करून ब्राम्हणपाड्याला जाऊन पोचला. त्यानंतर एक गल्ली पार करून त्यानें बांबूंनीं आणि तट्ट्यांनीं बांधलेल्या एका घरांत प्रवेश केला. तिथें किती तरी माणसें लुल्ल होऊन एका कोपऱ्यांत बसलीं होतीं. हारानचन्द्राला पाहतांच त्यांनीं एकच गिल्ला करायला सुरुवात केली. प्रेमाला अगदीं ऊत आला. कुणी त्याला 'बाप्पा' म्हणून तर कुणी त्याला 'काका', 'मामा', 'मावसा' म्हणून हाक मारली. अशा प्रकारें मानसन्मानाचा स्वीकार करीत हारानबाबूनें त्या लोकांच्या मध्यभागीं आपलं आसन ठोकलं. नाना प्रकारच्या गप्पाष्टकांना सुरुवात झाली. किती तरी राजे–महाराजे आणि वजीर–दिवाणांचे खून पाडण्यांत आले आणि बिचाऱ्या लाखों प्याद्यांना खर्ची घालण्यांत आलं. तें अफूचं दुकान होतं. या जगांत अफूचं दुकान आणि स्मशान हीं दोनच स्थानं अशीं आहेत कीं, तिथें मानव प्राण्याचा कायापालट होतो. स्मशानांत राजे–महाराजे भिकाऱ्याप्रमाणेंच होऊन जातात आणि अफूच्या दुकानांत भिकारी स्वतःला राजे–महाराजे समजूं लागतात.

जसजशी अफूची गुंगी चढूं लागते तसतसा हृदयाचा मोठेपणा, शौर्य, वीर्य, धैर्य, पांडित्य गंभीरतेनं आणि विशालतेनं प्रकट स्वरूपांत आपआपलं दर्शन देऊं लागतात. किती तरी दान–प्रतिदान झालं; मणि, मुक्ता, हिरे, सोनं, किती तरी राज्यं आणि राजकन्या अफूच्या गुंगींत त्यांच्या डोळ्यासमोरून नाचून जाऊं लागल्या. एवढे सद्गुण, एवढी संपत्ति संसारांतल्या सगळ्या प्रकारच्या चांगल्या चांगल्या वस्तू, एकाच ठिकाणीं एकाच वेळीं ह्या मृत्युलोकांत

गोळा होणं कठीण आहे. सगळे मिळून त्या अर्धवट अंधार असलेल्या बांबूच्या घराचं मृत्युलोकांतील इन्द्रसभेंत कशा तऱ्हेनं रूपांतर करीत होते त्याचं वर्णन करणं माझ्या सामर्थ्याच्या बाहेर आहे. हळू हळू अंधार पडतो आहे हें पाहून किती तरी कालीदास, दिल्लीचे बादशाह, नवाब सिराजुद्दौला आणि किती तरी मियां तानसेन—एकेक असे मृत्युलोकांतील त्या इन्द्रसभेंतून बाहेर पडले. जगांतील हलक्या दर्जातील लोकांशी ते मिसळत नसत. त्यांच्याशीं गप्पा—गोष्टी केल्या तर आपल्या मानमरातबास धक्का पोंहचेल म्हणून त्यांना टाकून रस्त्याच्या कडेकडेनं आपआपल्या घराकडे जाऊ लागले.

हारानचन्द्रही त्यांच्याचप्रमाणें तट्ट्यांचा दरवाजा उघडून बाहेर आला. बाहेर आल्यानंतर त्यांच्यापुढें एक नवीनच प्रश्न उभा झाला. कशी कोणास ठाऊक त्यांना आजारी माधवची आठवण झाली आणि त्याबरोबरच डाळींबाचं-ही स्मरण झालं. त्या इन्द्रसभेंतून इतरांच्या प्रमाणें तोही कुंठल्यातरी एका भू-खंडाचा सम्राट होऊन बाहेर आला होता पण त्या काळतोंडच्या माधवच्या चेहऱ्यानं त्यांचें साम्राज्य गडगडून कोसळलें. दिल्लीच्या सम्राटानं खिशांत हात घालून पाहिलं पण खजिना रिता. एवढ्या महान् दिल्लीच्या साम्राटाजवळ चार पैसे आणि गांजाची चिलीम ह्याशिवाय दुसरं कांहींच शिल्लक नव्हतं. "बरं आहे" ह्या मंत्राचा जप करून ते जवळच्याच एका गांजाच्या दुकानांत शिरले.

आपल्या गोड गोड संभाषणानं त्या दुकानदाराला प्रसन्न करून त्यानें म्हटलं,

"काका, चार पैशाची तंबाखू तरी द्या."

दुकानदारानं त्याच्या आज्ञेचं तात्काळ पालन केलं.

तंबाखू घेतल्यानंतर हारानचंद्रानें एका झाडाखालीं मनपसंत जागा शोधून काढली आणि तिथें आसन ठोकून चिलमीच्या मदतीनं विस्कळीत झालेलं आपलं साम्राज्य फिरून जुळवूं लागला.

सगळं काम यथासांग झाल्यावर, रात्र फार झालेली पाहतांच त्यांनीं त्या झाडाच्या बुंधाचा त्याग केला. पुष्कळ दूर गेल्यानंतर एका झोंपडीजवळ जाऊन तिचं दार ठोठावीत त्यानें हांका मारायला सुरवात केली.

" कात्यायनी, अग ए कात्यायनी ! "

आंतून कुणीच उत्तर दिलं नाहीं.

त्यानें पुन्हां हांक मारली, " अग ए कातू, घरांत आहेस का ? "

——तरी आंतून उत्तर नाहीं.

हारानचंद्रानें आवाज चढवून म्हटलं, " घरांत आहेस तर एकदां दार उघडून जा ना ! "

पुष्कळ वेळ गेल्यानंतर आंतून एका स्त्रीचा अगदीं क्षीण आवाज आला, " कोण ? "

" मी——मी ! "

" मला बरं वाटत नाहीं——उठवत नाहीं मला. "

" असं काय करतेस ? जरा उठून दार उघड ना. "

ह्या वेळीं मात्र गलेलठ्ठ आणि काळ्याकुट्ट अशा एका तरुणीनं येऊन दार उघडलं. तिनें आपल्या साऱ्या शरीरावर गोंदून घेतलं होतं. ती कण्हत होती. " अग आई ग, माझं पोट किती दुखतंय ! एवढ्या मोठ्यानं ओरडायला काय झालं ? "

" ओरडायचीं काय मला संवय आहे ? दार उघडलं नाहीं तर ओरडावं लागतं. "

तरुणीला राग आला.

तिनं म्हटलं, " नाहीं बाबू, हें मला खपणार नाहीं. यायचं असेल तर लवकर येत चला. रात्रीं अपरात्रीं कुणाचीही पर्वा न करतां अशा तऱ्हेनं माझं नांव घेऊन मोठ्यानं ओरडतां——हें नाहीं चालूं देणार मी. अशा प्रकारची आरडाओरड मला सहन होणार नाहीं. आणि मला ती पसंतही पडणार नाहीं. "

हारानचंद्रानें आंत घुसून दरवाजा बंद करून घेतला; नंतर कात्यायनीकडे पाहून म्हटलं, " अरेरे ! तुझं पोट दुखतंय हें मला माहीतच नव्हतं. "

" सगळ्यांना माहीत आहे पण तुम्हाला कसं माहीत असणार ? कालपासून पोटांत पाण्याचा एक थेंबसुद्धां गेला नाहीं. बरं, पण एवढ्या अपरात्रीं कां आलांत ? "

“ एक काम आहे ? ”

“ कसलं ? ”

“ सांगतों, पण आधीं जरा तंबाखू तर देशील ? ”

त्या तरुणीनं नाखुषीनं घराच्या एका कोपऱ्याकडे बोट करून म्हटलं, “ त्या त्या कोपऱ्यांत सगळं कांहीं ठेवलं आहे. तंबाखू प्यायची असेल तर स्वत: सगळं हातानीं करून घ्या—मला आणाखिन् छळूं नका, मी थोडी आडवी होईन म्हणत्ये. ”

नंतर तंबाखू भरून हातांत हुक्का घेऊन कात्यायनीच्या शेजारी तिच्याच बिछान्यावर हारानचंद्र येऊन बसला. पुष्कळ वेळ तंबाखू ओढल्या-नंतर फारच हळू आणि धीम्या आवाजांत—आपला स्वर कर्कश न होईल ह्याची काळजी घेत—म्हणाले, “ कातू, आज तुला मला दोन रुपये द्यावे लागतील. ”

“ नाहीं ” कात्यायनीनं उत्तर दिलं.

“ अग ऐकतेस का पण ? का झोपलीस ?—आज मला दोन रुपये हवे आहेत. ”

कात्यायनी या कुशीची त्या कुशीवर वळली पण तिनं उत्तर दिलं नाहीं.

हारानचंद्राला थोडासा धीर आला. हुक्का जिथल्या तिथं ठेवून तिच्या अंगावर हात ठेवीत त्यानें विचारलं, “ देतेस ना ? ”

ह्यावेळीं मात्र कात्यायनीनं उत्तर दिलं.

“ निष्कारण कां उगीच कटकट चालवली आहे ? कुठून देऊं पैसे ? ”

“ कां ? तुझ्याजवळ पैसे नाहींत ? ”

“ नाहींत. ”

“ अग असं काय करतेस ? मला फार जरुरी आहे; एवढी दया कर माझ्यावर. ”

“ माझ्याजवळ असतील तर ना तुमच्यावर दया करूं ? ”

“ तुझ्याकडे दोन रुपये सहज निघतील. तुझ्याजवळ तेवढे खास आहेत हें मला माहीत आहे. तिकडे घरांत उपासमार चालू आहे आणि खरं

सांगूं माझ्या आजारी पोराच्या तोंडचा घास काढून आज माझं पोट भरलं आहे मीं. माझ्या मनांत कशी कालवाकालव चालली आहे. माझी मलाच लाज वाटत आहे. कातू, माझी आज लाज राख—माझं रक्षण कर. ”

“ माझ्याजवळ कांहीं असलं तरच मी लाज राखणार ना तुमची ? माझ्याजवळ तर एक फुटकी कवडी सुद्धां नाहीं ! ”

आतां मात्र हारानबाबूला राग आला. तो म्हणाला, “ पैसे नाहींत कसे ? तुझ्यासारख्या जवळ पैसे नाहींत तर कुणाजवळ असायचे ? मी इतके पैसे तुला दिले आणि माझ्या अडल्या वेळेला तूं दोन रुपये सुद्धां देत नाहींस ? ट्रंकेची किल्ली दे माझ्याकडे. मी ट्रंक उघडून पाहतो. ”

कात्यायनीला तोंडांत मारल्यासारखं झालं; एक शिवी हासडून ती उठून बसली आणि हारानबाबूकडे एक जळजळीत कटाक्ष फेकून म्हणाली, “ कां, तुम्ही कोण आहांत माझे म्हणून मी तुम्हाला माझ्या ट्रंकेची किल्ली देऊं ? ”

ती बाई हलकट होती, अपशब्दांचा उपयोग करतांना तिला बिलकूल लाज वाटत नव्हती.

विनासंकोच ओरडून ती म्हणाली, “ ज्यावेळीं मी तुमची रखेली होतें त्यावेळीं दिले तुम्ही मला पैसे. पण त्याचा अर्थ असा होत नाहीं की तुमच्या वाईट परिस्थितींत ते सगळेच्या सगळे तुम्हाला मी परत करावेत ! ”

हारानबाबू लाजेनें चूर होऊन गेला. कात्यायनीशी तो कधींच सामना करीत नव्हता, आजही त्यानें केला नाहीं. अतिशय दीन होऊन त्यानें म्हटलं, “ तरी पण प्रेमासाठीं म्हणून तरी एवढे उपकार कर ! ”

“ चुलींत गेलं प्रेम ! काय म्हणून मी तुमच्यावर आतां प्रेम करूं ? आज तीन महीने झाले एक फुटकी कवडी तरी आणून दिलीत का ? ”

“ छी अशा गोष्टी तोंडानं बोलूं नये, कातू, काय तुझं माझ्यावर प्रेम नाहीं ? ”

“ मुळींच नाहीं, रतीभर सुद्धां नाहीं. बाबू, आमच्या पोटाकरतां आम्हीं तुमच्यावर प्रेम करतो. आम्ही काय तुमच्या घरच्या बायका आहोंत ? गळ्यावर सुरी फिरत असताना सुद्धां बिचाऱ्यांना प्रेम करावं लागतं ! तुमच्याशिवाय काय

मला दुसरा कुठं आश्रय नाहीं ? जो आम्हांला पैसे आणून देतो त्यालाच आम्ही मानतो. त्याच्यावरच आम्ही प्रेम करतो !—जा आतां घरीं जा, एवढ्या अपरात्रीं आतां मला छळू नका. ”

“ सगळंच संपलं का कातू ? ”

“ कधींच ! आतांपर्यंत मी तुमचा मान ठेवीत आले म्हणून कांहीं बोलले नाहीं. आज जेव्हां तुम्ही आपण होऊनच विचारलंत तेव्हां स्वच्छच सांगून टाकते कीं तुम्ही कांहीं भले गृहस्थ नाहीं. तुम्ही आतां माझ्याकडे येत जाऊं नका; जमिनदाराचे पैसे चोरून जेलमध्यें जाण्याची पाळी आली होती तुमच्यावर. सध्यां नौकरीबिकरीसुद्धां नाहीं. कुठल्या वेळीं माझा सत्यनाश कराल कुणी सांगावं ? म्हणूनच हात जोडून सांगते कीं माझा नाद सोडा, पुन्हां कधीं इकडे फिरकू नका. ”

कात्यायनीच्या ह्या छी थू मुळं हारानचंद्र किती तरी वेळ खालीं मान घालून स्वस्थ बसला होता.

त्यानंतर त्यानें वर मान करून म्हटलं, “ ठीक आहे, यापुढें मी तुझ्या घरीं येणार नाहीं. तुझ्यासाठींच मी चोरी केली, तुझ्यामुळेंच मी लम्पट म्हणवून घेतलं आणि तुझ्यामुळंच माझ्या बायकोला कच्च्याबच्च्यांना एकापरीनं सोडून दिलं होत; शेवटीं तूंच...... ”

कांहीं वेळ गप्प राहिल्यानंतर परत हारानचंद्रानेच म्हटलं, “ बरं झालं आज माझे डोळे तरी उघडले—”

हारानचंद्राचे हे शब्द ऐकून कात्यायनी नरम पडली; थोडंसं सरकून बसत ती म्हणाली, “ देव करो आणि खरोखरीच तुमचे डोळे उघडू देत. आम्ही लोक हलक्या जातीचे आहोत, नीचच आहोत—तरी पण आम्हालासुद्धां एवढं समजतं कीं पहिल्यांदा घरदार, मुलं—बाळं आणि नंतर इतर; खायला प्यायला व्यवस्थित असल्यानंतर माणसाने गांजा अफू वगैऱ्यांचा शोक करावा. तुमचं वाईट व्हावं असं मी मुळींच म्हणत नाहीं—तुमच्या चांगल्यासाठींच मी सांगतें. पुन्हां तुम्ही माझ्याकडे येऊं नका, अफूच्या दुकानांची पायरी चढूं नका. घरीं परत जा, घर—दार, मुलां—बाळांची काळजी घ्या. कुठें तरी एखादी

नौकरी करा, मुलां–बाळांच्या पोटापाण्याची व्यवस्था करा आणि मग तुम्हाला वाटलं तर माझ्याकडे या, मी नाहीं म्हणणार नाहीं."

कात्यायनीनं अंथरुणावरून उठून ट्रंकेंतून दहा रुपये काढून हारानचंद्राच्या हातांवर ठेवीत म्हटलें, " हं हे घ्या."

हारानचंद्र एवढंसं तोंड करून, निरुत्तर होऊन किती तरी वेळ तसाच बसला होता. शेवटीं मान हालवून त्यानें म्हटलें, " नको आतां. मला त्याची गरज नाहीं."

कात्यायनी हंसली.

आपल्या हातानं हारानचंद्राचं तोंड वर करून म्हणाली, " जी तुम्हाला ओळखत नाहीं तिच्यावर राग काढा. हे घेऊन गेला नाहींत तर उद्यां तुम्हा सगळ्यांना उपास काढावा लागेल हे माहीत आहे ना ? "

" कां ? "

" घरीं कांहींसुद्धां नाहीं तुमच्या. "

" हें तूं कसं ओळखलंस ? "

" मुलाच्या तोंडांतला घास काढून माझं पोट मी भरलं आहे असं आतां तुम्हीच म्हणालात ना ? "

" ओः—"

" तेवढ्यावरूनच मी ओळखलं नाहीं. तुम्हीं सांगायच्या आधींच मला सगळं ठाऊक होतं ! मी तुमच्या घरीं जाऊन प्रत्यक्ष सगळं पाहून आलें आहे."

" केव्हां ? "

" एक तर बायकांना कुठं काय चाललं आहे हे पहाण्याची स्वाभाविकच इच्छा असते, आणि दुसरं सगळं ऐकून पाहून चहूंकडली बातमी हातीं असल्याशिवाय आमच्यासारख्या बायकांचा निभाव लागत नाहीं. तुम्ही लोक जितके मूर्ख आहांत, तितक्या आम्ही बायका मूर्ख नाहींत. तुमच्यासारख्यांची घरी बायको असते, मुलं-बाळं असतात, सगे–सोयरे, आप्तेष्ट, मित्र सगळेच असतात. आपत्कालीं तुम्हाला त्यांची मदत होऊं शकते; परंतु आमचं कोण आहे ? एकदां पडल्यानंतर आम्हाला उभें कोण करणार ? भुकेनं आणि उपासमारीनं आमच्यासारख्या बायकांचा जीव जरी जात असला तरी आमची कुणाला दया

येणार नाहीं. ज्यांचा कुणी नाहीं त्यांचा देव असतो असं लोक म्हणतात परन्तु आम्हा अभागिनींना त्याचाही पण आधार नाहीं. म्हणूनच आम्हाला सगळं पाहून ठेवून वागावं लागतं. नाहीं तर आमचा निभाव कसा लागणार ? समजलं ? " या गोष्टी उघड करून सांगत असतांना तिला त्रास होत होता. त्यांत अस्वाभाविक असं कांहींच नव्हतं. परंतु लगेच आपल्याला सांवरून घेऊन तिनं तो त्रास बाहेर दाखवला नाहीं.

हारानचंद्राचं डोकं आपल्या हातानं हालवून ती म्हणाली, " मी जें कांहीं आतां बोलले तें सगळं समजलं का ? हे रुपये आपल्या बायकोच्या हातांत द्या—दोन दिवस तरी चांगले जातील. स्वतःजवळ मुळींच ठेवूं नका ते. —ऐकलं का ? "

हारानचंद्राचें चित्त ठिकाणावर कुठं होतं ?

मान हालवून त्यानें म्हटलं, " हो. "

" रात्र फार झाली आहे, आतां आणखिन कुठं जाऊं नका. इथंच झोपून जा. "

## ६

सदानंद चक्रवर्तीला गांवातले लोक ' सदा दादा ' म्हणून हांका मारीत असत. बाकीचे लोक ' वेडा सदा ' म्हणत. ह्याच हलुदपूर गांवांत तो रहात होता. त्याचा बाप कट्टर हिंदू होता. इंग्रजी भाषा म्लेंच्छाची आहे—इंग्रजीचा अभ्यास केला तर धर्म नष्ट होतो ह्या भीतीनं त्यानं आपल्या मुलाला शिक्षण

दिलं नव्हतें; आणि शिक्षणाची आवश्यकता तरी काय होती ? आठ–दहा एकर बिघे घरच्या मालकीची जमीन असल्यावर दुसऱ्यांची नोकरी कां करावी लागणार त्याला ? मग जीवाला व्यर्थ कष्ट देण्यांत काय लाभ ? कुणी म्हणत, त्यानं संस्कृत भाषेचं अध्ययन केलं आहे; कुणी म्हणत त्यानं कांहींच केलं नाहीं. कांहीं कां असेना त्याच्या विद्वत्तेविषयीं मतभेद असला तरी तो वेडा आहे ह्या बाबतींत मात्र कुणाचेच दुमत नव्हतें. त्याच्या स्वभावांत वेडेपणाची थोडीशी तरी छटा असावी हा लहानापासून थोरापर्यंत समज. तो शेतांची रखवाली करतो, वेळीं अवेळीं गात असतो, प्रेतांची राख फुंकायला जातो आणि घरोघर हिंडतो, फिरतो; तर मग अशा लक्षणांना वेडेपणा म्हणूं नये तर लोकांनीं दुसरं तरी काय करावं ? नातलगांपैकीं दूरच्या आतेशिवाय त्याला दुसरं कुणीच जवळच नव्हतं. म्हणून त्यानें साऱ्या गांवाला आपलासा करून टाकला होता. गांवचे सगळेच त्याचे आत्मीय स्वजन होते. गांवांतील प्रत्येक घराचा दरवाजा नेहमीं त्याच्यासाठीं उघडा असे आणि गांवातील प्रत्येक माणसाशीं घरांतल्या माणसासारखा तो वागत असे. पहिल्यांदाच सांगितलं आहे कीं, त्याच्या घरांत त्याच्याशिवाय दुसरं कुणीच नव्हतं. त्याच्या बापानें पुष्कळसा पैसा देऊन लहानपणींच त्याचं लग्न केलं होतं. परंतु दुर्दैवानें लग्नानंतर एका वर्षानेंच त्याची बायको मरून गेली होती. आज सहा वर्षे झालीं. सदानंद अजून एकटा सडाफटिंगच आहे. लग्नाला लागणारा पैसा त्याच्याजवळ जमला नाहीं म्हणून म्हणा किंवा दुसऱ्या लग्नाची त्याची इच्छा नव्हती म्हणा; सदानंदानं अजून तरी दुसरं लग्न केलं नव्हतं. त्याच्या भाऊबंदांत मोठी रक्कम घेतल्याशिवाय मुलगी देण्याची प्रथा नव्हती. त्यामुळें कुणी त्याला लग्नासंबंधीं प्रश्न केला कीं, तो चट्कन् उत्तर देत असे, “इतके रुपये आणायचे कोठून बाबा ?”

आज तिसऱ्या प्रहरीं ढगांनीं पुन्हां आकाशांत गर्दी केली. सगळीकडे अगदीं निश्चल आणि स्तब्ध होतं, झाला तर खूप जोराचा पाऊस पडेल नाहींतर तीन चार तास तरी पाण्याचा एक थेंबसुद्धां पडणार नाहीं.

अशा वेळेला घरांतून रासमणीनं हांक मारून म्हटलं. " अग ए ललना घरांत एक थेंबभरसुद्धां प्यायला पाणी नाहीं; चटदिशी घाटावर जाऊन एक कळशी तरी भरून घेऊन ये मुली. "

कमरेवर कळशी ठेऊन ललना नदीच्या घाटावर आली. पाणी भरून घेऊन दोन पाऊलं ती पुढें जाते न जाते तोंच ढगांतून टप् टप् करून मोठे मोठे पाण्याचे थेंब पडूं लागले. घाईघाईनं ललना घराकडे जाऊं लागली.

सदानंदाचं घर वाटेवरच होतं. रस्त्याच्या कडेला असलेल्या व्हरांड्यांत बसून त्यावेळीं तो एक भजन म्हणत होता. ललनाला भिजतांना पाहून त्यानं आपलं भजन बन्द केलं आणि म्हणाला,

" ललना, भिजत कां जात आहेस ? "

ललनानं हसून उत्तर दिलं, " तुम्ही गाणं का बन्द केलंत ? "

सदानंदालाही हंसू आलं; हास्य आणि गाणं सदानंदाच्या ओठांवर अष्टौप्रहर असायचें. गाण्याच्या सुरांतच त्यानं उत्तर दिलं, " गाणं पूर्ण झालं म्हणून. " त्यानंतर नेहमींच्या स्वरांत त्यानं म्हटलं, " तें सगळं राहूंदे. उगीच भिजत जाऊं नकोस, इथं थोडा वेळ थांब आणि नंतर जा. "

ललना व्हरांड्यात येऊन उभी राहिली. कांहीं काल सदानंद तिच्या चेहऱ्याकडे एकटक पहात होता. नंतर तो म्हणाला " इथं थांबू नकोस, घरीं जा. "

" कां बरं ? "

" आत्या घरांत नाहीं. शिवाय बराच वेळ पाऊस थांबला नाहीं तर तूं घरीं कशी जाणार ? "

थोडासा विचार करून पाहिल्यानंतर सदानंद म्हणतो तेंच बरोबर आहे असं ललनाला वाटलं; ती थोडीशी पुढें गेली परंतु पुन्हां परत आली. तिला परत आलेली पाहतांच सदानंदानं विचारलं, " परत कां आलीस ? "

" काल रात्रीं मला ताप आला होता; आणि भिजल्यानंतर ताप अधिक वाढतो म्हणतात. "

" तर मग जाऊं नकोस, इथंच थांब. "

सदानंदानं परत गाणं म्हणण्याला सुरवात केली.

*प्राप्त न होणार कां ती,*
*व्यर्थ उभाच खडा.*
*जळतो मी ज्वालेत सदाकदा*
*प्रस्तूर-मूर्ति तू आई*
*बुडणार आता नाव तरी*
*माझी सोन्याची........*

कळशी खालीं ठेऊन ललना गाणं ऐकत उभी होती. ते सुस्वर गाणं ऐकून ती तल्लीन होऊन गेली. अचानक सदानंदानं गाणं मध्येंच थांबवलं तें पाहून ती म्हणाली, " कां, गाणं का थांबवलंत ? '

"आतां पुढें नाहीं गाणार मी."

" कां ? "

" पुढले चरण मला पाठ येत नाहींत."

ललनेनं हंसून विचारलं, " पूर्ण न येणारं गाणं मग गायला कां लागलांत ?"

" मी आपला असाच गात असतों." त्यानंतर कांहीं वेळ आकाशांतील मेघांच्याकडे तो एकटक पहात राहिला. क्षणभरानं त्यानं म्हटलं, " ढगांतच कमळं फुलतात; पाहिलीं आहेस कधीं तूं ? "

ललनानं हंसून म्हटलं, " नाहीं तुम्ही पाहिलीं आहेत ? "

" हो आहे. "

" कधीं ? "

" मी तर नेहमीच पहातों आकाशांत ढग जमा होतात त्या वेळीं. "

सदानंदाच्या गंभीर चेहरा पाहून ललनाला हंसूं लोटलं. तोंडांत पदर कोंबून तिनं विचारलं, " असं कधीं झालंय ? '

" कां बरं ? पाण्यांतच कमळ उगवतं ना ? ढगांत तर पाण्याची कमतरता मुळींच नसते, मग तिथे कां नाहीं कमळ उमलणार ? "

" पाण्यांत चिखल असल्याशिवाय कमळाचं फूल कधीं उमललं आहे ? "

पुष्कळ वेळपर्यंत ललनाकडे पांहून सदानंदानं उत्तर दिलं, " ठीक आहे म्हणून सुकून जातं "

ललना त्यावर कांहीच बोलली नाहीं, ती स्वस्थ उभी होती. सदानंद हा दिवसभर अशाच प्रकारच्या न होणाऱ्या गोष्टी वेड्यासारखा बडबडत असतो हे सगळ्यांनाच मोंहित होतं.

कांही वेळ स्तब्ध राहून पुन्हा सदानंदानेच प्रश्न केला, " ललना, आजकाल शारदा तुमच्या घरीं येत नाहीं का ? "

सदानंदाचा प्रश्न ऐकतांच ललनानं आपलं तोंड दुसरीकडे फिरवलं. यावेळचा आपला चेहरा दाखविण्याची तिची इच्छा नसावी.

सदानंदानं पुन्हा तोच प्रश्न केला, " येत नाहीं का ? "

" नाहीं. "

" कां ? "

" मला काय माहीत ? "

सदानंदानं परत गाण्याला आरंभ केला—

गाणं थांबलं परंतु पाऊस थांबत नव्हता. उलट आकाशांत जास्तच ढग जमा झाले होते.

ललनानें कळशी उचलून कंबरेवर ठेवली हें पाहून सदानंदानं म्हटलं,

" अरे. हें काय ? कुठं चाललीस ? "

" कां ? घरीं जाते "

" पावसातून भिजत गेलीस तर ताप नाहीं का वाढणार ? "

" वाढला तर त्याला काय करायचं ? "

ललना निघून गेल्यानंतर सदानंदानं आपलं गाणं परत सुरू केलं.

# ७

हारानचंद्रानें आपल्या पत्नीच्या हातांत सगळेच्या सगळे दहा रुपये मोजून दिले त्या वेळीस शुभदाला हसूं येऊनही तिच्या चेहऱ्यावर तें उमटलं नाहीं. उलट तिचा चेहरा उतरून गेला आणि तिनं खालीं मान घालून विचारलं. " हे रुपये तुम्ही आणलेत कुठून ? "

रुपये देतांना हारानचंद्राचा चेहरा देखील उतरलेलाच होता. कांहीं काल स्तब्ध राहून त्यानें विचारलं, " शुभदा, हे रुपये मी चोरून आणलेत असं तुला वाटतं ? "

हारानबाबूच्या ह्या प्रश्नामुळं शुभदाचा चेहरा आणखीन् उतरला. तिच्या मनांत एकदां हीच शंका डोकावून गेली होती. परंतु तिनं तोंड उघडलं नव्हतें. ईश्वर करो आणि ही शंका खोटी ठरो. खरी ठरली तर ह्या दहा रुपयांचा स्वीकार करणं चांगलं होईल का ? चोरीच्या पैशानं आपलं पोट जाळण्यापेक्षां कांहीं न खातां-पितां उपाशी मरायला ती तयार होती, परंतु बाकीच्यांचं काय ? प्राणाहूनही प्यार अशी तिची मुलं होतीं ! पुढं विचार करायला तिला वेळ कुठें होता ? तिनें मुकाट्यानें ते दहा रुपये घेतले आणि ट्रंकेंत ठेऊन दिले.

थोड्याशा सुखांत दिवस जात होते. हारान मुकर्जी हलुदपूर गांवांत दिसत नव्हता. घरीं आल्यानंतर रासमणि विचारीत असे, " तूं सारा दिवस असतोस तरी कुठं ? ' त्या वेळीं हारान उत्तर देत असे "मला कितीतरी कामं आहेत; नौकरीच्या शोधाकरितां हिंडावं लागतंय् जिकडे तिकडे."

शुभदाही हाच विचार करीत असे. कारण आतांशा तो तिच्याजवळ पैसे मागायला येत नसे. उद्यां परत करीन ह्या वायद्यावर दोन-चार आण्याचे पैसेसुद्धां घेऊन जात नसे. परंतु मला विचारलंत तर मी तुम्हाला बरोबर सांगेन. कारण तो काय करीत असतो हें मला माहीत आहे. सगळा दिवस कांहींच न खातां न पितां तो नौकरीसाठीं वणवण हिंडत फिरत असतो. कितीतरी लोकांच्या जवळ जाऊन आपली करुण कहाणी त्यांना ऐकवितो, कितीतरी अडत्यांच्याकडे नव्हे मामुली दुकानदारांच्याकडे जाऊन सुद्धां नौकरी मागतो, परंतु व्यर्थ ! कुठेंच त्याचं जमत नव्हतं. त्या भागांत त्याला लोक ओळखत होते त्यामुळें त्याला नौकरी देऊन त्याच्यावर विश्वास टाकायला कुणीच तयार होत नव्हतं. संध्याकळीं निराशेनं उतरलेल्या चेहऱ्यानें घरीं परत आला कीं शुभदा त्याला विचारीत असे, " आज कुठं खाल्लंत ? "

आपल्या बायकोचा प्रश्न ऐकून हारानबाबू हंसण्याचा प्रयत्न करी नंतर उत्तर देई, ' मला खायला काय कमी आहे ! मला कोण ओळखत नाहीं ? '

शुभदा त्यावर कांहींही न बोलतां गप्प बसत असे. हळू हळू कळशींतलं पाणी कमी होत चाललं होतं – तिच्याजवळचे रुपये सरत चालले होते. दोन तीन दिवसांच्या पोटगी पुरते पैसे शिल्लक होते. परंतु तोंड उघडून आपल्या पतीला तें सांगण्याचं धैर्य कांहीं तिला होत नव्हतं. कुणालाच सांगायची तिला इच्छा होत नव्हती; मनांतली गोष्ट मनांतच ठेऊन त्याच्यावर जाळं विणीत ती बसत असे.

आज तीन दिवसांनंतर रात्रीं थकलेल्या पतीचे पाय चेपीत असतां मनांत येणाऱ्या असंख्य तर्क–वितर्कांशीं झगडून तिनं आपलं तोंड उघडलं. " सगळे पैसे संपून गेले. आतां पै देखील हातांत नाहीं. " हारानचंद्रानें डोळे मिटलेले ठेऊनच म्हटलं, " अवघे दहा रुपये! किती दिवस पुरणार ते ? "

या प्रश्नोत्तरानंतर त्या दोघांमध्यें रात्रभर कांहींच बोलणें झालें नाहीं. उद्यांच कसं करायचं असें विचारायचं शुभदाच्या मनांत राहून राहून येत होतं परंतु धीर झाला नाहीं. तो आपलाच अपराध असं तिला वाटत होतं म्हणून ती गप्प राहिली. पैसे इतक्या लवकर कसे खर्च झाले, अशीं बोलणीं जर तिला

आपल्या पतीकडून खावीं लागलीं असतीं तर त्याला आपल्याकडून उत्तर देण्याचा तिनं खरोखरीच प्रयत्न केला असता, परंतु बोलण्याऐवजीं पतीकडून तिला सहानुभूति मिळाली होती. त्यामुळें तिच्या तोंडांतून चकार शब्द बाहेर पडला नाहीं.

दुसरा दिवस उजाडायच्या आंतच हार नचंद्र निघून गेला. ललना रोजच्या प्रमाणें घरचा कामधंदा पाहूं लागली आणि रासमणि स्नानादिक कामं आटोपून शिवपूजेला लागली. एकटी शुभदा काय ती घरांत स्वस्थ बसून होती. ती तरी काय करणार बिचारी ? तिच्या हातापायांतली शक्तीच नाहींशी झाल्यासारखी झाली होती. सुकलेल्या चेहऱ्यानं थोडं इकडं हें करीत, थोडं तिकडं तें करीत, ती वेळ घालवूं लागली.

आठ वाजून गेले तेव्हां ललनानं विचारलं, " आई, अजून तूं स्नानाला नाहीं गेलीस ? किती उशीर झाला ! "

" ही चाललेंच. "

कांहीं वेळानंतर ललनानं येऊन पाहिलं तों तिची आई अजून तशीच तिथंच्या तिथंच उभी आहे ! तिला आश्चर्य वाटलं. तिनं विचारलं,

" काय झालं आहे, आई, तुला ? "

" कुठं काय ? कांहींच नाहीं. "

" मग अशी उभी कां ? "

" तर काय करूं ? "

" कां ? स्नान नाहीं करायचं ? स्वयंपाक नाहीं करायचा ? "

शुभदानं आपले दोन्ही कातर डोळे कन्येच्या चेहऱ्यावर लावून भय व्याकुळ स्वरात म्हटलं, " आज कांहींच नाहीं ? "

" काय नाहीं, आई ? "

" कांहींच नाहीं, घरांत एक पसाभर तांदुळसुद्धां नाहींत. "

ललनाचा चेहरा खर्रदिशीं उतरला. तिनं घाबरून विचारलं, " आतां कसं होईल, आई ? मुलं काय खातील ? "

शुभदानं दुसरीकडं तोंड फिरवून म्हटलं, " देवाला माहित ! "

कांहीं वेळानंतर शुभदानंच म्हटलं, "ललना, तूं बिन्दु आत्याकडे जाशील का ?"

"कशाला, आई ?"

"ती कांहींतरी देईल कदाचित्."

ललना निघून गेल्यानंतर शुभदाच्या डोळ्यांतून आंसवांची धार लागली. पूर्वी तिनं असं कधींच केलं नव्हतं. आपल्या मुलीला दुसरीकडं भीक मागायला कधींच तिनं पाठवलं नव्हतं. राहून राहून ही गोष्ट तिच्या मनाला खात होती, लाजही वाटत होती आणि अभिमानही वाटत होता. कुणाचा अभिमान ? कदाचित आपल्या पतीच्या चेहऱ्याचं स्मरण करून तिनं आकाशाकडे बोट दाखवून म्हटलं असतं "त्यांचा !"

ललना गेल्यानंतर शुभदा गालांवर हात ठेवून किती तरी वेळ तिथेंच स्वस्थ बसून होती. जवळ जवळ अकरा वाजतां लांकडी बाहुलीला कपड्यांनी गुंडाळून आणि तिच्या बिनहातापायाच्या शरीराला कांचेच्या मण्यांनीं सजवून छलनामयी शुभदाच्या समोर येऊन उभी राहिली. आईजवळ येतांच छलनानं मागणी केली, "आई, भात दे."

शुभदानं फक्त छलनामयीच्या चेहऱ्याकडं पाहिलं; पण ती कांहींच बोलली नाहीं.

छलनानें पुन्हां मागणी केली, "उशीर होतो आहे, आई. भात दे ना."

तरी पण शुभदा गप्पच.

बाहुलीला एका हातांतून दुसऱ्या हातांत घेत छलनानं आणखी आवाज चढवून विचारलं, "काय, भात अजून नाहीं झाला ?"

शुभदानं मान हालवून म्हटलं, "नाहीं."

"कां नाहीं झाला ? उशीरां उठलीस वाटतं ?"

त्यानंतर कसला तरी विचार करून छलना स्वयंपाकघरांत गेली परंतु तिथे चूल अजूनही थंड असलेली पाहून रागवून ओरडून म्हणाली, "अजून चूलसुद्धां पेटवली नाहींस ?"

शुभदानं बाहेरूनच चिडून उत्तर दिलं, "आतां पेटवतें."

छलना परत बाहेर येऊन आपल्या आईजवळ उभी राहिली. आईचा सुकलेला चेहरा पाहतांच ती वरमली. आपल्या आईजवळ बसून तिनं विचारलं, " आई, अजून कांहींच झालेलं नाहीं कीं ग. "

" आतां सगळं होईल. "

" आई, आज तूं अशी काय करते आहेस ? "

माधवनं त्याच वेळीं खोलींतून हांक मारली, " आई—"

माधवची हांक ऐकतांच शुभदा घाबरून उठून उभी राहिली. ललनाही उठून उभी रहात म्हणाली, " आई, तूं बैस. मी जातें माधवकडे."

" बरं आहे. "

ललनानं आपल्या वरून निघून मागल्या दारानं भवतारण गंगोपाध्याय महाशयांच्या घरीं प्रवेश केला; परंतु बिन्दु तिथं नव्हती. आदल्या रात्रींच ती सासरीं निघून गेली होती. अचानक सासरचं बोलावणं आल्यामुळें तिला निघून जावं लागलं होतं; नाहींतर सासरीं जाण्यापूर्वीं तिनं शुभदाची भेट नक्कीच घेतली असती. एवढंसं तोंड करून ललना परत फिरली. घरीं जायला तिचे पाय उचलत नव्हते. गांगुलीमहाशयांच्या घरीं जातांना सुद्धां लाजेनं तिचे पाय उचलत नव्हते, परंतु आतां रिकाम्या हातांनीं घरीं परत जात असतांना तर तिला जास्तच लाज वाटूं लागली होती. पुष्कळ वेळ रस्त्याच्या कडेला एका झाडाखालीं उभी राहून ती विचार करीत होती. आणि एकदम तिच्या मनांत काय विचार आला हें माहित नाहीं, ती एकदम तडक गंगेच्या घाटाकडे जाणाऱ्या रस्त्यानं जाऊं लागली. जवळच सदानंदाचं घर होतं. खोलीच्या समोर बाहेर एका वासराला तो गोंजारीत उभा होता. ललना तिथंच जाऊन जवळ उभी राहिली. मान वळवून ललनेला पाहतांच सदानंदानं म्हटलं, ' " ललना तूं ? "

" आत्या घरीं आहे ? "

" नाहीं, आत्तांच कुठं तरी बाहेर गेली आहे. "

ललनेचं मन द्विधा झालं आणि झटदिशीं मागें सरकून ती उभी राहिली.

सदानंदानं वासराला सोडून दिलं आणि ललनाच्या चेहऱ्याकडे पाहात विचारलं, " आत्याकडे कांहीं काम होतं ? "

" हो."

"ती तर आतां घरीं नाहीं. मला सांगितलंस तर चालणार नाहीं का? "

ललनाही तोच विचार करीत होती. परंतु सदानंदानें विचारतांच तिचा चेहरा लाजेनं लाल होऊन गेला. " घरीं शिजवायला कांहीं नाहीं म्हणून मी तुमच्याकडे आलें आहे " असं का ती सांगणार होती ? छे: छे: ही गोष्ट सांगण्यासारखी आहे का ? एक दिवस कांही न खालं तर चालणार नाहीं का ? परंतु बाकीच्यांचं काय ? शुभदाच्या मनांत जो विचार आला होता तोच विचार ललनेच्या मनांत पण आला. ललना गुपचुप उभी होती. तिला तोंड उघडून सांगतां येत नव्हतें. तोंड उघडून तसं सांगणं किती कठीण आहे, हें ज्यांच्यावर म्हणून असा प्रसंग आला आहे त्यांनाच कळेल ! जेव्हां एकाद्या सभ्य गृहस्थावर आपलं दैन्य उघड करून सांगण्याची पाळी येते तेव्हां त्याच्या हृदयाला कशा यातना होतात आणि त्याची जीभ आंतल्या आंत कशी आंखडून जाते, हें तोच सांगु शकेल. ललनेच्या तोंडून एकही शब्द बाहेर पडला नाहीं. परंतु तिचा उदास, केविलवाणा चेहरा पाहतांच सदानंदाच्या लक्षांत सगळं आलं होतं. त्यानें हसून तिचा हात धरला. सदानंद वेडा आहे हे सगळ्यांना माहीत होतं, त्याची बुद्धि स्थिर नाहीं हें पण सारेच जाणत होते. त्यामुळें त्याच्या कृतीला कुणीच नांवं ठेवीत नव्हतें. दुसऱ्याला जिथं संकोच झाला असता तिथं त्याला कधींच संकोच वाटला नव्हता. दुसऱ्याला जें शोभलं नसतं, कदाचित् तें त्याला शोभलं असतं. म्हणून त्यानें विनासंकोच पुढें होऊन स्वच्छंदपणानें ललनाचा हात धरला होता. ललनेचा हात धरून त्यानं हंसून म्हटलं, " आपल्या सदादादाला सांगायला ललनाला लाज वाटते ? छे: वेडी कुठली ! आपल्या सदादादाशीं का कुठें लाज धरावी लागते ? " त्यानंतर हात सोडून त्यानं विचारलं, " का कांहींच सांगणार नाहींस ? "

सदानंदाचा कंठस्वर, त्याच्या बोलण्याची तऱ्हा—सगळं सारखं आहे. हंसण्या–हंसण्यांत तो कधीं कधीं असं बोलून जातो कीं तें ऐकलं म्हणजे

डोळ्यांतून आपोआप आंसवांची धार सुरू होते; तरीसुद्धां सदानंदाच्या ह्या बोलण्याचा परिणाम ललनावर कांहींच झाला नाहीं. ती स्तब्धच उभी होती. सदानंदानें थोडा वेळ वाट पाहिली. मग मात्र मान वर करून तो गंभीरतेनं म्हणाला, " कां ग ललना, काय, झालें आहे काय ? "

ललनानें मान खालीं घालून, डोळे पुशीत भरलेल्या गळ्यानं म्हटलं, " मला एक रुपया द्या. "

सदानंद पहिल्यासारखाच किंबहुना त्यापेक्षांही जोरानं हंसून म्हणाला " बस्स एवढंच ना ! एवढ्याशा गोष्टीसाठीं इतकी लाज, इतका संकोच ? हीच गोष्ट सदादादाला सांगतां येत नव्हती वाटतं ?--बरं, रुपया घेऊन तूं काय करशील ? "

पुन्हां लज्जा आणि संकोच ! ललनेनं थोडसं इकडं-तिकडं करून शरमेनं आणखी लाल होऊन म्हटलं, " बाबा घरीं नाहींत. "

घरांतून एकाऐवजीं पांच रुपये आणून तिच्या हातावर ठेवीत सदानंदानं म्हटलं, " अरे, जो खराखुरा मनुष्य असेल त्याच्याशीं लाज धरायची ? वेड्या जवळ कुणी लाज धरतं ? " त्यानंतर दुसरीकडे तोंड फिरवून त्यानें हंसून म्हटलं, " पुन्हां जरूर लागली तर पहिल्यांदा ह्या वेड्याला येऊन सांग. कां सांगशिल ना ? "

आपल्या हातांत एकापेक्षां जास्त रुपये पाहून ललना म्हणाली, " एवढे रुपये घेऊन मी काय करूं ? "

" ठेवलेस तर त्यांना कांहीं कीड लागणार नाहीं. "

" तरी पण इतक्या रुपयांची आम्हाला गरज नाहीं कांहीं. "

रुपये परत करण्याचा तिचा बेत पाहून परत सदानंदानं तिचा हात धरून म्हटलं, " छे लहान मुलासारखं वागूं नकोस. ज्या वेळीं पैशाची तुला आवश्यकता वाटणार नाहीं त्या वेळीं वाटल्यास कधीं तरी परत आणून दे. पण हें पाहा, कुणाला सांगूं नकोस हं. समजा, कुणी विचारलंच तर सांग सदानंदानं रुपयाच्या मागं चार पैसे व्याज घेऊन हे रुपये उसने दिले आहेत."

सगळा दिवस अशाच तऱ्हेनं निघुन गेला. सगळ्यांनीं जेवून घेतलं. परंतु त्या दिवशीं शुभद्रानें पाण्यालासुद्धां स्पर्श केला नाहीं. रासमणीनं परोपरीनं सांगून पाहिलं, ललनानं कितीतरी आर्जवं केलीं. हट्ट धरून पाहिला. तरी पण शुभद्राच्या तोंडांत अन्नाचा एक कणसुद्धां गेला नाहीं.

अंधार पडतांच भुऱ्या केसांनीं आणि गुढगाभर धुळीत भरलेल्या पायांनीं हारानचन्द्रानं घरांत प्रवेश केला. एका कपड्यांत त्यांनीं दोन शेर तांदूळ, मीठ, थोडे बटाटे आणि लहानसं पडवळ बांधून आणलें होतें. एक भांडं आणून त्यांत त्या वस्तू ठेवतांना शुभद्राला रडं आवरणं कठीण होऊंन गेलं. तांदुळ एकाच प्रकारचे नव्हते. त्यांत बारीक, मोठे, सगळ्यांचं मिश्रण होतं. आपल्या पतीनं मुलांबाळांसाठीं आणि आपल्यासाठीं दारोदार भीक मागून हें सगळं गोळा करून आणलं आहे हे शुभद्राला समजायला कठीण गेलं नाहीं.



संध्याकाळ व्हायच्या थोडा वेळ आधीं माधवनं म्हटलं, "आक्का, मी आतां बरा नाहीं होणार."

"छे: असं म्हणूं नये, बाबा." त्याच्या अंगावरनं स्नेहानं हात फिरवित ललनेनं म्हटलं, "तूं बरा होणार, कां नाहीं होणार बरा तूं ? दोन दिवसांत धट्टाकट्टा होशील चांगला."

"असे किती तरी दोन दिवस होऊन गेले आहेत. पण मी कांहीं बरा झालों नाहीं."

" ह्या वेळीं तूं नक्कीच बरा होशील. "

" बरा नाहीं झालों तर ? "

" नाहीं, तूं खात्रीनं बरा होशील. "

" पण झालो नाहीं तर ? "

त्याचे दोन्ही अशक्त हात आपल्या हातांत घेत गंभीर होऊन ललनेनं म्हटलं, " छे: असले शब्द तोंडावाटे काढूं नयेत आपण. "

माधव कांहींच बोलला नाहीं. तो गप्प बसला.

कांहीं क्षणानंतर ललनेनं पुन्हां विचारलं " माधव, तूं खातोस थोडंस ? "

माधवनं मान हलवून म्हटलं, " नाहीं. "

थोड्या वेळानं औषध द्यायची वेळ झाली. एका लहानशा कांचेच्या ग्लासांत ओतून औषध ललनानं त्याच्या तोंडासमोर नेत म्हटलं, " घे, हें पी."

माधवनं पहिल्याप्रमाणेंच मान हलवून नकार दिला. औषध कांहीं झालं तरी तो पिणार नव्हता. असं तो नेहमीच करीत असे—कडू औषध प्यायचं त्याच्या जिवावर येत असे. परंतु थोडासा धाकदपटशा दाखविला कीं तो तें पीत असे; त्यामुळें ललनेनं म्हटलं, " दांडगाई करूं नकोस अशी—हं, घे. पी पाहूं."

माधवनं हातांत ग्लास घेऊन औषध जमिनीवर ओतून टाकलं.

पूर्वीं माधवनं असं कधींच केलं नव्हतं ! ललनेला आश्चर्य वाटलें, रागहि आला ती म्हणाली,

" हं काय माधव ? "

" मी आतां औषध नाहीं घेणार ! "

" कां ? "

" उगीचच. मी औषध काय म्हणून घेऊं ? मी बरा होणारच नाहीं मग औषध घ्यायचं कशाला ? "

" कुणी सांगितलं तुला, तूं बरा होणार नाहींस म्हणून ? "

माधव गप्प बसला.

ललना त्याच्या अगदीं जवळ येऊन बसली. त्याच्या अंगावरून हात फिरवीत तिनं म्हटलं, " माधव, माझं ऐकणार नाहींस तूं ? "

बाल—सुलभ अभिमानानें त्याचे डोळे भरून आले.

"माझं कुणीच ऐकत नाहीं तर मी तरी दुसऱ्यांचं काय म्हणून ऐकूं?"

"कोण तुझं म्हणणं ऐकत नाहीं, बाबा?"

"कोण ऐकतंय? आईला कांहीं विचारलं कीं ती रागावते आणि आत्या तर माझ्याशीं बोलतसुद्धां नाहीं! तूंही पण माझ्यावर रागावतेस—बोल, मग मी तरी कां कुणाचं ऐकूं?"

माधवच्या डोळ्यांतून आंसवांची माळ वाहूं लागली.

ललनानं प्रेमानं त्याचे अश्रू पुसत म्हटलं, "मी ऐकेन तुझं."

"तर मग सांग, मी चांगला होणार नाहीं तर दररोज असाच पडून राहणार आहे का?"

"नाहीं, असं थोडंच होणार आहे?"

"तर, मग काय होणार आहे?"

ललनाचे ओठ थोडेसे थरथरले. ती कांहींच बोलली नाहीं.

माधवनं कांहीं वेळ तिच्या चेहऱ्याकडं टक लावून पहात म्हटलं, "आक्का, आमचा धाकटा भाऊ यदूसुद्धां आजारी पडला होता, पण तो कुठं बरा झाला? गेलाच ना देवाघरीं? बाबा रडले, आई रडली, आत्या रडली, तूं रडलीस सगळेच रडले; आई अजूनही रडते. पण तो कांहीं परत आला नाहीं. आणि समज मीही त्याच्या सारखाच देवाघरीं गेलों तर?"

ललनानं दोन्ही हातांनीं आपलं तोंड झांकून घेतलं. दुसरी एकादी वेळ असती तर त्याला धमकावून त्याचं तोंड तिनं बन्द केलं असतं परंतु ह्या वेळीं तिला तसं करतां आलं नाहीं.

कांहीं क्षण स्वस्थ पडून राहिल्यानंतर पुन्हां माधवनेंच म्हटलं, "सांग ना, आक्का, मेल्यावर काय होतं?"

ललनानं तसंच तोंड झांकून म्हटलं, "कांहीं नाहीं. फक्त आम्हीं सगळीं रडूं." कदाचित ती आतां रडतही असावी.

माधवला समजलं कीं कांहीं माहीत नाहीं आणि त्याला काय झालं होतं हेंही पण ठाऊक नाहीं; पुष्कळ दिवसांपासून ही गोष्ट जाणून घेण्यासाठीं तो

आतुर झाला होता. आज ह्या गोष्टींची तो शहानिशा करून घेणार होता, म्हणून त्यानं पुन्हां प्रश्न केला, " आक्का, मेल्यावर कुठं जायला लागतं ? "

ललनानं वर पाहात म्हटलं, " तीथं—आकाशांत ! "

" आकाशांत ? " माधवला आश्चर्य वाटलं, " परंतु तिथं कुणाजवळ राहूं मी ? "

ललनानं दुसरीकडं पहात म्हटलं, " माझ्याजवळ. "

माधवला पूर्ण समाधान वाटलं. तो हंसून म्हणाला, " मग खरंच छान होईल ! बरं, तिथं आमचं घर आहे ? "

" हो, आहे. "

" मग तर आणखिन्ही छान ! आपण दोघं तिथं मजेनें राहूं, नाहीं ? "

ललनानं मनांतल्या मनांत देवाची " असंच होऊ दे " अशी करुणा भाकीत म्हटलं, " हो. "

माधवनें आपल्या हातानें तिचं तोंड आपल्याकडे वळवीत म्हटलं, " आक्का, तिथं आपल्याला जें जें आवडतं तें तें खायला मिळतं ना ? "

" हो. "

" तिथं पुष्कळ डाळींबं असतील नाहीं ? "

" हो. "

माधव मनापासून हंसला आणि कुशीवर वळला. जणू कांहीं एकाच कुशीवर त्या आनंदाचा उपभोग त्याला घेतां येत नव्हता! पुन्हां पहिल्या कुशीवर वळून पूर्ववत् ललनाकडं पहात त्यानं विचारलं, " मग, आक्का, आपण तिथं केव्हां जायचं ? "

" माधव ! "

" काय, आक्का ? "

" आईला सोडून तूं कसा जाणार ? "

" कां ? आई पण येईल. "

" आणि आली नाहीं तर ? "

" मी बोलावून घेऊन जाईन. "

" आणि समज, तरीसुद्धां ती आली नाहीं तर ? "

ललनेच्या ह्या प्रश्नानं मात्र माधवचा चेहरा उतरून गेला. " आक्का, आई तिथं कधींच येणार नाहीं ? "

" येईल, परंतु पुष्कळ दिवसानंतर. "

" ठीक आहे, आम्ही आधीं जाऊ, आई नंतर येईल. "

कांहीं क्षण स्तब्ध राहून तो पुन्हां म्हणाला, " मग आईला विचारून घेऊं का ? "

" नको, नको, आईला विचारूं नकोस. आईला विचारलंस तर ती तर येणार नाहींच परंतु मलासुद्धां येऊं देणार नाहीं. "

माधवनें घाबरून म्हटलं, " तर मग मी आईला विचारणारच नाहीं. मला आता औषध देऊन तूं जेवायला जा. औषध घेऊन मी झोपीं जाईन. "

औषध घेऊन, बतासे खाऊन आणि पाणी पिऊन माधवचन्द्र मजेत ' देवाजवळ आकाशांत काय असेल ' ह्याचा विचार करूं लागला. तिथं जाऊन आपण काय काय करूं कुठं कुठं हिंडूं फिरूं आणि किती डाळींबं खायचीं आणि त्यांतलीं आईकडे खालीं किती फेकायचीं, छलना आक्काला आमीष दाखवून, तिला छळून आणि रडवून मग तिला किती डाळींबं द्यायचीं, ह्या सगळ्या गोष्टींची संगतवार यादी मनांत करीत करीत तो झोंपीं गेला.

आणि ललना ? तीही वर जाऊन झोंपीं गेली. रासमणि, शुभदा, हारानचंद्र आणि छलना सगळ्यांनीं कितीही हांका मारल्या तरी ती खालीं आली नाहीं. ' माझं डोकं दुखतंय, मला हाक मारूं नका ' असा बहाणा करून ती झोंपीं गेली.

दुसऱ्या दिवशीं माधव थोडासा बदलून गेला होता. एक तर तो तसाच शांत प्रकृतीचा होता पण आतां तो गंभीरही झाला होता. औषध घेण्यासाठीं तो तोंड वेंगाडत नव्हता. खायला ' हें दे, तें दे ' करून मागत नव्हता, किंवा ' हें पीत नाहीं, तें पीत नाहीं ' असंही तो म्हणत नव्हता. आजकाल तो नेहमी आनंदी असायचा. आई जेव्हां त्याला विचारीत असे, " माधव, कांहीं खाशील ? " त्यावेळीं तो म्हणत असे, " दे. "

"काय देऊं ?"

"जें असेल तें."

ललना त्याच्याजवळ जेव्हां येऊन बसत असे तेव्हां त्याच्या आनंदाला पारावार राहात नसे! दोघांची मिळून कितीतरी खलबतं चालत आणि आणखिन त्यांच्या काय काय गुप्त सल्लामसलती चालत कुणाला ठाऊक? परंतु कुणाची तरी चाहूल ऐकूं आली कीं त्यांचीं बोलणीं बन्द होत.

आजकाल हारानबाबूंच्या घरीं तितकीशी अडचण भासत नव्हती. पैशाची अडचण आली म्हणजे ललना एकदोन रुपये काढून देत असे. पैसे येतात कुठून हें शुभदाला माहीत होतं. परंतु रासमणीला वाटत होतं कीं हारानच पैसे आणून देतोय, आणि हारान विचार करीत असे: काय हरकत आहे? पैसे येतात ना? मग ते कुठून आणि कसे आले म्हणून काय झालं? मी तरी कुठून आणून देऊं?

आजकाल त्याच्या मनाला एकसारखी एक टोंचणी लागून राहिली होती. मधून मधून अफूचं व्यसन सुटतं आहे कीं काय अशी त्याला भीति वाटत होती. अफूचं व्यसन सुटलं तर बिघडलं कुठं? व्यसन कायम ठेवायला अफू आणूं कुठून? कांहीं का आणि कसं कां होईना जोंपर्यंत पोट जाळायला भात मिळतो आहे तोंपर्यंत मी मनांत कसलाच किंतु आणणार नाहीं; चांगले दिवस आल्यानंतर सगळं कांहीं ठीक होईल. या विचारांनीं तो स्वस्थ बसत असे.

कांहीं दिवसांनंतर सदानंदाची आत्या काशीयात्रेसाठीं चल म्हणून त्याच्यामागें लागली. ती म्हणे, "सदू, मला एकदां काशीला घेऊन चल. केव्हां मी मरून जाईन ह्याचा नेम नाहीं; मरायच्या आधीं काशीविश्वानाथाचं दर्शन घ्यायची फार इच्छा आहे रे."

सदानंद कुठल्याच बाबतींत आत्याच्या विरुद्ध जात नसे. त्यानें आत्याच्या म्हणण्याला होकार दिला. दोन एक दिवसांतच काशीला जाण्याचा निश्चय कायम झाला.

ज्या दिवशीं काशीयात्रेला तीं निघणार होतीं त्या दिवशीं संध्याकाळीं ‘ ललना, ललना ’ अशा हांका मारीत सदानंद शुभदाच्या घरीं वर चढून गेला. ललना त्या वेळीं वरच होती. सदानंदाला आलेला पाहतांच ती उठून उभी राहिली. कपड्यांच्या पुरचुंडींत सदानंदानें पन्नास रुपये बांधून आणले होते. ती पुरचुंडी उघडून उशीच्या खालीं ठेऊन तो म्हणाला, “ आम्ही आज काशीला जात आहोत. तिथून कधीं परतूं हें सांगतां येत नाहीं. आणि मला माहीतही नाहीं. जरूर लागल्यास ह्यांतले पैसे घेऊन खर्च कर. ”

ललना चकित होऊन म्हणाली, “ इतके रुपये ! ”

सदानंदाला हंसू आलें. त्यानं म्हटलं, “ किती रुपये ? पन्नास रुपये कांहीं जास्त नाहींत. दिसायला जास्त वाटतात खरे, परंतु खर्चाच्या वेळीं ते कमीच पडतील. ”

“ तरी इतके...... ”

ललनेला तिचें वाक्य पूर्ण करण्याची संधि न देतां हात हालवून विशिष्ट तऱ्हेनं इशारा करीत तो खालीं निसटला. खालीं स्वयंपाकघरांत शुभदाजवळ जाऊन त्यानं म्हटलं, “ काकी, आज आम्ही काशीला जात आहोंत. ”

शुभदानं ही बातमी आधींच ऐकली होती. तिनं विचारलं, “ परत कधीं येणार ! ”

“ तें कसं सांगूं ? काशींत राहून आत्याचं मन जेव्हां संतुष्ट होईल तेव्हांच आम्ही परत येऊं. ”

शुभदानं दीर्घ निश्वास सोडून म्हटलं, “ ठीक आहे, बाबा. मी तुला आशीर्वाद देतें. चांगल्या तऱ्हेनं संभाळून रहा. ” सदानंद तेथून हंसत हंसत निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं जवळ जवळ अर्धे रुपये आपल्या जवळ ठेवीत आणि बाकीचे अर्धे आईजवळ देत ललना म्हणाली, “ आई, जातांना सदादादानें हे रुपये दिले आहेत. ”

शुभद्रा डोळे फाडून रुपये मोजूं लागली. रुपये मोजून झाल्यानंतर आपल्या मुलीकडं पाहात ती म्हणाली, " मला वाटतं, सदानंद हा पूर्वजन्मींचा आपला रिणकरी असला पाहिजे. "

ललनानं मान हालवून म्हटलं, " हो असंच वाटतंय. "

" एवढी रक्कम कुणी कुणाला देईल ? "

ललनानं कांहींच उत्तर दिलं नाहीं.

" ललना, सदानंद वेडा आहे का ? "

" कां ? "

" नाहीं तर हें सगळं तो कां करतो आहे ? "

" संकटांत सांपडलेल्या माणसांच्या दुःखांत दुःखी होणं वेडेपणा आहे का ? "

" तर मग त्याला लोक वेडा कां म्हणतात ? "

ललनेनं हंसून उत्तर दिलं, " लोकांचं हें असंच ! "

हारान मुकर्जींच्या कुटुंबियांना आजकाल हालांत दिवस काढावे लागत नव्हते. कपडेलत्ते आणि खाणं-पिणं ह्यांचा खर्च व्यवस्थित चालू होता. परंतु शेजाऱ्या-पाजाऱ्यांत हळूं हळूं एकमेकांत ह्याविषयीं कुजबूज सुरू झाली होती.

कुणी म्हणत—साला हारान, नन्दीबाबूंची मोठी रक्कम गडप करून आला आहे; आणि कुणी म्हणत—हारान आतां मोठा आसामी झाला आहे. पण कुणी कुणी असेंही म्हणत—अरे नाहीं हो, कांहींच नाहीं. दोन्ही वेळ चूलसुद्धां पेटत नाहीं त्याच्या घरांत. अशाच प्रकारची किती तरी चर्चा चालत असे. दूरचे जे लोक होते त्यांचं कुतूहल इतकं जागृत झालं नव्हतं, परंतु जवळपास जे लोक होते त्यांचं कुतूहल मात्र बरंच वाढलं होतं आणि मुखोपाध्याय कुटुंबांतील लहानमोठं न्यून आणि दोष हुडकून काढायला ते कम्बर कसून सिद्ध झाले होते.

एके दिवशीं दुपारीं मुकर्जी कुटुंबाच्या घरीं अचानक कृष्णाब्राह्मणीचं अचानक आगमन झालं. कृष्णाब्राह्मणी येतांच म्हणाली, " अग काय चाललं आहे, सूनबाई ? जेवणखाण संपलं का ? "

शुभदानं उत्तर दिलं, "हो, आत्तांच आटोपलं सगळं."

कृष्णाब्राह्मणी पानतंबाखू खात खात आणि एकीकडे तोंडांतला रस थुंकीत यथास्थानीं जाऊन बसली. बसल्यानंतर तिनं विचारलं, "सूनबाई हारान आजकाल करतो काय ?"

"काय करतील ? नोकरीच्या शोधांत भटकताहेत."

"घरांतलं मग चालतं कसं ?"

शुभदानं उत्तर दिलं नाहीं.

म्हातारी पुन्हां म्हणाली, "लोक म्हणतात कीं हारान आतां मोठा असामी झाला आहे ! नन्दीबाबूचे पैसे त्यानें खाल्ले आहेत; आतां त्याला खाण्यापिण्याची काय चिन्ता ? परंतु सूनबाई; मला सगळं माहीत आहे म्हणूनच विचारते कीं संसार कसा चालवतेस ?"

शुभदानं थोडंसं अळंटळं करून उत्तर दिलं, "असंच, कसं तरी."

"हरामाची अवलाद ब्राम्हणपाड्याची ती नीच कातू; तीच तर ह्या सगळ्या दुःखाचं मूळ आहे. त्या काळतोंडीचे तुकडे तुकडे करावेत असं मनांत येतं !"

शुभदानं तें ऐकलं न ऐकलंस करून विचारलं, "आक्का, तुमचं जेवणखाण झालं का ?"

"हो. झालं. त्याच हरामजादीनं हा सगळा सर्वनाश केलाय्. हारान आपला भोला–शंकर. म्हणून तिच्या जाळ्यांत सांपडला. तीन हजार रुपयांची चोरी केली, कांहीं नाहीं तरी निदान शेंदोनशें तरी बायकोच्या हातांत आणून द्यायचे होते ? तर म्हटलं असतं कीं ठीक आहे, पण तेंही नाहीं !"

शुभदानं विचारलं, "आज काय केलं होतं, आक्का ?"

"आणखीन् काय करूं, सूनबाई ? आज उशीर झाला होता म्हणून खिचडीच केली होती नुसती. परंतु त्या हरामजादीला परलोकची तरी चिन्ता आहे का ? दोन रुपयांसाठी हराननें हात जोडले परंतु त्या रांडेनं त्याला घराबाहेर काढलं ! पण देव काय गप्प बसेल ? तो पाहून घेईल. ब्राह्मणाचा असा

सर्वनाश केला आहे, तुझ्यासारख्या सतीला डोळ्यांतून आंसवं गाळायला लावलं आहे तिनं, ह्या सगळ्या पापाचा दंड काय तिला तो करणार नाहीं? पाहशील तूं, मी सांगून ठेवतें......"

शुभद्रानं मध्येंच अडवून विचारलं, "आक्का, बिन्दु सासरीं एकाएकीं कां निघून गेली?"

"तिच्या सासऱ्याला महामारीनं झपाटलं होतं म्हणून तिला बोलावणं आलं होतं.

बरं, आतां घरचं काम तूं चालवणार कशी?"

"मी काय चालवणार? देव जसं चालवील तसं चालेल."

कृष्णाब्राह्मणीनं एक दीर्घ निश्वास सोडून म्हटलं, "तें तर आहेच; तरी परंतु सगळ्यांत मोठी काळजी म्हणजे तुझ्या धाकटच्या मुलीची आहे. किती मोठी दिसते ती आतां! लवकर लग्न झालं नाहीं तर बरं दिसणार नाहीं आणि लोक उगीच चर्चा करूं लागतील. कांहीं विचार केला आहेस का ह्या बाबतींत?"

शुभदाची मुद्रा उदासवाणी झाली. दीर्घ श्वास सोडत बसली होती. त्याच वेळीं ललना तिथें येऊन पोंहचली. छलनामयीच्या बाबतींत चाललेल्या गोष्टी थोड्याफार प्रमाणांत तिच्या कानांवर पडल्या होत्या. तेवढ्यावरून आणि बाकीचं अनुमानावरून ओळखून तिनं आपली पक्की खात्री करून घेतली कीं, हिन्दू कुटुंबांत—तें कुटुंब श्रीमंत असो वा गरीब असो—लग्न न करतां फार दिवस मुलीला ठेवतां येत नाहीं. ठेवली तर जातींतून बाहेर पडायची पाळी येते.

# ९

शुक्लपक्षाची एकादशीची रात्र अर्धी संपून गेली होती. अशा वेळीं भागीरथीच्या किनारीं झाडांच्या मध्यें अर्धवट लपलेल्या शिवालयाच्या ओट्यावर वीस वर्षांचा एक तरुण कुणाची तरी वाट पाहात बसला होता.

त्या तरुणाचं नांव शारदाचरण राय होतं. ह्याच हलुदपूर गांवच्या एका धनी सज्जनाचा तो एकमेव पुत्र होता. त्याचं लिहणं, वाचणं किती झालं होतं, तें माहीत नव्हतं; परंतु तो ज्ञानी, बुद्धिमान आणि कर्मशील होता एवढं मात्र खास. वृद्ध बापाची जमीन—जायदाद आणि इस्टेटीचं काम आतांशा तोच पाहात असे. शारदाचरणची आई जिवंत नव्हती. ती हयात होती तोंपर्यंत त्या कुटुंबाचा मुकर्जी कुटुंबाशीं घनिष्ट संबंध होता.

शारदाच्या आईचं आणि रासमणीचं परस्परांवर फार प्रेम होतं. शारदाची आई मेल्यावर तो घरोबा आणि तें प्रेम टिकून राहिलें नव्हतें. विशेषतः शारदाचरणाचे वडील राममोहनबाबूंना कुठल्याही गरीब आणि दरिद्री कुटुंबाशीं संबंध ठेवणं आवडत नसे.

इथें ललनाची एक गोष्ट सांगणं आवश्यक आहे. कारण तिचा संबंध या प्रकरणांत वारंवार यायचा आहे. लहानपणापासूनच ललना शारदावर प्रेम करीत आली होती. नंतर पुढें तिचं लग्न दुसऱ्या एकाशीं झालं.

हारानबाबूंची परिस्थिती त्या वेळीं वाईट नव्हती. शक्य तितक्या थाटामाटांत मोठ्या मुलीचं त्यांनीं लग्न लावून दिलं होतं. परंतु दुर्दैवानं लग्नानंतर दोन वर्षांनींच ललना विधवा होऊन माहेरीं परत आली होती; तरीहि शारदाचरणावरचं तिचं प्रेम कमी झालं नव्हतं. उलट उत्तरोत्तर तें वाढतच गेलं. हळू

हळू दोघेंही वाढत होतीं आणि त्याबरोबर ह्या प्रेमाचा परिणाम चांगला होणार नाहीं, हेंही त्यांना दिसून आलं. शारदाचरणाच्या लक्षांत ही गोष्ट आली असेल, नसेल परंतु ललनाला मात्र कळून चुकली होती, हळू हळू ललना आपल्या प्रेमाच्या दुकानाच्या दाराची एकएक फळी बन्द करूं लागली. आतां तिनं त्याच्याकडे जायचं सोडून दिलं होतं. ती त्याला आपल्याकडे बोलावीत नव्हती। कीं त्याच्यावर आपलं प्रेम व्यक्त करीत नव्हती. चिठीचपाटी लिहिणं सुद्धां तिनं बंद करून टाकलं होतं.

हें सगळं पाहून शारदाचरणाला संकटांत पडल्यासारखं झालं. पहिल्या पहिल्यांदा त्यानें तिला समजावून सांगितलं, नाना तऱ्हेनं तो तिला टाकून बोलला, कितीतरी प्रकारचे पुरावे देऊन पाहिलें परंतु ललनानं आपले दोन्ही कान सरळ बन्द करून घेतले. एक दिवस तर तिनं स्पष्टच सांगून टाकलं, “ आपणाला हें चांगलं दिसत नाहीं आतां.” शारदाचरणाला राग आला. त्यानें तणतणतच विचारलं, “ इतके दिवस कसं चांगलं दिसत होतं ? ”

“ इतके दिवस मी लहान होतें, आतां मोठी झालें आहे. ”

“ मोठी झाल्यानंतर कां चांगलं दिसूं नये ? ”

“ चांगलं दिसत नाहीं हेंच खरं—कारण कसलं ?

“ पण जरा विचार करून तरी......... ”

शारदाचं वाक्य पूर्ण व्हावयाच्या आंतच ललना उठून उभी राहून म्हणाली, “ विचार करण्याची आतां जरुरी नाहीं ह्यापुढें मला वाईट सल्ला कधींही देऊं नका. ”

शारदाचरण जास्तच चिडला. त्यानं विचारलं, “ मी तुला वाईट सल्ला देतोय् काय ? ”

“ नाहीं तर काय ? ”

“ वाईट सल्ला देतों ना ? तर मग मी आजच सगळा संबंध तोडून टाकतों. ”

“ चांगलं होईल. ”

“ ह्या जन्मांत मी पुन्हां तुझ्याशीं कधींच बोलणार नाहीं. ”

"नका बोलूं."

ह्यानंतर दोघेही आपआपल्या वाटेनें निघून गेलीं होतीं. शारदाचरण तणतणत निघून गेला होता आणि ललना डोळे पुशीत निघून गेली होती.

ह्या गोष्टीला चार वर्षें होऊन गेलीं होती. चार वर्षांनंतर शारदाशरण आज त्या फुटक्या जीर्ण मंदिराच्या ओटऱ्यावर ललनाची वाट पाहात बसला होता. पूर्वीची गोष्ट तो केव्हांच विसरून गेला होता. या वेळीं तो ललनाच्या विनंतीवरूनच तिथं आला होता. त्यामुळं मागच्या आठवणी पुन्हा ताज्या होत होत्या. कुणी म्हणतात, लहानपणचं प्रेम हें दुःखाला कारण होतं आणि त्यांत स्थिरता नसते. कांहींजणांचं म्हणणं लहानपणचं प्रेम निश्चल असतें. कुणाचं खरं? कुणी सांगावं? ह्या गोष्टीला मापण्या-तोलण्याचें साधन उपलब्ध नाहीं. केव्हां केव्हां अशक्य गोष्टी शक्य होऊं शकतात. कांहीं का असेना, एवढं मात्र खरं कीं लहापणच्या प्रेमाची आठवण सदासर्वदा हृदयांत जागृत असते.

शारदाचरणाच्या मनांत किती तरी गोष्टी येऊं लागल्या. चार वर्षांनंतर ती आज इथं येईल, जवळ बसेल आणि गोड गोड बोलेल! शारदाच्या हृदयांत अधीरता निर्माण झाली; त्याच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. पण का? कां येणार आहे ती? तिनं कशासाठीं मला इथं बोलावलं आहे? आतां माझा तिचा काय संबंध राहिला आहे?

रात्रीचा एक वाजून गेला होता. एक स्त्री तोंडावरनं पदर घेऊन त्याच रस्त्यानं देवालयाकडेच येत होती. शारदाच्या मनांत विचार आला— काय, ही ललनाच येते आहे का? होय ललनाच. किती मोठी झाली आहे आतां!

ललना जवळ येऊन उभी राहिली. शारदानं संकोच दूर करून म्हटलं, "बैस."

कितीतरी दिवसांनंतर चंद्रप्रकाशांत तीं दोघें त्या मंदिराच्या ओटऱ्यावर पुन्हा एकमेकांसमोर बसलीं. पुष्कळ वेळपर्यंत दोघांपैकीं कुणीच बोललं नाहीं. नंतर शारदानंच धैर्य करून विचारलं, "मला इथं कां बोलावलंस?"

ललनानं मान वर करून म्हटलं, "काम होतं."

"कसलं काम?"

"सांगतें."—नंतर पुष्कळ वेळ कुणीच बोललं नाहीं.

शारदाचरणनं पुन्हा विचारलं, "कां, बोलत कां नाहींस ?"

"सांगतें. पूर्वी तुमचं माझ्यावर प्रेम होतं. अजूनही आहे का ?"

प्रश्न विचारण्याची ती तऱ्हा पाहून शारदाचरणला विस्मय वाटला. त्यानं प्रति प्रश्न केला, "हें समजून घ्यायची कां इच्छा झाली आहे तुला ?"

"नाहीं, तसंच कांहींतरी कारण आहे त्याला."

"आणि समज मी सांगितलं, माझं तुझ्यावर अजूनही प्रेम आहे म्हणून; पुढें ?"

ललना मधुर हास्य करून लाजून म्हणाली,

"माझ्याशीं लग्न कराल ?"

शारदाचरण चमकून मागें सरकत म्हणाला,

"नाहीं."

"कां ?"

"तुझ्याशीं लग्न केलं तर जातींतून बाहेर पडावं लागेल."

"मग पडावं."

"मग चरितार्थ चालवायचा कसा ?"

"त्याची चिन्ता तुम्हाला करावी लागणार नाहीं."

"परंतु बाबा तयार होणार नाहींत."

"होतील. तुमच्या वडिलांना तुम्ही एकटेच आहांत. तुमचं म्हणणं ते ऐकतील."

कांहीं क्षण स्तब्ध राहिल्यानंतर शारदानं पुन्हां म्हटलं, "मी एकुलता एक असलों त्यांचा, तरी बाबा तयार होणार नाहींत."

"कां ?"

"किती तरी कारणं आहेत त्याला. बाबा तयार झाले तरीसुद्धां मला तुझ्याशीं लग्न करतां येत नाहीं. तुझ्याशीं लग्न केलं कीं माझी जात मला वाळींत टाकील. जातींतून बाहेर पडून हलुदपुरांत टिकाव लागणार नाहीं. आणि शिवाय लग्नानंतर तुला घेऊन कुठंतरी सुखानं राहू शकेन इतका पैसाही नाहीं

माझ्याजवळ. आणखी एकदां होऊन गेलें तें झालें, संपलें. आतां काय त्याचं ? ह्यांतच आपलं दोघांचं कल्याण आहे."

ललना कांहीं वेळ स्तब्ध राहून पुन्हां म्हणाली, "ठीक आहे. असंच होऊं द्या. परंतु माझ्यावर एक उपकार कराल ?"

"माझ्या हातांत असेल तर जरूर करीन."

"तुमच्याच हातांत आहे. परंतु तुम्हीं कराल किंवा नाहीं हें मात्र मला सांगतां येत नाहीं."

"मग सांग, माझ्याकडून शक्य तितका मी प्रयत्न करीन."

"माझ्या बहिणीशीं—छलनामयीशीं लग्न करा."

शारदाचरणानं हंसून विचारलं, "कां ? तिच्यासाठीं वर मिळत नाहीं का ?"

"कुठें मिळतो आहे वर ? आम्ही माणसं गरीब आहोंत, दरिद्री आहोंत. गरीबाची मुलगी कोण करून घेणार ? केवळ एवढंच नव्हे तर आम्ही त्यांतून कुलीन आहोंत, हलक्या जातींत मुलगी देऊं शकत नाहीं. आमच्यापेक्षां हलक्या जातींत वर मिळूं शकेल. पण त्यासाठीं आम्हालाही पण आमच्या जातीला मुकावं लागेल. तुमच्या घरीं आमचा विवाह-संबंध होऊं शकतो. तुम्ही जर छलनाशीं लग्न कराल तर आमचं ओझं हलकं होईल."

"मी सर्वस्वीं वडिलांच्या आधीन आहें. त्यांच्या संमतीशिवाय मला कांहींच करतां येत नाहीं."

"त्यांची संमती घेऊनच लग्न करा."

"मला वाटतं, ह्या लग्नाला ते संमती देणार नाहींत."

ललनाचा चेहरा उतरून गेला. तिनं विचारलं, "कां ?"

"मला वाटतं, तुला सगळं स्पष्टच करून सांगायला पाहिजे. लपवून ठेवण्यांत अर्थ नाहीं. माझे बाबा लोभी आहेत. माझ्या लग्नामुळें त्यांना पैसा मिळणार आहे. तुम्ही माणसं तर कांहींच देऊं शकणार नाहीं. मग जमणार कसं ? म्हणूनच म्हणतों कीं हें लग्न जमणार नाहीं."

ललनेनं गयावया करून म्हटलं, " आम्ही लोक गरीब आहोंत. तुम्हाला द्यायला पैसा कुठून आणायचा आम्हीं ? आणि शिवाय तुम्हाला पैशाची अशी काय जरूरी आहे? "

शारदाचरणाचं मन थोडेंसें द्रवलें. त्यानें हसून म्हटलं, " हें सगळं मला कळतं आणि पटतंसुद्धां. परंतु त्यांना पटत नाहीं, त्याला मी काय करूं ? "

" तुम्ही जर त्यांना समजावून सांगाल तर त्यांना खात्रीनं पटेल."

" फक्त एकदांच मला सांगतां येईल. समजूत घालण्याची गोष्ट मात्र बोलूं नकोस."

ललना उदास होऊन म्हणाली, " मग कसं होणार ? "

" मी तरी काय करूं त्याला ? "

" मला वाटतं, तुमचीच या लग्नाला तयारी नाहीं. "

" नाहीं. "

" छलनासारखी मुलगी तुम्हाला सुखासुखीं मिळणार नाहीं. ती सुन्दर आहे, बुद्धिमान आहे आणि कर्तबगार आहे. शिवाय एका गरीब माणसावर फार मोठा उपकार होईल, एक ब्राह्मणाच्या कुलाचं रक्षण केल्याचं श्रेय मिळेल आणि आम्हीं जन्मभर ऋणी राहूं तुमचे. बोला, कराल लग्न छलनाशीं ? "

" बाबा जसं सांगतील तसं करीन. "

" आज मी तुम्हाला सगळं स्पष्ट करून सांगणार आहें. ह्या जन्मीं तुम्हाला पुन्हा सांगण्याचा मला कदाचित अवसर मिळणार नाहीं. म्हणून आतांच सांगून टाकतें. तुमच्याशीं कधीं मी लाज धरली नाहीं आणि आजही धरणार नाहीं. सगळ्या गोष्टी उघड्या करून सांगून टाकतें. तुमच्यावर मी नेहमींच प्रेम करीत आलें आहे. ही गोष्ट मी तुम्हांला. पूर्वी एकदां सांगितली होती आणि आज फार दिवसानंतर तीच गोष्ट, पुन्हां मी तुम्हाला सांगणार नाहीं असं ठरवलं होतं तरी, सांगतें. तुम्ही माझी कुठलीच गोष्ट—ही शेवटचीसुद्धां—ऐकली नाहीं. जें व्हायचं तें होऊन गेलं. पुन्हां कधीं असं होणार नाहीं. व्यर्थ तुम्हाला मी त्रास दिला याबद्दल मला क्षमा करा. "

शारदाचरणला मनांतल्या मनांत अतिशय यातना झाल्या. ललनेला जातांना पाहून त्यानं म्हटलं,

" ही गोष्ट मी बाबांना अवश्य सांगेन."

ललनानं त्याच्याकडे वळून न पाहतां म्हटलं,

" सांगा."

" परंतु मी बाबांच्या पूर्णपणं आधीन आहं."

ललनानं जातां जातां म्हटलं, " हं तर मी सर्वांशींच ऐकलं होतं."

" कांहीं करतां आलं तर तुला कळवीन."

" ठीक आहे."

" ललना, मला क्षमा कर."

" केली."

# १०

" हा माझा डाव! दे बाबा, चार आण्याचे पैसे."—

" गाङ्गुलिच्या हातून चार आण्याचे ताम्रखंड मोजून घेऊन श्रीमान् हारानचंद्रानं ते आपल्या दुपट्ट्याच्या गांठींत बांधून टाकले. " दैवांत जें असेल तें होईल—लावतों आठ आण्याचे पैसे!" असं म्हणून श्रीमान् हारानबाबूने फाटक्या चटाईवर आठ आण्याचे पैसे टाकले आणि पुढें असलेला पत्त्यांचा डाव उचलला. सगळी मित्रमंडळी मोठ्या उत्सुकतेनें आपापला डाव उघडून पाहूं लागली. कांहीं वेळानंतर दोन—तीन हात उंच उडी मारून हारानचंद्रानें म्हटलं, " काढ

दोस्त, एक रुपाया! पुन्हा मीच डाव जिंकला!" "गाङ्गुलिनें हारानचंद्राला एक रुपाया देऊन त्याच्यापुढं पत्त्यांचा डाव टाकला. दुसरे लोकही शुष्क हास्य करून आपल्या कडोसरीचे पैसे काढूं लागले.

"आणाखिन पाहिजे ?—पाहिजेत का आणखी ?"

"बस्स. पुरे आता नकोत."

"पंधरावरच जिंकून जा."

"चल जा, चल जा, बाबा—हा पाहा आला माझा डाव!"

जवळ जवळ अर्धी रात्र उलटून गेल्यानंतर हारानचंद्र तिथून उठला तेव्हां त्याच्या कडोसरीला पैसे, दुपट्ट्याच्या गांठींत पैसे आणि हातांत ही पैसेच होते. त्या रात्रीं तो घरीं गेला नाहीं. दुसऱ्या दिवशींही ह्या दुकानांत जा, त्या दुकानांत जा, असंच करून दोन प्रहर टळून गेली. जवळ जवळ चार वाजतां त्यानें घरांत पाऊल ठेवलें. त्याचे डोळे लाल भडक होऊन गेलें होते; नाक, तोंड कपडे आणि सगळ्या शरिरांतून, अतिशय गांजा प्याल्यामुळें भयंकर दुर्गंधी येत होती.

स्नान करून हारानचंद्र जेवायला बसला तेव्हां शुभदानें त्याच्यासमोर बसत विचारलें,

"आज किती उशीर केलात?"

"काय करूं, सांग. कामामुळें एखदा उशीर होतो, पाहा. तूं अजूनपर्यंत कांहींच खाल्लं नाहींस?"

शुभदा गप्प बसली.

हारानचंद्रानें पुन्हा प्रश्न केला, "खाल्लं नाहींस तूं अजून?"

"घेईन खाऊन आतां."

हारानचंद्राला वाईट वाटलं. तो म्हणाला, "शुभदा, तूं हें फार करतेस. माझं कांहींच नक्की नसतं. मी सबंध दिवस आलोंच नाहीं तर तूं कांही न खातां, न पितां सबंध दिवसभर उपाशीं राहाणार का?"

दोन घांस तोंडांत घातल्यानंतर हारानचंद्रानें विचारलं, "काल सकाळीं माझ्यापाशीं कांहीं पैसे मागितले होतेस ना तू?"

शुभदाच्या लक्षांत कांहींच आलं नाहीं. ती म्हणाली, "कधीं—नाहीं."

" मागितले नव्हतेस ? मला वाटलं—मागितलं होतेस. " नंतर थोडसं हंसून म्हणाले, " काल मागितले नव्हतेस दोन दिवसांनीं मागणारच कीं. दोन्ही एकच ! माझ्या दुपट्याच्या गांठींत आठ रुपये बांधलेले आहेत, त्यांपैकीं तूं पांच घे आणि बाकीचे तसेच ठेवून दे..."

शुभदानं मान हालवून म्हटलं, " बरं. "

शुभदाला आज मोठं आश्चर्य वाटलं. पुष्कळ दिवस झाले, त्यानें स्वेच्छेनं तिच्या हातांत पैसे आणून दिले नव्हते. जेवून घेतल्यानंतर त्याला शुभदानें प्रश्न केला, ' कुठून आणले पैसे ? "

आज हारानचन्द्राच्या तोंडावर हास्य विलसलं. तो म्हणाला, " अग, आमच्या सारख्यांना पैशाची कधींच काळजी करावी लागत नाहीं. डोक्यांत अक्कल असेल तर सगळीकडे पैसेच पैसे पडलेले दिसून येतील. समजलं ? "

शुभदाला काय समजलं तें तीच जाणे, परंतु तिनं प्रतिवाद केला नाहीं.

वरील प्रसंग घडल्यानंतर दोन महिने असेच निघून गेले.

आज संध्याकाळीं शुभदा उदास चेहऱ्यानें ललनाजवळ बसत म्हणाली, " ललना, आज तुझ्याजवळ कांहींच नाहीं का ग ? "

" कांहींच नाहीं, आई. "

" आज किती तरी दिवस तूं असंच म्हणत आलीस पण प्रत्येक वेळेला दोन चार आण्याचे पैसे काढून देत होतीस. बघ ललना कांहीं असलं तर देऊन टाक. नाहींतर कडकडीत उपास पडणार सगळ्यांना.

आईचा दीन चेहरा आणि गद्‌गद् स्वर ऐकून ललना रडूं लागली.

रडत रडत ललनेनं म्हटलं, " खरं सांगतें ग आई, माझ्याजवळ पै देखील नाहीं, तुझ्या पायाला हात लावून सांगतें.

दोघींनाही रडं कोसळलं. शुभदेला रडू कोसळलं, तिनं आपल्या मुलीवर अविश्वास दाखविण्यासारखं शब्द तोंडावाटे बाहेर काढले म्हणून. ललनाला रडूं कोसळायचं कारण दुसरं होतं. " कांहीं नाहीं " म्हणून आतापर्यंत ती थोडे-तरी पैसे दररोज देत आली होती, परंतु आज तिच्याजवळचे सगळे पैसे सरले होते. त्यामुळें द्यायला कांहींच उरलं नाहीं म्हणून ती रडत होती. सदानंदानं

दिलेल्या पन्नास रुपयांपैकीं शेवटचा पैसा तिनें आज सकाळीं खर्च केला होता. आतां सगळीं काय खातील, रात्र कशी जाईल, आणि खायला द्यायला घरांत कांहींच नसल्यामुळें आईच्या मनाला किती यातना होतील आणि शिवाय उद्यां दुसऱ्याकडे हात पसरावयाची पाळी येईल—हें सगळे विचार मनांत येऊन तिच्या डोळ्यांतून अश्रू बाहेर आले होते. बिन्दूचा आधार होता पण ती आतां सासरीं गेली होती. आणि सदानंद तर काशीला गेला होता; बरं हीच एवढी गोष्ट काळजी करण्यासारखी होती म्हणावं तर तसंही नाहीं. आज दोन दिवस झाले; हारानचन्द्राचा पत्ता नव्हता तो! कदाचित् अफूच्या दुकानांत किंवा जुगाऱ्यांच्या अड्ड्यांत आसन ठोकलं असावं त्यानं!

इथें हारानचन्द्राची थोडीशी माहिती देणं जरूर आहे. तो गांजा पीत होता, अफू खात होता, शुभदाला खोटंनाटं सांगून तिलाही दोन—चार आण्याला लुबाडीत होता आणि वेळ आली तर साऱ्या अंगाला भस्म रचून ब्राह्मण संतानाच्या उपजिविकेचं अंतिम साधन—भिक्षावृत्तीचाही तो अवलंब करीत होता, परंतु इतकं करीत राहूनही त्याला जुगाराचं रहस्य अद्यापी चांगल्या तऱ्हेनं अवगत झालं नव्हतं. परंतु तें रहस्य आतां त्याला पूर्णपणें कळलं होतं. जुगारांत प्रथम जसं घडतं तसंच झालं.—दोन-चार रुपये मिळाले—थोडासा लाभ झाला, परंतु जसजसे दिवस जात चालले तसतसं दुर्भाग्य हात धुवून त्याच्या पाठीमागें लागलं. शुभदाला त्यानें जे पांच रुपये दिले होते ते शेवटचेच ठरले. त्यानंतर कांहींच जिंकल नाहीं असं नाहीं, परंतु जिंकण्यापेक्षां हरतच जास्त गेलें. पहिल्यांदां हलुदपूर गांवांत राहणं हारानबाबूला कठीण होऊन जात असे परंतु आतां ब्राम्हणपाडा गांवांतही उजळ माथ्यानं हिंडणं त्याला अशक्य होऊन बसलं होतं. रस्त्यांत भेटणारा प्रत्येक मनुष्य त्याचा धनको होता, कारण त्यानें हारानबाबूना केव्हां ना केव्हां तरी दोन-चार आण्याचे पैसे हातउसने दिलेले होते. 'उद्यां देईन' असं सांगून प्रत्येक परिचित व्यक्तीपासून त्यानें दोन-चार आण्याचे पैसे मागून घेतले होते आणि प्रत्येक दुकानदाराचें कांहीं नाहीं तरी चार—आठ आणे सामानाचे देणें तो होता. ह्या सगळ्या भानगडीमुळें ब्राह्मणपाडा गांवांतही तो आतां फारसा दिसत

नसे. हां, संध्याकाळच्यावेळीं अफूचं दुकान शोधलं तर तिथें मात्र एका कोंपऱ्यांत बसून राहिलेला आढळला असता, आणि रात्र पडल्यानंतर जुगाराच्या अड्ड्याचा दरवाजा उघडून आंत नजर टाकली तर तिथेंही विराजमान झालेला दिसून आला असता. आज काल बहुतेक सगळी रात्र तो तिथंच घालवीत असे. पैसा जवळ नसल्या कारणानं स्वतःला त्याला खेळतां येत नव्हतें. तरी दुसऱ्यांच्या खेळांत भागीदार होत असे व भागीदारानें पैसे जिंकले तर दोन–चार आण्याचे पैसे कधीं मधीं त्याला मिळून जात. इतर लोक एकदां खेळायला बसले कीं ते जाग्यावरून उठत नसत. अशा लोकांना हारानचंद्र चिलीम तयार करून आपल्या हातानें एकेकाच्या पुढें धरी आणि अशाच तऱ्हेनं कांहीं थोडीशी चापलुसी आणि खुशामत करून आपल्या व्यसनासाठीं दोन चार आण्याची सोय करून घेई. विजयी पक्षाची बाजू घेऊन त्यांच्यापुढें हातांत जानवें धरून दुर्गेचं नांव घेऊन आणखीन असाच कांहीं तरी हास्य-विनोद करून त्यांच्यामध्यें भागीदारी मिळवी. कधीं चार पैसे जमलेच जवळ तर खेळायलाही बसे. जिंकण्यापेक्षां हरण्याचें प्रमाणच जास्त. कधीं चार पैसे जास्त मिळाले तर मग मात्र विचारूंच नका. तुमच्या हाताला कधींच लागणार नाहींत ते. अफूच्या दुकानांत जाऊन पुन्हां जुन्या सरदार-मानकऱ्यांची जागा तो शोभवित असे. राजा महाराजांचं आसन ग्रहण करून दरबार भरवीत असे आणि मनांतल्या मनांत शुभदेच्या चेहऱ्याची आठवण करीत घरीं येऊन भडकत असे. शुभदाच्याकडं खायला प्यायला मिळत होतं, तिची जमीनदारी कधींच बुडणारी नव्हती. त्याची शुभदा मूर्तिमंत अन्नपूर्णाच होती. तिचा हात कधींच रिता नसायचा; इतर कुणांसाठीं नसलं तरी त्याच्यासाठीं एक मूठभर तरी भात राखून ठेवलेला असायचाच. परंतु घरीं परत येत असतांना त्याला थोडं जड जात असे, मनाला टोंचणी लागत असे आणि घर जवळ आलं कीं त्याचे पाय उचलत नसत. शेवटीं घरांत प्रवेश केल्यानंतर तो अधिकच शरमिंदा होत असे. शुभदा त्याला पाय धुवायला पाणी देत असे; पाय पुसत असे आणि ताट वाढून त्याच्यासमोर दीन चेहरा घेऊन बसत असे. त्या वेळीं त्याच्या मनाची टोंचणी त्याला असह्य होत असे आणि त्याच्या घशाखालीं घांस उतरत नसे. संध्याकाळचे पांच वाजलेले

असोत किंवा रात्रींचे तीन वाजलले असोत, शुभद्रा जेवण्याचं ताट वाढून घेऊन त्याची वाट पाहात बसलेली असे. उशीर कां केलात किंवा एवढी रात्र कां झाली म्हणून एकदांहि तिनं प्रश्न केला नाहीं किंवा कुरकुर केली नाहीं. या तिच्या करण्यामुळें त्याच्या मनाला जास्त टोंचणी लागत असे. पती पतीत असूनही इतकी श्रद्धा, इतकी भक्ती आणि अशा प्रेमाला आपण पात्र नाहीं याची त्याला जाणीव होती; त्यामुळें तर त्याला मनाची बोंचणी अधिक असह्य होऊन जात असे; आणि एवढ्या प्रेमाचा आणि श्रद्धेचा तो उपभोगही घेऊं शकत नव्हता. एकाद्यानें नेहमीच अपराध करावा आणि दुसऱ्यानें त्याला नेहमींच क्षमा करीत असावं अशांतलाच प्रकार. त्यामुळें गांजेकस आणि नशाबाज असूनही त्याला शरम वाटत होती. एकदांही शुभदा त्या अत्याचाराचा प्रतिकार करीत नव्हती, एक ब्रही काढीत नव्हती. हें आता पुरें झालं, मला आतां हें सहन होत नाहीं, माझ्या सहनशक्तीची सीमा खुंटली आहे असें तिच्या तोंडून एकदांहि निघालें नाहीं. हारानचंद्राला त्यामुळें रोज रोज तोच अन्याय करीत असतांना लाज वाटत होती. दिवस अशाच तऱ्हेनें जात होते.

आज पुष्कळ रात्र उलटल्यानंतर हारानचंद्र घरीं परतला होता. घरांत घुसल्यानंतर त्यांला थोडंसं विचित्र वाटलं. आज शुभद्रा पाय धुवायला पाणी घेऊन पुढें आली नाहीं किंवा कोंपऱ्यांत एका ठराविक ठिकाणीं जेवणाचं ताट वाढून घेऊन कुणी तरी वाट पाहात बसलं आहे हें दृश्यही त्याला दिसलं नाहीं; त्यामुळें त्याला थोडसं चमत्कारिक वाटलं. एका कोंपऱ्यांत एक दिवा मंद प्रकाश टाकीत जळत होता. दिव्यांतला उजेड जास्त ठळक करण्यासाठीं हारानचंद्र दिव्य जवळ गेला तेव्हां दिव्यांत तेल नाहीं हें त्याला दिसून आलं. त्याला भीति वाटली—आज दोन दिवसानंतर तो घरीं परतला होता. ह्या दरम्यान कांहीं बरं वाईट तर झालं नाहीं ना? बिछान्याच्या एका कडेला बसून हारानचंद्र कसल्या तरी विचारांत गढून गेला.

उजाडत आलं होतं तरी पण घरांतून कुणीही बाहेर आलं नाहीं. हारानचंद्रानें काय विचार केला कुणास ठाऊक? हलक्या पावलानं चोराप्रमाणें हातांत जोडे घेऊन तो चुपचाप घराबाहेर पडला.

घरांतून निसटतांना आपल्याला कुणीच पाहूं नये अशी त्याची इच्छा होती. परंतु तसं झालं नाहीं. ओटयावर छलनामयी बसली होती. इतक्या पहाटे ती कधीं उठत नसे. परंतु कां कोणास ठाऊक ती लौकर उठून बाहेर येऊन बसली होती. हारानचंद्राला पाहतांच तिनं ओरडून विचारलं, " बाबा केव्हां आलांत ? " हारानचंद्र एकदम चमकला. परंतु त्यानें लगेच स्वतःला सांवरून घेऊन उत्तर दिलं, " काल रात्रीं."

" बाबा, तुम्हाला झालं आहे तरी काय ? रात्रीं आई, आत्या, आक्का सगळींच माणसं उपाशीं होतीं. एक थेंबभर पाणीसुद्धां कुणाला प्यायला मिळालं नाहीं आणि तुम्ही तर असे पळून चालला आहांत. आज आम्ही काय खावं, सांगा ? "

हारानचंद्राच्या हृदयावर घाव बसला. हातांतून जोडे आपोआप गळून पडले. पुष्कळ वेळपर्यंत एकाद्या दगडाप्रमाणें उभा राहून त्यानें विचारलं, " छलना खरं सांगत आहेस तूं हें ? "

छलनामयीनं आपला आवाज आणखीन् चढवून ओरडण्यास सुरुवात केली, " ए आत्या ! ऐकलंस का बाबांचं म्हणणं ? जसं कांहीं मी खोटंच सांगतें आहें ? काल सगळी रात्र भाईनं आणि अक्कानं रडून रडून घालविली पण त्याचा तुम्हाला कसा पत्ता लागणार ? फक्त इथें जेवायला येण्यापुरताच आमचा आणि तुमचा संबंध ! "

हारानचंद्राला आतां तिथं उभं राहणं शक्य नव्हतं. हातांत जोडे घेऊन त्यानें तिथून पळ काढला. छलनानें पुन्हां ओरडून म्हटलं, " अग ऐकतेस का ? बाबा पळून गेले पाहा ! "

छलना लहान आहे, अजून तिच्यांत पोंच नाहीं आणि शिवाय ती बोलभांड होती. कुणाशीं कसं बोलावं हें तिला अजून समजत नव्हतं. ललनानं लपून सारं ऐकलं होतं. हारानचंद्र निघून गेल्यानंतर हळू हळू छलनाच्या पुढें येऊन तिनं म्हटलं, " छलना, तुझी अक्कल नाहींशी झाली आहे का ? "

" काय झालं ? "

"कुणाशी कसं बोलावं हें अजून तुला कळत नाहीं ? अशा तऱ्हेनं नाहीं नाहीं ते शब्द बोलून, बाबांना दुखवलंस आणि त्यांना पळवून लावलंस बरं दिसतं का ?"

छलनामयीनं रागावून विचारलं, "मी पळवून लावलं का ते आपण होऊ-नच पळून गेले ?"

"छी: वडिलांबद्दल कुणी असं बोलतं कां ?"

"कां नाहीं बोलत ? वडील वडिलांसारखे वागले तर त्यांना असे शब्द बोलूं नये, परंतु अशा बापाला कसाब म्हटलं तरी चालेल. कुणाचे बाप अशा तऱ्हेनं पळून जातात ? कुणाचे बाप अशा तऱ्हेनं गांजा पिऊन आणि अफू खाऊन घराबाहेर सदोदीत पडून राहतात ? मी जरूर बोलेन, पुन्हां पुन्हां बोलेन."

ललना क्रुद्ध होऊन म्हणाली, "छलना, जा—इथून निघून जा."

"मी कां निघून जाऊं ? तूंच निघून जा इथून. माझ्यावर हुकमत नाहीं चालणार तुझी."

माघार घेऊन ललना तिथून गपचूप निघून गेली.

## ११

त्याच दिवशीं दुपारीं रासमणीच्या पुढें पितळेचं एक भांडं ठेवीत शुभदा म्हणाली, "आक्का, फार उशीर झालाय, आज ते येणार नाहींत असं दिसतंय. हें भांडं गहाण ठेवून कांहीं मिळालं तर पाहा."

कांहीं क्षण शुभदाच्या तोंडाकडे पाहून रासमणीनं म्हटलं,

" फार लाज वाटते सूनबाई ! "

ललना तिथेंच उभी होती. तिनं भांडं उचलून म्हटल,

" आई, मी एकदां जाऊन पाहतें. "

भरलेल्या आवाजांत शुभदानं विचारलं, " कुठं जातेस ? "

आईच्या तोंडाकडे पाहात ललनेनं हंसून म्हटल, " त्याच घोषच्या दुकानावर. "

" तूं जातेस ललना ? "

" कां ? त्यांत लाज कसली ? मी ह्याच गांवांतली मुलगी आहें, लहानपणापासूनच सगळे मला पाहात आले आहेत, इथें मला कसली लाज ? चांगले वाईट दिवस कुणाच्या घरीं येत नाहींत आई ? "

ललना निघालेली पाहून रासमणीनं तिच्या हातांतलें भांडं घेत म्हटलं, " मीच जाऊन येतें."

त्या दिवशीं दुपारीं तीन वाजून गेल्यानंतर सगळ्यांचीं जेवणं आटोपलीं सगळीं तृप्त होऊन उठल्यानंतर ललनेला बाजूला घेऊन शुभदानं म्हटलं,

" ललना सहजनच्या झाडाचीं पानं तर घेऊन ये बाई "

ललनेनं विस्मय—चकित होऊन विचारलं, " आतां सहजनचीं पानं घेऊन काय करतेस आई ? "

" काम आहे. मला पाहिजे आहेत तीं ? "

" काय काम आहे आई ? कशाला पाहिजेत ? "

शुभदा थोडंसं हंसून म्हणाली, " ऐकून तुला काय करायचंय ? "

शुभदेचा हेतु ललनेला थोडासा समजून चुकला. काग भात उरला नाहीं ना ? "

" उरला आहे ना ! "

" मग ? "

" गृहस्थांच्या कुटुंबांत थोडीशी भाजी तयार असलेली बरी. "

ललनेनं घाबरून विचारलं, " खरंखरं सांग ना आई काय करते आहेस तें ? "

" काय करणार मी ? "

" तुझ्या पायां पडते आई माझ्यापाशीं लपवूं नकोस ! "

शुभदाचे पाय धरायला ललना खालीं वाकली इतक्यांत शुभदानें तिचे हात धरून तिला उठवलं आणि तिला जवळ घेऊन तिच्या कपाळावरले केंस कानांच्या बाजूला सारीत प्रसन्न मुखानं म्हटलं,

" एका माणसाला पुरण्या एवढाच भात उरला आहे, ते आले तर..."

" तर काय तूं फक्त तीं सहजनचीं पानं खावून राहणार ? "

शुभदा हंसूनच म्हणाली, " सहजनची पानं खाण्यासारखीं नाहींत का ? "

" खाण्यासारखीं असतीं तर मग एकट्यानेंच कां खावीं ? सगळ्यानींच खाऊं ? "

" राहूं दे ह्या गोष्टी बाजूला. मघाशीं तूंच म्हटलं होतंस ना, ललना, बरे वाईट दिवस कुणाच्या घरीं येत नसतात म्हणून ? तर मग बऱ्या आणि वाईट दिवसांचा कां विचार करावा ? देवाच्या मनांत आलं तर सगळं कांहीं चांगलं होईल. त्या वेळीं........." बोलतां बोलतां शुभदाचे डोळ भरून आले.

ललना रडत रडत बाहेर निघून गेली आणि थोड्याच वेळांत परत येऊन सहजन झाडाच्या पानांचा ढीग आईच्या समोर रचून डोळे पुशीत पुशीत बाहेर निघून गेली.

संध्याकाळ व्हायला अजूनही वेळ होता. ब्राह्मणपाडा गांवाच्या एका छोट्याशा मोदीच्या दुकानाच्या कडेला एक भिकारी चुपचाप उभा होता. दुकान लहानसंच होतं. एक दोन पैश्यांची गिऱ्हाइकी करणाऱ्याशिवाय तिथं सहसा दुसरं कुणी येत नसे. कितीतरी लोक येऊन पैशाचं मीठ आणि पैशाचं तेल घेऊन परत जात होते. अशाच तऱ्हेनं किती तरी वेळ निघून गेला. तरी तो भिकारी तिथं स्वस्थ उभा राहून खरेदी-विक्री पाहात होता. बऱ्याच वेळा-नंतर दुकानदाराची वृष्टी त्याच्यावर पडली, त्यानं विचारलं, " तुम्हाला काय हवंय हो ? "

भिकाऱ्यानें मान हालवून म्हटलं; " कांहीं नाहीं. "

दुकानदारानें चिडून म्हटलं, " तर मग इथं उभा राहून गर्दी करूं नकोस. "

एका गिऱ्हाईकानं म्हटलं, " कदाचित् भीक मागण्यासाठीं उभा असेल."

दुकानदारानं अधिकच चिडून म्हटलं, " जा, जा बाबा जा. इथं तुला कांहींच मिळणार नाहीं. आणि संध्याकाळच्या वेळीं कसली भीक मागतोस ! "

भिकारी निघून गेला, पण फारसा लांब न जातां पुन्हां वळून येऊन तो पूर्वीच्याच ठिकाणीं उभा राहिला. भिकाऱ्याला परत आलेला पाहतांच दुकानदारान विचारलं,

" पुन्हां कां आलास ? "

" तांदूळ विकत घ्याल ? "

" कसले आहेत तांदूळ ? काय भाव ? "

" जाडे तांदूळ आहेत. "

" कसे आहत पाहूं ? "

भिकाऱ्यानं आपली झोळी उघडून म्हटलं, " हे असे आहेत पाहा. "

दुकानदाराने माल पाहून भुंवया चढवीत म्हटलें, " हा तर भिकेचा तांदूळ आहे, किती पैसे पाहिजेत ? "

तांदूळ विकणाऱ्यानें दुकानदाराच्या तोंडाकडे पाहात म्हटलें, " दोन आणे. "

" हुश्श ! चार पैशांचे सुद्धां तांदूळ नाहींत आणि दोन आण्याला विकायला निघाला आहे ! मला नकोत जा."

ह्या भिकाऱ्याची ओळख करून द्यायचं कारण नाहीं. हा आपला हारानचंद्र होता.

हारानचंद्र जवळच्याच एका झाडाखालीं जाऊन बसला. झाडाखालीं बसल्यानंतर एक मूठभर तांदूळ पिशवींतून घेऊन खाऊं लागला. खातां खातां तो विचार करीत होता—एवढे तांदूळ काय चार पैशाला विकूं ? साऱ्या दिवसाच्या कष्टांची किंमत फक्त चारच पैसे ? अड्ड्यावाल्याजवळ घेऊन गेलों तर चार दिवसाच्या नशापाण्याचा तो बंदोबस्त करून देईल. पण तिथं हे घेऊन कसा

जाऊं? छीः साला अड्डेवाला भिकेचे तांदूळ तात्काळ ओळखील. मग काय करावं? छीः छीः छीः—घरीं घेऊन जाऊं? परंतु हे एवढेसे तांदूळ कुणाच्या तोंडांत घालूं? राहूं द्या......

हारानचंद्रानं पिशवी व्यवस्थित बांधली आणि पुन्हां त्याच दुकानदाराकडे जाऊन त्याला हांक मारून म्हटलं, "घेऊन टाका."

"चारच पैशाला देशील ना?"

"हां."

"तर मग त्या टोपलींत टाक."

हारानचंद्रानें टोपलींत तांदूळ ओतून हात पुढें केला. दुकानदारानें दिलेले चार पैसे घेऊन बाजूला जाऊन त्यानें पोटभर हंसून घेतलं. तो मनांतल्या मनांत म्हणत होता—"कसं उल्लूं बनवलं दुकानदाराला! साले जसे कर्म करतात तसलींच फळं भोगतात. चार पैसे द्यायला निघाला होता! अर्धे तांदूळ मी खाऊन टाकले आणि बाकीचेच नेऊन दिले ह्याचां पत्तासुद्धां घेटच्याला लागला नाहीं."

मनांतल्या मनांत आपल्या अक्कलहुषारीवर मौज उडवीत हारानचंद्रानें संध्याकाळच्या अंधारांत अफूच्या दुकानाचा दरवाजा उघडून आंत प्रवेश केला.

# १२

"आतां आणखीन सहन होत नाहीं ललना!"

तीन दिवस उंपास काढून शेवटीं शुभदा आपल्या मुलीच्या गळीं पडून रडूं लागली.

ललनानें मोठ्या कष्टानं आईचे अश्रू पुसून म्हटलं, “ असं काय करतेस आई ? हे दिवस का असेच राहणार आहेत ? येतील चांगले दिवस. ”

शुभदा रडत रडतच म्हणाली, “ देव करो आणि तुझ्या तोंडांत साखर पडो. पण आतां सहन करवत नाहींग ! तुमची आई होऊन उघड्या डोळ्यानं तुमची दुर्दशा कशी पाहूं ? मी तर आतां आई भागीरथीच्या चरणांचा ठाव घेणार आहे; माझ्यामागें ह्यांचा नीट संभाळ कर ललना. दारोदारीं भीक मागणं —आईग !— हें आतां आणखिन सहन करवत नाहीं ! ”

शुभदा आपल्या मुलीच्या गळ्यांत हात घालून ज्या तऱ्हेनं रडत होती, ज्या तऱ्हेनं आक्रोश करीत होती ती तऱ्हा पाहून दगडाचाहि मन द्रवलं असतं ! आज किती तरी दिवसांनीं तिचा मनावरचा ताबा उडाला होता. तिची सहनशक्ति नष्ट झाली होती. नंतर धैर्य गळून गेलें होतें आणि म्हणूनच आज तिला तोंड आवरणं कठीण होऊन गेलं होतं. ज्याला कधींही राग येत नाहीं तो जर रागावला तर त्याला आवरणं अशक्य होऊन बसतं. जो नेहमीं शांत असतो त्याच्या हृदयांत जर वादळ निर्माण झालं तर तें वादळ प्रलयकाळाचं स्वरूप धारण करतं; त्यामुळेंच ललना संकटांत पडली होती. कुठल्याही तऱ्हेनं आपल्या आईची समजूत घालणं तिला शक्य होईना, परंतु तिला तसंच रडूं दिलं तर तेंही त्रासदायकच होणार होतं; सगळं खरं पण ललनाला कांहींच करतां येत नव्हतें. शेवटीं रात्रीं पुष्कळ उशिरां दोघीही रडून रडून त्याच जागीं एकमेकांना बिलगून झोपीं गेल्या.

हारानचंद्राच्या विचारामुळें शुभदेला काळजी लागू राहिली होती. आज सहा दिवस झाले तो घरीं परतला नव्हता. कदाचित् अपमान आणि लांछनेच्या भीतीनं त्यानें आत्महत्त्या केली असावी असं शुभदेला वाटत होतं. मुलगी होऊन छलनामयीनं ज्या प्रकारें त्याला अपमानित आणि ताडित करून पाठविलं होतं त्यामुळें मनाला लावून त्यानें कदाचित आत्महत्त्या केली असेल तर त्यांत आश्चर्य वाटण्याजोगं कांहींच नव्हतं. हीच गोष्ट अष्टौप्रहर शुभदेच्या मनांत येऊन जात होती. आजही रात्रीं ह्याच विचारानं शुभदा चमकून उठून बसली आणि ललनेला उठवून म्हणाली, “ अग, ते आतां नाहींत.” झोपेंत ललना नीट कांहींच

समजू शकली नाहीं, आपल्या आईकडं पाहून तिनं विचारलं, "कोण आई?"
"मी स्वप्नांत आतां पाहिलं कीं ते आतां नाहींत. – ते जिवंत नाहींत."

"असं कां म्हणतेस आई"–असं म्हणून ललना रडूं लागली. त्यानंतर दोघींनीं उरलेली रात्र रडूनच काढली.

हळूं हळू सूर्य वर चढूं लागला. जवळ जवळ दहा वाजतां कृष्णा ब्राह्मणीनं स्नान करून परत जात असतांना वाटेंत हारानबाबूंच्या घरीं प्रवेश केला आणि अंगणांतच थांबून हांक मारली, "सूनबाई !–"

शुभदानं बाहेर येऊन म्हटलं, "काय अक्का? बसा."

"आतां बसत नाहीं सूनबाई, उशीर होतो आहे. स्नान करून परत जातेंय्. घरीं जातां जातां जरा सूनबाईला तरी पाहून जावं म्हटलं."

शुभदा गप्प बसली.

कृष्णा ब्राह्मणीनं मान वांकडी करून म्हटलं, "सूनबाई, ऐकून तरी घे जरा."

शुभदा जवळ येतांच तिनं पुन्हां विचारलं, "हारानचा पत्ता लागला का?"

शुभदानं उत्तर दिलं, "नाहीं."

"आज किती दिवस झाले तो घरीं आला नाहीं त्याला?"

"झाले सहा दिवस."

"सहा दिवस झाले? ब्राह्मणपाड्याला कुणाला पाठवलं होतं का?"

"कुणाला पाठवायचं? कोण जाणार?"

"हो तुझं म्हणणंही बरोबर आहे; मग मला कां नाहीं सांगितलंस?"

शुभदानं कांहींच उत्तर दिलं नाहीं. पाण्याची कळशी खाली घसरत चालली होती; तिला परत यथास्थानीं वर सरकवून ठेवीत कृष्णप्रियानं विचारलं, "कांहीं पैसे आहेत का जवळ?"

"कांहींच नाहीं."

"मग चालतं कसं?"

शुभदा गप्प बसली.

"मुलाचं कसं आहे?"

"आहे तसंच आहे."

" ललनाला जरा माझ्या घरीं पाठवून दे. "

कृष्णाप्रिया निघून गेल्यानंतर ललनेला बोलावून शुभदेनं म्हटलं, " कृष्णाआक्कानं तुला बोलावलं आहे, जरा तिच्या घरीं जाऊन ये पाहूं. "

" कशाला बोलावलं आहे ? "

" मला माहीत नाहीं."

ललना कृष्णाप्रियाच्या घराकडे निघून गेली. कांहीं वेळानंतर परत येऊन आपल्या आईच्या हातांत दोन रुपये देत म्हणाली, " कृष्णाआत्यांनीं दिले आहेत "

" शुभदानें रुपये पदरांत बांधून घेत विचारलं,

" आणाखिन् कांहीं म्हटलं कां " तिनं ?

" हो, ती म्हणाली, बाबा आले म्हणजे कळव."

शुभदानें त्या दिवशीं देवाच्या पायांवर वारंवार मस्तक ठेवलं. पूजेच्या खोलीत असलेल्या दुर्गेच्या प्रतिमेसमोर कितीतरी वेळ हात जोडून उभी राहिली आणि बाहेर येऊन पुष्कळदां तुळशीला गुडघे टेकून नमस्कार केला. एवढं सगळं केल्यानंतर खाण्यापिण्याचं सामान विकत आणायला पैसे देऊन ती गंगे-वरून स्नान करून आली.

त्या दिवशीं मनासारखा आहार मिळाला होता म्हणून ललना आनंदानं हंसत-खेळत आपल्या बाहुलीला घेऊन आपल्या मैत्रिणीच्या घरीं खेळायला गेली.

रात्रीं अंधार पडल्यानंतर काळोखांत तोंड लपवून हारानचंद्र आज घरीं परतला होता. सहा दिवसांपूर्वीं त्याची जी अवस्था होती तीच आजही होती; कांहींच बदल झाला नव्हता. जो काय बदल झाला होता तो त्यांच्या कप-ड्यांत ! कोळशांहूनही काळे ठिक्कर असे त्याचे कपडे झाले होते आणि कपड्यांची लक्तरें लोंबत होतीं. त्यामुळें शंभर ठिकाणीं त्यांना गांठी मारण्यांत आल्या होत्या. बस्स एवढाच फरक होता. वेळेवर त्याला यथास्थित जेवण वगैरे घालून शुभदानं ललनेला एका बाजूला बोलावून हंसून म्हटलं, " बाकी दररोज तुझंच तोंड पाहून उठेन तर बरं होईल. "

ललनेनंही हंसून विचारलं, " कां आई ? "

" आज मला जें समाधान झालं तेवढं जन्मांत कधीं झालं नव्हतं. "

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ललना कृष्णा आत्त्याकडे जाऊन म्हणाली, " आत्त्या, बाबा काल रात्रीं परत आले आहेत. "

कृष्णा ब्राह्मणीचा चेहरा फुलून उठला, जणूं कांहीं तिच्या मागची एक मोठी काळजी मिटली ! तिनं हंसून विचारलं, " हो ? आला का ? बरा आहे ना ? "

" हो. "

" इतके दिवस कुठें होता ? सांगितलं का कांहीं त्यानं ? "

" ठाऊक नाहीं मला. "

" सूनबाईनें विचारलं नाहीं वाटतं ? "

" नाहीं. "

" तुझ्या आत्त्यानें सुद्धां नाहीं विचारलं ? "

" नाहीं. ती त्याच्याशीं बोलतच नाहीं. "

" बोलत नाहीं ? कां ? "

" मी कसं सांगूं ? "

अकरा वाजायच्या सुमारास केळीच्या पानानं झांकलेली एक वाटी हातांत घेऊन, शुभदाच्या घरीं येऊन कृष्णप्रिया ब्राह्मणीनं म्हटलं, " सूनबाई, थोडीशी भाजी आणली आहे—हारानसाठीं. "

शुभदानं हातांत वाटी घेऊन शेजारच्या खोलीकडे पाहात म्हटलं, " त्या खोलींत आहेत. "

ब्राह्मणीला तिचा हेतु कळून चुकला. ती म्हणाली, " राहूं दे आतां ह्या वेळीं भेटणार नाहीं त्याला. घर तसंच उघडं टाकून आलें आहे. "

ब्राह्मणीनं अर्ध्या अंगणापर्यंत जाऊन पुन्हां परत येऊन विचारलं, " सूनबाई, हारानला एक गोष्ट विचारून घेशील ? "

" कोणती ? "

" तो इतके दिवस कुठें होता हीच. "

शुभदानें मान हालवून म्हटलें, " बरं विचारीन ! "

हारानचंद्र ला जेवायला बसवून शुभदाने त्याला हळूच प्रश्न केला, " इतके दिवस कुठें होतां ? "

हारानचंद्रानें उतरलेल्या चेहऱ्यानं खालीं मान घालून उत्तर दिलं, " झाडांखालीं. "

शुभदा त्यानंतर काय बोलणार ?

दुसऱ्या दिवशीं कृष्णप्रिया पुन्हां आली आणि पुष्कळ वेळ इकडल्या-तिकडल्या गप्पा मारून तिनं विचारलं,

" सूनबाई, विचारून घेतलंस ? "

" हो. "

" काय म्हणाला ? "

" झाडाखालीं राहात होतों म्हणाले. "

पुन्हां इकडल्या तिकडल्या गप्पा गोष्टी सुरू लागल्या. उठतांना लुगड्यांत लपवून आणलेले कापडाचे दोन ठाण बाहेर काढून ब्राह्मणी म्हणाली, " घरांत पडले होते, हारानच्या उपयोगाला तरी येतील म्हणून आणले आहेत."

शुभदानें हात पुढें करून कापड घेतलें.

कृष्णप्रिया कांहीं क्षण शुभदाच्या चेहऱ्याकडे पाहात राहिली आणि नंतर आवाजांत गोडवा आणून म्हणाली,

"पाहा, सूनबाई, कुणी दिलेंत म्हणून जर हारानने विचारलं तर दुसऱ्य कुणाचं तरी नांव सांग. माझं नको सांगूं! "

शुभदानें हंसल्यासारखं करून विचारलं, " कां ? "

कृष्णप्रियानं थोडसं इकडे तिकडे करून म्हटलं, " असंच. "

" आणि सांगितलं तर ? "

ह्या वेळीं ब्राह्मणीनेंही हंसून म्हटलं, " सांगितलंस तर आपल्या कृष्णा आक्काचं मांस खाशील. "

एक एक दिवस उगवत होता, मावळत होता. घरीं परत आल्यानंतर हारानचन्द्र पुन्हा म्हणून बाहेर गेला नाहीं. एका परीनं शुभदा त्याच्या बाबतींत आतां पुष्कळच निश्चिंत झाली होती, परंतु दुसरीच एक काळजी तिच्या

मनांत घर करून.राहिली. घरांत खाण्या-पिण्याचं कसं करायचं हीच काळजी तिला दररोज सतावूं लागली. ही एकच गोष्ट तिच्या दुःखाला आतां कारण झाली होती. कधीं कुणाकडून एकादा रुपाया आणला तर कधीं दुसऱ्यानें दोन रुपये दान दिले अशा तऱ्हेनं त्यांचा संसार चालला होता. परंतु असं किती दिवस चालणार ? आणि एवढीच एक काळजी होती का ? माधवचा चेहरा पाहिला कीं तिच्या काळजांत चर्र होत असे आणि ह्या सगळ्यांवर कळस म्हणजे छलनामयीच्या लग्नाची काळजी ! ती दररोज वाढत चालली होती. माधवच्या काळजींतून ती मुक्त होऊं शकत असे परंतु छलनेच्या काळजींतून तिला मुक्त होतां येत नव्हतं. छलना हिन्दु कुटुंबांतली मुलगी होती. तिचं लग्न केल्या शिवाय तिच्या काळजींतून मुक्त होतां येत नव्हतं. माधवचा चेहरा पाहिला कीं शुभदेच्या रक्ताचं पाणी होऊन जात असे परंतु छलनेला पाहिलं की तिच्या शरिरांतले प्राण उडून जाण्याची इच्छा करीत असत. ह्या सगळ्या काळज्यांमुळं शुभदा हळूहळू खंगत चालली होती. हें कुणाच्या लक्षांत आलं नव्हतं. एका ललनेच्या नजरेंतून ही गोष्ट सुटूं शकली नव्हती. गंगेवरून एक कळशीभर पाणी आणतांना आईला दम लागतो हें ललनेला दिसत होतं इतकंच नव्हे तर भाजी चिरीत असतांना, बटाटे आणि पडवळाची सालपटं छिलून काढतांना आईचा हात मध्येंच अटकतो हेंही तिनं पाहिलं होतं. हल्लीं तिचं खाणंही कमी झालं होतं. ती पूर्वीं दोन वेळां जेवत असे परंतु आताशां तिसऱ्या प्रहरीं एकदांच काय ती जेवून घ्यायची. तिला जेवण्यासाठीं पुष्कळ आग्रह केल्यावर ती उत्तर देत असे, " मला आतां भूक नाहीं. "

ललना हें सगळं पाहात होती आणि एकांतांत जाऊन खूप रडत होती. कधीं कधीं खोलीचा दरवाजा बन्द करून घेऊन कपाळांवर तडातडा हात मारून घेत होती. अशा करण्यानं कधीं कुणाचा फायदा झाला आहे ?

# १३

आज एकादशी होती तरी शुभदा स्वयंपाक करीतच होती. ललनेनं स्वयंपाक घरांत जाऊन पाहिलं, चुलींत आई कांहींतरी भाजीत आहे. काय तें ओळखतां आलं नाहीं म्हणून ललनेनं विचारलं, " आई काय भाजते आहेस ग ? "

" मोहरीचीं फुलं आहेत तीं ? "

" काय करणार आहेस त्यांचं ? "

" भाजून छलनेला देतें. आज नदीवरनं स्नान करून येतांना कुठल्या-तरी शेतांतनं तिनं हीं तोडून आणून मला तळायला दिलीं आहेत. जेवतांना तिला तोंडीं लावायला पाहिजे म्हणून तिनं बजावलं आहे. परंतु घरांत तेल नाहीं म्हणून तिला हीं फुलं केळीच्या पानांत बंद करून भाजून देत आहे."

ललनानं पुढं विचारलं नाहीं.

जेवायच्या वेळीं फुलांची अवस्था पाहून छलनामयी गरजून म्हणाली, " ह्याला तळणं म्हणतात काग आई ? राख झाली आहे सगळ्यांची ? "

शुभदानं भीत भीत म्हटलं, " थोडीशीं जळून गेलीं आहेत."

" मी नाहीं खाणार जा. जळलेली वस्तु तुला चांगली लागते वाटतं ? " हीं घे. आतां तूंच खा. चेहरा फुगवून पानावरून तीं फुलं जमिनीवर काढून ठेवीत छलना म्हणाली.

छलना भडभडी होती. मनांतून कशी होती कुणास ठाऊक. तिच्या मनासारखी एकादी गोष्ट झाली नाहीं तर ती सगळं घर डोक्यावर घेत असे. आणि त्या वेळीं तिच्या तोंडाला तोंड द्यायचं धैर्य कुणालाही होत नसे, एवढं मात्र खरं.

खूप बडबड करून छलना जेवून निघून गेली, तेव्हां ललनेनं म्हटलं, "आई, छलना दिवसें दिवस वाईट गुण धरतेय. तिला तूं बोलत कां नाहींस ? तिला बोलायची माझी कांहीं छाती होत नाहीं; एकाच्या जागीं ती दहा ऐकवते."

शुभदानं विचार करून म्हटलं, "सगळ्या मुली काय तुझ्यासारख्याच असतात ललना ? हाताची पांच बोटंसुद्धां सारखी नाहींत ! छलनेला तिच्या मनासारखं मला खायला घालतां येत नाहीं. तिला मनासारखा कपडा देतां येत नाहीं.—मग काय करायचं ? ती बोलेल तें ऐकून घेतलं पाहिजे."

"हें चांगलं दिसतं कां पण ?"

"चांगलं दिसत नाहीं हें मला माहीत आहे; परंतु मी तरी काय करूं ? माझेच दिवस चांगले असते तर छलना तरी कशाला असं बोलली असती आणि मला तरी कां ऐकून घ्यावं लागलं असतं ?"

शुभदाचं म्हणणं बरोबर आहे हें ललनेला पटलं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जवळ जवळ त्याच वेळेला उतरलेला चेहरा घेऊन ती आईजवळ जाऊन उभी राहिली. शुभदानं तिच्या तोंडाकडे पाहून विचारलं, "काय झालं ?" ललनानें एक रुपया काढून म्हटलं, "कृष्णा आत्त्यानं म्हटलं कीं आतां मी किती जरी खणलं तरी पाणी निघणार नाहीं. आपल्या बापाला सांग कीं आतां कुठं तरी कामधंदा पाहा, मीच स्वतः दीन-दुःखी आहे, ह्या पुढें मला आणखीन कांहीं देतां येणार नाहीं."

त्या दिवशीं घरचा कामधंदा आटोपून ललना माधवच्या जवळ येऊन बसली.

माधवनं विचारलं, "आक्का, त्याचं काय झालं ?"

"कशाचं काय माधव ?"

माधवनं थोडं थांबून म्हटलं; "तिथं जायचं ?"

ललनाही थोडी अडखळली; परंतु लगेच विचार करून ती म्हणाली, "त्या बाबतींत मी तुला आज कांहीं सांगणार आहे माधव."

माधवनं कष्टानं उठून बसत विचारलं, "काय आक्का ? तिथं केव्हां जायचं ?"

" तिथं मी उद्यां जाईन. "

" उद्यां जाणार तूं आणि मी ? "

" आधीं मी जातें आणि मग तू ये. "

माधवनं घाबरून म्हटल, " कां ? दोघेंही बरोबरच जाऊं कीं आक्का ! "

ललनानं म्हटलं, " नको, आई फार रडेल. "

माधवनं क्षुब्ध होऊन म्हटलं, " रडूं दे तिला. "

" छे, असं म्हणूं नये बाळा. मीच जाईन. "

" पुन्हां परत कधीं येणार तूं "

" तूं ज्या दिवशीं येशील त्याच दिवशीं एकदां येऊन जाईन. "

" मग त्या आधीं तूं येणार नाहींस मधून मधून ? "

" नाहीं. "

" मग मी कधीं येऊं ? "

" ज्या दिवशीं मी तुला घेऊन जाईन तेव्हां. "

" मला घेऊन जायला येशील ? "

" हो. "

" तूं गेलीस तर आई रडणार नाहीं का ? "

" रडेल कदाचित्. "

माधव कांहीं वेळ स्तब्ध राहून म्हणाला, " तर मग आक्का जाऊ नकोस तूं. "

" कां ? "

" आई रडेल ना ? आई रडणार असली तर मी देखील तिथं येणार नाहीं. "

" तर मग तूं येऊं नकोस तिथं. "

कांहीं वेळ स्तब्ध राहून पुन्हां माधवनं म्हटलं, " मग मी नाहीं येणार तिथं. "

" मी उद्यां जाऊं ना माधव ? "

" जा. "

“ मी दिसलें नाहीं, तुझ्याजवळ पुन्हां आलें नाहीं तर तूं रडणार नाहींस ना ? ”

“ मला घेऊन जायला केव्हां येशील ? ”

“ आणखिन् कांहीं दिवसानंतर. ”

“ मग तूं जा, मी रडणार नाहीं. ”

आपलं तोंड फिरवून ललनानें चट्दिशीं आपले डोळे पुसून घेतले आणि नंतर माधवच्या डोक्यावर प्रेमानं हात ठेऊन म्हणाली, “ मी गेल्यानंतर ह्या सगळ्या गोष्टी तूं आईला सांगूं नकोस हं. ”

“ नाहीं सांगणार. ”

“ आई जें सांगेल तें ऐकत जा—तिला त्रास देऊं नकोस आणि औषध वेळेवर घेत जा. ”

“ सगळं करीन. ”

कांहीं क्षण थांबून ललना पुन्हां म्हणाली, “ माधव, सदा भैय्याला तर तूं विसरला नाहींस ना ? ”

“ नाहीं ”

“ तो जर आला—तुला पाहायला आला......”

“ तर ? ”

“ तर सांग कीं आक्का निघून गेली. कुणी जवळ नसतांना सांग हं. ”

“ बरं. ”

त्याच वेळेला शुभदा आंत येऊन म्हणाली, “ रात्र फार झाली ललना, जा आतां; तूं जाऊन झोंप ”

आईच्या शब्दांना माधवनंच उत्तर दिलं, “ आई, आज आक्काला माझ्याजवळ झोंपूं दे. झोंपूं दे ना तिला ? ”

ललनाला सोडायची माधवला त्या वेळीं बिलकुल इच्छा नव्हती हें शुभदाच्या लक्षांत येऊन ती म्हणाली, “ बरं आहे; ललना मग तूं इथेंच झोपून जा—मी वर छलनाजवळ जाऊन झोपतें. ”

शुभद्रा निघून गेल्यानंतर भावाबहिणींमध्यें खूपच हितगुज झालं आणि नंतर माधव झोंपी गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ललना कुणाच्याच दृष्टीस पडली नाहीं. सकाळच्या प्रहरीं उठून ती जें घरचं कामकाज उरकून टाकी तें अजून तसच पडून राहिलं होतं. जेव्हां नऊ वाजून गेले तेव्हां शुभद्रानं माधवला विचारलं, “ माधव, तुझी आक्का कुठं आहे ? ” नंतर तिनं छलनेला प्रश्न केला, “ छलना, तुझी आक्का कुठं गेली आहे ? ”

सगळ्यांनींच उत्तर दिलं, “ माहीत नाहीं. ”

उशीर झालेला पाहून शुभद्राच घरचं काम आवरूं लागली. छलनानं तिला त्या दिवशीं कामांत पुष्कळच मदत केली. स्वयंपाक झाला. सगळ्यांचीं जेवणं आटोपलीं—दोन प्रहर टळून गेली, तरी अजून ललनेचा पत्ता नव्हता. रासमणी ललनाला शोधायला म्हणून बाहेर गेली. ललनेला शोधून आणून द्यावयाचें कबूल करून छलनाही गांवांत गेली.

संध्याकाळ होतांच रासमणीनं येऊन सांगितलं, “ कुठेंच पत्ता लागत नाहीं तिचा. घरीं आली आहे का ? ”

“ नाहीं. ”

संध्याकाळ उलटल्यानंतर छलनानं येऊन सांगितलं, “ आक्का गांवांत कुठंच नाहीं. ”

रात्र हळुहळु सरत चालली तरी ललना घरीं आली नाहीं.

त्या दिवशीं घरीं परत आल्यापासून हारानबाबू कधींच घराबाहेर पडला नव्हता; तोही,—“ आश्चर्य आहे, मुलगी गेली कुठं ” असं म्हणत तिला शोधायला बाहेर पडला. त्यानें रात्रीं बारा वाजतां परत येऊन म्हटलं, “ कुठं गेली ......कुठं गेली............कांहींच समजत नाहीं.”

सगळा दिवस उपास केल्यानंतर शुभद्रा रडूं लागली. रासमणिही रडूं लागली—आणि छलनासुद्धां, सगळींच रडायला लागलीं. फक्त माधवचंद्रानें कुठल्याच गोष्टींत भाग घेतला नव्हता. सगळ्यांचं रडणं, केकणं आणि धांवाधांव पाहून सांगून टाकावं असं एकदां त्याच्या मनांत आलं परंतु लगेच त्याला

आठवण झाली कीं आक्कानं आपल्याला ' सांगू नको ' म्हणून बजावलं आहे. आणि त्यामुळेंच आईला रडतांना पाहूनही कांहींच न सांगतां तो गप्प बसला.

दुसरा दिवस उगवला. सूर्य उगवला आणि मावळला, रात्र झाली; पुन्हां दुसऱ्या दिवशीं सूर्य उगवला आणि मावळला, परंतु ललना परत घरीं आली नाहीं. गांवांत सगळ्यांना ललना नाहींशी झाल्याचं समजलं; गांवांतल्या सगळ्या लोकांचा तिच्यावर लोभ होता. त्यामुळें त्यांनाही दुःख झालं. कांहीं कांहीं लोक रडले आणि कांहीं जणांनीं शुभदाला चार समजुतीच्या गोष्टी सांगितल्या आणि कांहींजणांनीं नाना तर्कवितर्क लढवले. अशाच तऱ्हेनं चार-पांच दिवस निघून गेले.

पहिल्यांदा शुभदा ललनेसाठीं माधवच्या पुढ्यांत रडली होती पण त्याच्याकडे पाहून तिनं तें दुःख गिळलें होतं. आईचं दुःख पाहून कदाचित् माधवनें खरी गोष्ट सांगूनही टाकली असती परंतु जेव्हां सगळंच शांत झालेलें त्यानं पाहिलं तेव्हां पूर्वीप्रमाणेंच तोही कांहीं न सांगता स्वस्थ राहिला.

परंतु शुभदाला मात्र राहून राहून आश्चर्य वाटत होतं; माधव आक्काच्याविषयीं कांहींच कसा बोलत नाहीं म्हणून. तिच्याविषयीं कांहींच कसा विचारीत नाहीं?

" आक्का कुठं गेली ? " म्हणून एकदांही त्यानं विचारलं नाहीं किंवा " आक्का येत कां नाहीं ? " याची चौकशी केली नाहीं हें पाहून शुभदाला नवल वाटत होतं, आणि कदाचित् माधवला ललना कुठं गेली हें माहीत असलं पाहिजे ह्याचा तिला संशय येऊं लागला; पण धैर्य करून माधवला विचारायचं मात्र तिच्या हातून झालं नाहीं.

सहा दिवसांनंतर नंदा कोळी गंगेंत मासे धरीत होता. मोडक्या घाटांवर एक मोठ्या साध्या कांठाची साडी अर्धी पाण्यांत आणि अर्धी जमिनीवर वाळूनें भरलेली पडून होती. ती त्याला दिसली. हारानबाबूंच्या घराशेजारीं त्याचं घर होतं. ललनाला ती साडी नेसतांना त्यानं पुष्कळदां पाहिलं होतं. ती साडी ललनाचीच असली पाहिजे असा त्याला संशय आला. रासमणीला येऊन त्यानें ही गोष्ट सांगितली. रासमणीनं पळत पळत जाऊन ती साडी पाहिली, तिला ती साडी ओळखायला वेळ लागला नाहीं; ती साडी ललनाचीच होती.

रडत–रडत ती साडी घेऊन तो घरीं आली. शुभदानं ती साडी पाहिली, हारानबाबूंनें पाहिली, छलनानं पाहिली आणखिन् त्या वस्तीतल्या चारपांच लोकांनाही पाहिली, ती साडी ललनाचीच होती ह्याबद्दल सगळ्यांचा खात्री झाली ! तिच्याच हाताची शिवण, तिनंच लावलेलं ठिगळ आणि एका कोपऱ्यांत लाल सुतानं तिनं आपल्या हातानं काढलेलं स्वतःचं नांव––सगळं कांहीं ओळखीचं ! शुभदा मूर्च्छित होऊन जमिनीवर पडली. सगळ्या गांवांत ललना गंगेंत बुडून मली अशी बातमी पसरली.

# १

नारायणपूरचे जमिनदार श्रीमान् सुरेन्द्रनाथ चौधरी यांच्या मनांत एके दिवशीं असं आलं कीं, आपण आजारी आहोंत आणि शरीरस्वास्थ्यासाठीं हवा बदलायला कुठें गेलों नाहीं तर कुठला तरी असाध्य रोग आपल्याला जडून बसल. सुरेन्द्रबाबूंचं उत्पन्न फार मोठं होतं आणि त्यांचं वयही फारसं नव्हतं. असेल पंचवीस वर्षांचं. या वयांत व्यसनांची आणि त्यामुळें मित्रमंडळींचीही कमतरता नसते. दोघा-चौघांना बोलावून श्रीमान् सुरेन्द्रनाथांनीं म्हटलं, " माझी प्रकृती अतिशय खराब झाली आहे असं मला वाटतं आणि ह्या बाबतींत काय करावं हेंच विचारायला मी तुम्हाला बोलवलं आहे. "

सगळ्यांनीं माना हालवून म्हटलं, " ह्यांत कसलीच शंका नाहीं, पुष्कळ दिवसांपासून तुमची प्रकृती बिघडत चालली आहे हें आमच्या लक्षांत आलं होतं परंतु तुम्हाला काळजी वाटेल म्हणून आम्हाला तसं सांगायचं अद्याप धैर्य झालं नव्हतं. "

सुरेन्द्रबाबूंनीं म्हटलं, " डॉक्टरचं औषध घेण्यापेक्षां हवा बदलण्यानेंच प्रकृती सुधारेल असा माझा विश्वास आहे. "

परतु सगळ्यांनीं माना हालवून म्हटलं, " ह्यात काय संशय ? हवा बदलण्यासारखं दुसरं औषध नाहीं. " सुरेन्द्रबाबूंनीं विचारलं, " चांगल्या हवेचं एखादं ठिकाण तुम्हाला माहीत आहे का ? "

सगळ्यांनीं पुष्कळशीं नांवं सांगितलीं.

सुरेन्द्रबाबूंनीं क्षणभर विचार करून म्हटलं, " कांहीं दिवस पाण्यावर राहिलं तर कसं होईल ? "

सगळ्यांनींच उद्गार काढले, " वा: किती छान कल्पना आहे ! "

जलप्रयाणाच्या तयारीला सुरुवात झाली. एक मोठी नौका नाना-प्रकारें सजवली जाऊं लागली आणि दोन-तीन महिन्याच्या प्रवासासाठीं जेवढ्या वस्तूंची म्हणून गरज लागणार होती तेवढ्या सगळ्या त्या नौकेवर लादल्या गेल्या. एके दिवशीं शुभ मुहूर्तावर सुरेन्द्रबाबू नौकेवर चढले. त्यांच्याबरोबर कितीतरी मित्र-मंडळी, गाणारे बजावणारे आणि इतर मंडळी होती; त्यांत एक गायिका पण होती. शीड चढवून आणि देवाचं नांव घेऊन खलाशांनीं ती नौका रुपनारायण नदींत हांकारली.

शिडाच्या साहाय्यानं अनुकूल हवेंत ती नौका राजहंसीप्रमाणें पाण्यांतून चालली होती. ठिकठिकाणीं नांगर घालून सुरेन्द्रबाबू आपल्या मित्रमंडळीसह खालीं उतरत असत. कांहीं तास मजेंत घालवून सुरेन्द्रबाबू मंडळीसह परत आले कीं नौका परत पुढचा मार्ग आक्रमूं लागे. अशा प्रकारें त्यांनीं कितीतरी स्थळं पाहून घेतलीं आणि कितीतरी ठिकाणची यात्रा केली. त्यांच्या अशा प्रकारच्या सफरींत बरेच दिवस निघून गेल्यानंतर नौका कलकत्त्याला जाऊन पोंहचली. बरोबरच्या लोकांची इच्छा कलकत्त्यांत कांहीं दिवस जास्त मुक्काम ठोकायचा होता, परंतु सुरेन्द्रबाबू कलकत्त्यांत फार दिवस राहण्याच्या विरुद्ध होते. त्यामुळें त्यांनीं म्हटलं, "कलकत्त्याची हवा चांगली नाहीं, मी इथें राहणार नाहीं." आणि मग त्यांनीं खलाशांना नौका उत्तर दिशेकडे हाकारायला सांगितलं. शेवटीं एकच दिवस कलकत्त्यांत राहून ते लोक उत्तरेकडे निघाले.

कलकत्ता सोडून नौका जेव्हां पुढें चालूं लागली त्या वेळीं मित्रमंडळीच्या मनांत आलं, ' नौकेंत राहून आतां बरेच दिवस झाले आणि पाण्यावरची हवा खाऊन श्रीमंतांची प्रकृतीही पण सुधारली आहे. तेव्हां आतां घरीं जाऊन कुटुंबांत जाऊन राहिलं तर सुधारलेल्या शरिरांवर आणखिन् अधिक तेज चढेल. यापुढें प्रवास करण्याची बहुतेकांची इच्छा नष्ट झाली होती आणि ते लोक घरीं परत जायला उत्सुक झाले होते; त्यांतल्या एक-दोन लोकानीं धैर्य करून म्हटलं, " सुरेन्द्रबाबू, घर सोडून बरेच दिवस झाले नाहीं ? आतां तुमची

प्रकृतीही पण पूर्णपणें सुधारली आहे तर आतां आपल्याला घरीं परतायला काय हरकत आहे ? ”

सुरेन्द्रबाबूंनीं हंसून म्हटलं, “ हरकत तर कांहींच नाहीं, परंतु मी आतांच घरीं परतणार नाहीं. तुम्हा लोकांना घरची ओढ फार लागली असेल तर तुम्ही जा. ”

घर आणि कुटुंब अशा क्षुल्लक गोष्टींची ओढ मनाला लागणं आणि तीमुळं बेचैन होणं म्हणजे भ्याडपणा आहे असं समजून तो प्रस्ताव करणारे लोक गप्प बसले. सुरेन्द्रबाबूंनीं नंतर कांहींच म्हटलं नाहीं.

ठिकठिकाणीं थांबून नौका परत मार्ग आक्रमीत होती. परंतु नौकेंतील लोकांत पूर्वीसारखा आनंद आणि उत्साह दिसून येत नव्हता. सुरेन्द्रबाबू सोडून बाकीचे सगळे उदास मनानं कसा तरी वेळ घालवूं लागले ! पण असं तरी किती दिवस चालायचं ? घर कुटुंब सोडण्यांतच पुरुषार्थ मानणारे एक—दोघे जण तो पुरुषार्थ टाकून पुन्हां घरीं परत जाण्याची चर्चा करूं लागले. ते तरी काय करणार ? बायका—मुलांची आठवण झाल्यावर दुसरें काय सुचणार माणसाला ? एक एक दिवस एक एक युगासारखा त्यांना वाटूं लागला. तीन—चार दिवस गेल्यानंतर शेवटीं सगळ्यांनीं घरीं परत जाण्याची इच्छा प्रदर्शित केली.

सुरेन्द्रबाबूंनीं कसलीच अडकाठी घेतली नाहीं. नौका चन्दननगर मागें टाकून पुढें जाते न जाते तोंच बहुतेक सगळी मित्रमंडळी आपापल्या घरीं परत निघून गेली. कांहीं नौकर—चाकर, एक पाश्चिमेकडला बजवय्या आणि सुरेन्द्रबाबूंची आश्रित नर्तकी एवढीच काय तीं माणसं सुरेन्द्रबाबूंच्या बरोबर उरलीं. त्यांच्याच बरोबर सुरेन्द्रबाबूंनीं पुढें प्रवासाला सुरुवात केली, घरीं परत जाण्याची इच्छा त्यांच्या मनामध्यें एकदांही आली नाहीं.

एके दिवशीं संध्याकाळीं पश्चिम दिशेला ढग जमूं लागले होते. सुरेन्द्रबाबूंनीं एका नाविकाला बोलावून म्हटलं, “ हरिचरण, आकाशांत ढग जमूं लागले आहेत. पाहिलंस ? ”

“ होय सरकार. ”

“ तुला काय वाटतं ? वादळ होईल ? ”

" जेष्ठ–वैशाखांत वादळ होतंच बाबू ! "

" तर मग नौका नांगरून टाका. "

" परंतु इथें जवळपास कुठेंच गांव दिसत नाहीं. वाळूंतच नांगरूं का ?"

" मग काय बुडून मरणार आहेस का ? "

नाविक थोडसं हंसून म्हणाला, " मी आहे तोपर्यंत ती भीती नाहीं बाबू ! वादळ व्हायच्या आंतच नांगर घालून टाकीन. "

सुरेन्द्रबाबूंनीं रागावून म्हटलं, " ही बहादुरी दाखवायची आवश्यकता नाहीं. दोर फेंका. "

निरुपाय होऊन तेथें एक स्वच्छ जागा पाहून हरिचरणनं नौका बांधून टाकली.

सुरेन्द्रबाबू नौकेच्या छतावर जाऊन बसले. नोकर त्यांच्या समोर तंबाखू भरून हुक्का ठेवून गेला. बाबूंनीं तोंडांत नळी धरून एका नोकराला हांक मारून म्हटलं, " उस्तादजींना पाठवून दे. "

थोड्या वेळानं डोक्यावर एक हात उंच पगडी घालून, दाढी कानांत लपेटून आणि मिशा पिळीत पिळीत तो पश्चिम हिंदुस्तानी उस्ताद त्यांच्या समोर येऊन म्हणाला, " हुजूर.... "

दूर किनाऱ्याजवळ पाण्यांत एका काळी वस्तु दिसत होती. सुरेन्द्रबाबू तिकडेच पाहात होते. ती काळी वस्तु मनुष्याच्या डोक्यासारखी दिसत होती म्हणून त्या वस्तूकडे सुरेन्द्रबाबू लक्ष देऊन पाहात होते आणि त्यामुळेंच उस्तादजीचा आवाज त्यांना ऐकू गेला नाहीं.

उत्तर मिळत नाहीं असं पाहून उस्तादजीनं परत म्हटलं, " हुजूर ?"

सुरेन्द्रबाबूंनीं वळून पाहिलं. उस्तादजींना पाहून त्यांनीं म्हटलं, " आतां वादळ होणार नाहीं असं वाटतं उस्तादजी, तर थोडंसं गाणं–बजावणं चालूं दे."

उस्तादजीनं मान हालवून म्हटलं, " जो हुकूम. "

सुरेन्द्रबाबू पुन्हां त्याच काळया वस्तूकडे लक्ष देऊन पाहूं लागले.

थोड्या वेळानं एक तरुणी जवळच तिथे गालिच्यावर येऊन बसली. पाठोपाठ हातांत तबला घेऊन उस्तादजी येत होते. त्यांना पाहून सुरेन्द्रबाबूंनीं म्हटलं, " उस्तादजी तुम्ही खालीं जा, आज बजावणं नको. फक्त गाणंच होऊ द्या. "

उस्तादजी शुष्क हास्य करीत खालीं निघून गेले.

गालिच्यावर येऊन बसली होती त्या स्त्रीचं नांव जयावती असं होतं. तिचं वय वीस एक वर्षांचं असावं. शरिराचा बांधा खूप धष्टपुष्ट आणि रेखीव असा होता. दिसायलाहीं कांहीं ती वाईट नव्हती; पुष्कळ दिवसांपासून सुरेन्द्रबाबूंची तिच्यावर कृपा होती. काळ्या किनारीची एक देशी साडी नेसून आणि अंगावर एक–दोन ठळक दागिने घालून चांगल्या घरच्या स्त्रीसारखी ती गुपचुप बसून राहिली होती. सुरेन्द्रबाबूंनी तिच्याकडे पाहून हंसत विचारलं, " जया, आज तूं दिवसभर दिसलीच नाहींस कुठं ! "

" डोकेदुखीमुळं पडून होतें. "

" आतां बरं वाटतं ना ? "

जयावतीनं हंसून म्हटलं, " थोडसं. "

" गाणं म्हणतां येईल का ? "

जयावती पुन्हां हंसली, " आज्ञेप्रमाणं गाईन. "

" आज्ञेप्रमाणं नको. तुझ्या इच्छेप्रमाणं गा. "

जयावतीनं गाणं गायला सुरुवात केली.

सुरेन्द्रबाबू पलीकडच्या किनाऱ्याजवळ पाण्यावर तरंगणाऱ्या त्या काळ्या वस्तूकडे पाहात थोड्या अन्यमनस्कतेनच गाणं ऐकत होते. गाणं ऐकतां, ऐकतां कांहीं वेळ गेल्यावर जयावतीचं गाणं संपायच्या आतच सुरेंद्रबाबू म्हणाले, " जया, ती–ती–ती वस्तु हलते आहे ना ? "

जयावतीनं गाणं बन्द करून तिकडे लक्ष देऊन पाहात म्हटलं, " हो तसंच वाटतं. "

" मग दुर्बिणींतून पाहूं या. " आणि नंतर नोकराला हांक मारून सुरेंद्र-बाबूंनीं म्हटलं, " अरे खालून दुर्बिणीची पेटी घेऊन ये "

नौकरानं दुर्बिण आणून दिली. पुष्कळ वेळपर्यंत त्या वस्तूकडे दुर्बिणीतून पाहिल्यानंतर ती दुर्बिण परत पेटींत बन्द करून सुरेन्द्रबाबू उठून उभे राहिले.

जयावतीनं प्रश्न केला, " काय आहे तें ? "

" कोणी माणूस दिसतंय. "

" इतका वेळ पाण्यांत काय करीत आहे तं ? "

" कळत नाहीं. बघितलं पाहिजे. "

" कुणाला तरी पाठवून द्या ना ! "

" मी स्वत:च जाईन. "

आज्ञा मिळतांच एक नाविक नौकेला बांधलेली एक छोटीशी नाव घेऊन आला. त्या नाविकाकडे वळून सुरेन्द्रबाबूंनीं म्हटलं, " त्या पलिकडच्या किनाऱ्यावर चल. "

त्या आकृतीच्या जवळ नाव पोहचल्यानंतर सुरेन्द्रबाबूंनीं पाहिलं कीं, कमलाप्रमाणें एक सुंदर कोमलांगी गळाभर खोल पाण्यांत उभी आहे आणि काळ्या ढगांच्या ढिगांप्रमाणे तिचे केस निळ्या पाण्यावर चहूंकडे पसरलेले आहेत. सुरेन्द्रबाबू आणखिन् जवळ गेले तरीसुद्धां ती स्त्री तसूभरही जागची हलली नाहीं किंवा पाण्याबाहेर निघण्याची तिनें हालचालही केली नाहीं. पूर्वीप्रमाणेंच ती जागच्या जागीं निश्चल उभी होती.

सुरेन्द्रबाबूंनीं थोड्याश्या संकोचानेंच प्रश्न केला, " इथे जवळपास कुठे गांव आहे का ? "

त्या स्त्रीनं उत्तर दिलं, " मला सांगतां येत नाहीं. नसेल कदाचित्."

" तर मग तूं इथं कशी आलीस ? "

त्या स्त्रीनं उत्तर दिलें नाहीं.

" तुझं घर इथेच जवळपास आहे का ? "

" नाहीं, फार दूर आहे. "

" तर मग इथं कशी आलीस ? "

" आमची नाव बुडाली. "

" केव्हां ? "

" काल रात्रीं. "

" तुझ्या बरोबरची मंडळी कुठं आहे ? "

" माहीत नाहीं. "

" इतका वेळ तूं पाण्यांत कां उभी आहेस ? बाहेर येऊन जवळपास एखादं गावं असलं तर त्याचा शोध कां करीत नाहींस ? "

त्या स्त्रीनं उत्तर दिलं नाहीं.

उत्तर मिळत नाहीं असं पाहून सुरेन्द्रबाबूंनीं दुसरा प्रश्न केला, " तुझं घर इथून किती लांब आहे ? "

" दहा—बारा कोस. "

" कुठल्या दिशेला ? "

सुरेन्द्रबाबूंची नौका ज्या दिशेकडे चालली होती तिकडेच बोट दाखवून ती स्त्री म्हणाली, " तिकडे. "

सुरेन्द्रबाबूंनीं कांहीं क्षण विचार करून म्हटलं, " मी तिकडेच जातो आहे. आणि माझ्या नौकेंत एक स्त्री पण आहे. तुझी हरकत नसेल तर माझ्याबरोबर चल, मी तुला तुझ्या घरीं पोंहचवतों. "

त्या स्त्रीनं पुन्हां मौन धारण केलं.

कांहींच न समजल्यामुळं सुरेन्द्रबाबूंनीं पुन्हा प्रश्न केला,

" येतेस ? "

" येतें. "

" चल तर मग. "

थोडा वेळ स्तब्ध राहून ती म्हणाली, " माझ्या अंगावरचे कपडे वाहून गेले आहेत. "

ती स्त्री पाण्यांत इतका वेळ कां उभी आहे हें आतां सुरेन्द्रबाबूंच्या लक्षांत आलं ! स्वत: किनाऱ्यावर उतरून आणि नाविकाला नौकेवरून कपडे आणायला सांगून त्यांनीं त्या स्त्रीला परत प्रश्न केला, " कपडे आल्यानंतर माझ्याबरोबर येशील ना ? "

त्या स्त्रीनं मान हलवून म्हटलं, " हो. " नाविक कपडे घेऊन परत आला. थोड्याच वेळांत सुरेन्द्रबाबू त्या स्त्रीला घेऊन आपल्या नौकेवर परत आले.

त्या स्त्रीला खाऊं-पिऊं घालून आणि पान देऊन तिच्याजवळ बसत जयावतीनं विचारलं, " नांव काय तुझं ? "

" माझं नांव मालती. तुझं नांव ? "

" जयावती. तुझं घर कुठं आहे ? "

" महेशपुरांत. "

" इथून किती दूर आहे तें ? "

" दहा-बारा कोस. "

" तुझं सासर कुठं आहे ? "

" मालतीनं हंसून म्हटलं, " कुठंच नाहीं. "

" हें काय ? लग्न नाहीं झालं ? "

" झालं होतं, परंतु तें सगळं आतां खलास झालं आहे."

जयावतीला वाईट वाटून तिनं विचारलं, " किती दिवस झाले ? "

" पुष्कळ दिवस. ते सगळं मला आतां आठवतसुद्धां नाहीं. "

जयावतीनं ती चर्चा बंद करून विचारलं, " तुझ्या घरीं कोण कोण आहेत ? "

" कुणीच नाहीं. एक आत्या होती. पण ती आतां कुठं असेल कुणी सांगावं ? "

नाव बुडाल्याची हकीकत जवळ येत आहे असं पाहून जयावतीनं तोही विषय बदलून विचारलं, " तुम्ही कुठें चालला होतां ? "

मालतीनें थोडासा विचार करून उत्तर दिलं, " सागर द्वीप. "

" तुझ्याबरोबर होते त्यांचं काय झालं ? "

" माहीत नाहीं. "

" आतां घरीं जाणार ? "

" तोच तर विचार करतें आई. "

जयावतीनं थोडंसं हंसून आणि थोडंसं सूचित करावं म्हणून विचारलं, " माझ्याबरोबर येणार ? "

" घेऊन जाशील तर येईन, तुझ्या पतीनं माझ्यावर मोठा उपकार केला आहे; आणि शिवाय माझ्या घरीं कुणीच नाहीं. घरीं जाऊन कुणाजवळ राहूं ? "

बरोबर घेऊन जाण्याची गोष्ट काढल्याबद्दल जयावतीला मागाहून पश्चात्ताप होऊं लागला आणि उत्तर ऐकून तर तिच्या मनांत आलेली शंका जास्तच दृढमूल होत चालली. जयावतीच्या मनांत आलं मालतीला बरोबर घेऊन जाणं तिला सुखाचं होणार नाहीं; जर कदाचित सुरेन्द्रबाबूंची मर्जी......

मालतीनं प्रश्न केला, " तुमचं घर कुठं आहे ? "

" नारायणपूर. "

" कुठें चालला होतीं ? "

" हिंडा-फिरायला; बाबूंची प्रकृती चांगली नाहीं म्हणून..." आणखिन् दोन–चार गोष्टी झाल्यावर दोघींनाही झोप आली.

## २

रात्रीं सुरेन्द्रबाबूंना चांगलीशी झोप लागली नाहीं. त्यामुळें दुसऱ्या दिवशीं ते भल्या पहांटेच उठले–प्रातर्विधी आटोपून आणि हुक्क्याची नळी तोंडांत दाबून ते पुन्हां नौकेच्या छतावर येऊन बसले. थोडासा दिवस वर आल्यानंतर त्यांनीं जयावतीला बोलावून विचारलं, " त्या स्त्रीची कांहीं माहिती मिळाली ? "

" सगळी माहिती मिळाली. "

" तिचं घर कुठं आहे ? "

" महेशपुरांत. "

" महेशपूर कुठेसं आहे ? "

" तें मला माहीत नाहीं. इथून दहा बारा कोसावर उत्तरेकडे. "

" बापाचं नांव काय तिच्या ? "

" विचारलं नाहीं. "

" सुरेन्द्रबाबूंनीं हंसून म्हटलं, " मग काय माहिती मिळाली तुला ? पतीचं नांव काय ? "

" पती जिवंत नाहीं. "

" सासर कुठं आहे ? "

" सांगितलं नाहीं. "

सुरेन्द्रबाबूंनीं नंतर थोडा वेळ विचार करून म्हटलं, " खरं काय आहे ह्याचा कांहीं अंदाज लागतो का ? "

" नाहीं. "

" आपलं नांव सांगितलं तिनं. "

" हो. "

" काय नांव तिचं ? "

" मालती. "

" मालतीची कांहीं हरकत नसेल तर तिला माझ्या खोलींत पाठवून दे. मी स्वतः तिला सगळ्या गोष्टी विचारून घेतों."

कांहीं वेळ गेल्यानंतर एका नौकरानं येऊन म्हटलं, " खोलींत चला. "

सुरेन्द्रबाबू लगेच खोलींत येऊन दाखल झाले. गालिच्यावर मालती खालीं मान घालून बसली होती. जयावती जवळच उभी होती. सुरेन्द्रबाबू येतांच ती बाहेर निघून गेली. आपण इथं राहिलों तर मनमोकळेपणानं बोलायला दोघांना अवघड वाटेल आणि सगळ्या गोष्टींचा उलगडा होणार नाहीं हें जाणूनच ती बाहेर गेली होती, परंतु कशाच्या तरी आड लपून उभी होती. सगळ्या गोष्टी ऐकायची तिची इच्छा होती.

सुरेन्द्रबाबू आंत येऊन एका कोचावर स्थानपन्न झाले. कोचावर विराजमान झाल्यानंतर बराच वेळ ते मालतीकडे टक लावून पाहात होते. मालतीच्या चेहरा उदास, उतरलेला परंतु अतिशय मनोहर दिसत होता. तिचा रंग गोरा आणि शरिराच्या अंग-प्रत्यंगाची घडण मोठी सुंदर होती. एवढं रूप एकाच ठिकाणीं एकत्रित झालेलं आपण पूर्वीं कधींही पाहिलं नाहीं असंच सुरेन्द्र-बाबूंना वाटलं. मालती विधवा होती! तिची जात कोणती असावी? सुरेन्द्र बाबूंनीं तोंड उघडून विचारलं, " तुझ्या बापाचं नांव काय ? "

मालतीनं उत्तर दिलं, " श्री हारानचंद्र मुखोपाध्याय. "

" ते सध्यां घरींच आहेत ? "

मालतीनं विचार करून उत्तर दिलं, " नाहीं, ते आतां नाहींत."

सुरेन्द्रबाबूंना वाटलं कीं, तिचा बाप जिवंत नाहीं.

त्यांनीं नंतर विचारलं, " घरीं आणखिन् कोण कोण आहेत ? "

ह्या वेळेस बराच वेळपर्यंत मालती मान धरून होती, त्यानंतर हलुहलु म्हणाली, " कुणीच नाहीं. "

" इतके दिवस कुठें होतीस ? "

" तिथंच होतें, परंतु आम्ही सागरद्वीपला जात होतों, वाटेंत नाव बुडाली. "

" तुझं सासर कुठं आहे ? "

" कालीपाडा. "

" तिथं तुझं कोण आहे ?"

" असतील कुणीतरी, परंतु त्यांना कुणाला मी आतां ओळखणार नाहीं.

" तिथं कधींच गेली नाहींस तूं ? "

" फक्त एकदांच लग्नाच्या वेळीं गेलें होतें "

बराच वेळ विचार करून सुरेन्द्रबाबूंनीं म्हटलं, " तुझं माहेरीं कुणी नाहीं आणि सासरींही पण कुणी नाहीं—असतील तर तूं ओळखत नाहींस— तर मग तूं जाणार कुठें ? "

" कलकत्त्याला. "

"कलकत्त्याला ? तिथं कोण आहे ?"

"कुणीच नाहीं."

"कुणीच नाहीं ? मग राहणार कुठं ?"

"कुणाच्याही घरीं आश्रय घेईन."

"नंतर ?"

मालती गप्प बसून राहिली.

पुन्हा सुरेन्द्रबाबूंनींच बोलायला सुरुवात करून विचारलं,

"स्वयंपाक करतां येतो ?"

"हो येतो."

"कलकत्त्यांत कुठं स्वयंपाकाचं काम मिळालं तर करशील ?"

"हो."

सुरेन्द्रबाबूंनीं कांहीं वेळ स्तब्ध राहून विचारलं, "मालती, कलकत्त्या. शिवाय दुसरीकडे कुठंतरी तुला तेंच काम मिळालं तर करशील ?"

मालतीनं मान हालवून म्हटलं, "नाहीं."

हें उत्तर ऐकून सुरेन्द्रबाबू थोडसे निराश झाल्यासारखे दिसले.

परत थोडासा विचार करून त्यांनीं विचारलं,

"कलकत्त्यांत तुला जेवढे म्हणून पैसे मिळण्याची आशा आहे त्यापेक्षां दुप्पट चौपट मिळाले तरी दुसऱ्या ठिकाणीं काम नाहीं करणार ?"

मालतीनं पूर्वीप्रमाणेंच मान हालवून म्हटलें, "नाहीं."

"कलकत्त्याशिवाय मी दुसरीकडं कुठंच जाणार नाहीं."

सुरेन्द्रबाबूंनीं एक दीर्घ निश्वास सोडला. त्यांचा उतरलेला चेहरा पाहून त्यांना आपलं उत्तर आवडलं नाहीं आणि कदाचित् त्यांच्या मनाला थोडा त्रास झाला असावा ह्याचा अंदाज बांधायला मालतीला वेळ लागला नाहीं.

सुरेन्द्रबाबूंनीं दुसरीकडं पाहात म्हटलं, "ज्या लोकांना कलकत्त्याचा परिचय नाहीं त्या लोकांना कलकत्ता हें शहर फार वाईट आहे. तुझी इच्छा असेल त्याचप्रमाणें कर, परंतु सावध राहून ! हं, आणखिन् एक गोष्ट आहे. माझं नांव सुरेन्द्रनाथ चौधरी आणि नारायणपूर माझं गांव—कधीं मधीं माझी जरूर

भासली तर मला कळवायला संकोच करूं नकोस किंवा माझ्या घरीं यायला लाजूंही नकोस. एखादं संकट आलंच तर कदाचित् मी तुझ्या उपयोगी पडूं शकेन."

मालती खालीं मान घालून स्वस्थ बसून राहिली. "आम्ही एका आठवड्यानें कलकत्त्याकडे जाऊं, तोंपर्यंत इथं या नौकेवरच राहा. आम्ही कलकत्त्याला पोहचलों, म्हणजे तुझ्या इच्छेप्रमाणें तूं कलकत्त्यांत उतरून जा."

सुरेन्द्रबाबू गेल्यानंतर आपल्या स्थानीं परत येऊन मालती रडूं लागली. सुरेन्द्रबाबूंच्या शब्दांनीं तिला वाईट वाटलं होतं; परंतु तिला रडूं यायला आणखिनही दुसरीं पुष्कळच कारणें होतीं. सुरेन्द्रबाबूंनीं तिची लाज राखली, त्या नौकेंत तिला आश्रय देऊन तिच्यावर उपकार केला आणि पुन्हा उपकार करण्याची भाषा बोलताहेत; परंतु काय ती फक्त स्वयंपाकीण बाईचंच काम करायला कलकत्त्याला निघाली होती ? स्नेहमयी आई, आजारी भाऊ, आणि सगळा परिवार सोडून, ती काय फक्त स्वयंपाक करून आपलं पोट जाळायला निघाली होती ? स्वयंपाकाचं काम नुसतं कारणादाखल होतं परंतु वास्तविक पाहतां तिला पैसे कमवायचे होते आणि पैसे कलकत्त्याशिवाय दुसरीकडे कुठे मिळणार ? पैसे मिळविण्याचा मार्ग ही पण तिला दिसत होता. ती सुन्दर, होती, तिच्या शरीरांतून रूप, तारुण्य आणि लावण्य ओसंडून वाहत आहेत ह्याची तिला जाणीव होती आणि ह्याचाच ती उपयोग करून घेणार होती. कलकत्ता मोठं शहर आहे; तिथं ह्या रूपाला बाजार मिळणार नाहीं अशी तिला चिंता नव्हती; कदाचित तिच्या अपेक्षापेक्षांही जास्त तिच्या सौंदर्याची तिला किंमत मिळून गेली असती. ह्या सगळ्यां विचारांमुळेंच कलकत्त्याला जायचा तिचा निश्चय पक्का झाला होता. तिथं तिला भाव येईल; ती गरीब होती ती श्रीमंत होऊन जाईल—कष्टांनं आतापर्यंत तिचं जीवन गेलं होतं पण ह्यापुढं तें सुखांत जाईल,—तरी मग ती कां रडत होती हें समजायला कांहीं मार्ग नाहीं; तिचं तीच जाणे !

दुसऱ्या दिवशीं नौका हलुदपूर गांवावरून जाऊं लागली. मालती पडदा बाजूला सारून त्या गांवच्या पक्क्या घाटांकडे टक लावून पाहूं लागली. घाटावर

कुणी दिसल का म्हणून ती पाहात होती, परतु तिची आशा पूर्ण झाली नाहीं. गांव सोडून नौका दूर निघून गेली. मालतीला रडूं कोसळलं. ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. मालतीला रडताना पाहून जयावती तिच्याजवळ येऊन बसली आणि तिचे अश्रू पुसून स्नेहपूर्वक म्हणाली, “रडून आतां काय होणार आहे बरं? त्यांची वेळ आली होती म्हणूनच गंगामैय्यानं त्यांना आपल्या पोटांत घेतलं. कां उगीच दुःख करतेस?” नांव बुडून जीं माणसं गेलीं त्यांची आठवण होऊन मालती रडते आहे असं जयावतीला वाटलं. जयावती मालतीपेक्षां वयानं मोठी होती. ती मालतीवर प्रेम करीत होती, तिला आपल्या धाकट्या बहिणीप्रमाणे मानीत होती आणि विशेषेंकरून ज्यावेळीं तिला समजलं कीं मालती कलकत्त्यालाच उतरणार आहे त्या वेळेपासून तर तिचं मालतीवरचं प्रेम दुपटीनं वाढलं होतं.

## ३

काशींत मृत्यु आला तर शिवलोकाची प्राप्ती होते अशा हिन्दूंच्या विश्वासामुळं सदानंदाची आत्या काशीला जी एकदां गेली ती परत आलीच नाहीं. हिन्दु धर्मावरील आपली श्रद्धा अढळ होती हें तिनं आपल्याच उदाहरणावरून पटवून दिलं. भाग्यवती आत्याला भागिरथी नदीच्या पवित्र तीरावर अग्नि देऊन आणि चिरकालपर्यंत तिचा शिवलोकीं वास होईल अशी व्यवस्था करून सदानंद हलुदपुरला परत आला होता.

भयाण घरांत परत येऊन सदानंदानें स्वतःच स्वयंपाक केला. त्याचं खाणं पिणं संपलं त्यावेळीं बरीच रात्र उलटून गेली होती. आत्तांच शुभद्राच्या घरीं जाऊन तिथली. मंडळी कशी आहे हें पाहण्याचं त्याच्या मनांत आलं होतं, पण एवढ्या अपरात्रीं त्यांची भेट होईल कीं नाहीं हा विचार मनांत येऊन तो बिछान्यावर पडला. काशींत राहात असतांना हारानबाबूंच्या दुश्चरित्रांविषयीं, शुभद्राच्या दुर्भाग्याविषयीं आणि ललनाच्या दुःखी जीवनाविषयीं तो नेहमी विचार करीत असे. आजारी आतेची सेवाशुश्रुषा करीत असतांनाही तो ह्या माणसांना विसरला नव्हता. मध्यें एकदां त्यानं पत्र लिहून ह्यांची वास्तपुस्त केली होती आणि ह्या माणसांनीं पण त्याला खुशालीचं उत्तर पाठविलं होतं, परन्तु त्यानंतर त्यानंही लिहिलं नव्हतं आणि ह्यांनीही पण त्याला कांहींच कळवलं नव्हतं, म्हणून जवळ जवळ एक महिना झाला या कुटुंबाचा कसलाच समाचार त्याला कळाला नव्हता. घरीं परत आल्यानंतर तो ह्याच सगळ्या गोष्टींचा विचार करीत होता. रात्रीं पुष्कळ वेळपर्यंत जागून, घरच्या छताकडे शून्य दृष्टीनें पाहात तो विचार करीत होता— दगांत कमळाचं फूल फुलतं का नाहीं ? जिथं चिखल नाहीं, माती नाहीं तिथं कमळाचं फूल उगवत नसतं अस ललनेनं म्हटलं होतं तें बरोबर आहे कां ? बरं, जिनं ही गोष्ट सांगितली होती तिला ह्याचं ज्ञान कसं झालं ? पुष्कळ वेळानंतर भवति न भवति करून त्यानं ठरविलं कीं दगांत कमळाचं फूल फुलतं; हां तिथं फार काळ तें टिकत नसेल ती गोष्ट वेगळी, लवकरही सुकून जात असेल, नाहीं निश्चयानं सुकून जातं, परंतु दगांत कमळाचं फूल फुलतं एवढं मात्र निश्चित.

दुसऱ्या दिवशीं हातांत फूल बिल्वपत्र व विश्वनाथाचा प्रसाद घेऊन श्रीमान सदानंदानं चक्रवर्तिनी शुभद्राच्या अंगणांत प्रवेश केला.

अंगणांत शुभद्रा झाडींत असलेली त्याला दिसली. व सदानंदाला आलेला पाहतांच शुभद्राने हातांतली केरसुणी टाकीत आणि डोक्यावरला पदर पुढें ओढींत मधुर आवाजांत विचारलें, ‘ केव्हां आलांस सदानंद ? ’

‘ काल रात्रीं. ’

'सगळीं खुशाल आहेत ना?'

सदानंद दुःखी होऊन म्हणाला; 'सगळीं कोण? आत्याच ना? तिला काशींतच स्थान मिळालं.'

शुभदाला नीट बोध झाला नाहीं. तिनं विचारलं. 'काय मिळालं?'

'आत्यानं काशींतच देह ठेवला.'

शुभदाला हीं गोष्ट माहीत नव्हती. तिचं स्वतःचं दुःख होतंच त्यांत आणखी भर पडली. तिला एकदम भडभडून आलं.

बऱ्याच वेळानें ती म्हणाली. 'सदानंद ललना पण नाहींशी झाली.'

सदानंदानं चकित होऊन विचारलं. 'नाहींशी झाली? कुठं गेली?'

शुभदानं रडत रडत सांगितलं, 'जाईल कुठं? माझ्या लाडकीनं जगांतील संकटांमुळं जीवाला कंटाळून आत्महत्या केली. पांच दिवस झाले तिची साडी गंगाकिनारीं पडली होती तेवढी मिळाली.' शुभदा एवढं बोलून ओकसाबोकशी रडूं लागली.

सदानंदाच्या डोळ्यांतही अश्रू उभे राहिले, परंतु एक का दोनच! त्याना आपल्या हातांनी पुसून शुभदा शांत होईपर्यंत तो स्वस्थ राहिला. शुभदा शांत झाल्यावर त्यानं विचारलं, 'जातांना ती कांहींच बोलली नाहीं का?'

'नाहीं.'

'हारानकाका कुठें आहेत?'

शुभदानें डोळे पुसून म्हटलें, 'माहीत नाहीं. पण कधीं तरी घरीं येतात.'

'आतांशा ते करतात तरी काय?'

'तेंही माहीत नाहीं'

'माधव कसा आहे?'

'आहे तसाच आहे.'

'बाकीची सगळीं?'

'खुशाल आहेत.'

सदानंद उठूं लागला; त्याला उठतांना पाहून शुभदा म्हणाली, 'घरीं स्वयंपाक कोण करतं आतां?'

'मी स्वतःच'

शुभद्रा थोडा वेळ विचार करून म्हणाली, 'मग इथें जेवायला ये'

'काय हरकत आहे यायला ? पण त्याची जरूरी तरी काय आहे ? स्वयंपाक करतांना मला कष्ट होणार नाहींत.'

'म्हणून काय झालं ? तू इथंच जेवत जा'

सदानंदानं विचार करून उत्तर दिलं, 'आज नको; आत्याचं श्राद्ध आहे आज.'

शुभद्रानं विचार केला—कदाचित् असेलही. म्हणून पुढें ती कांहींच बोलली नाहीं.

घरीं जाऊन सदानंद जमिनीवरच स्वस्थ पडून राहिला. त्यावेळीं सकाळचे आठ वाजले होते. ज्यावेळीं तो उठला त्यावेळीं रात्रीचे आठ वाजून गेले होते आणि बाहेर स्वच्छ चांदणं पडलं होतं. बाहेर येऊन आणि एक बगीचा ओलांडून, सदानंद शारदाचरणच्या घरच्या मागच्या खिडकीजवळ येऊन बराच वेळ उभा राहिला. त्या खिडकीकडे पाहात पाहात त्यानें हांक मारली, 'शारदा !'

शारदाचरण घरींच होता, सदानंदाची हाक ऐकू येतांच तो खिडकी जवळ येऊन म्हणाला, 'कोण ?'

सदानंद म्हणाला, 'मी'

'कोण—सदानंद ?'

'हो.'

'केव्हां आलास ?'

'काल रात्रीं.'

'इथें उभा का ? चल, बैठकींत जाऊन बस.'

'नाहीं, इथंच ठीक आहे. तूंच ये इथं'

शारदाचरण जवळ येतांच सदानंद म्हणाला, 'ललनेचा अंत झाला—माहीत आहे तुला ?'

शारदाचरणनं उदास होऊन म्हटलं, 'माहीत आहे.'

" तिनं आत्महत्त्या का केली कांहीं माहीत आहे तुला ? "

" नाहीं, त्रासाला आणि कष्टाला कंटाळून तिनं आत्महत्त्या केली असावी असं वाटतं. "

सदानंदानें त्याच्यावर तीक्ष्ण दृष्टि रोखून विचारलं,

" आणखिन् कांहीं ठाऊक आहे ? "

" नाहीं. "

सदानंदानं आपली पूर्वीची तीक्ष्ण दृष्टी अधिकच तीक्ष्ण करून म्हटलं, " तूं ढोंगी आहेस ! पैसा नसल्यामुळें संकटांना आणि कष्टांना कंटाळून एक व्यक्ती तुझ्या डोळ्यासमोर, आत्महत्त्या करते आणि तूं मात्र हात जोडून स्वस्थ. बरं दिसतं का हें ?

सदानंदाचे हावभाव पाहून शारदाचरण चमकला.

शारदाचरणला चमकायला कारणही तसंच होतं. सदानंद आणि शारदाचरण लंगोटियार होते, दोघेही एकामेकाला लहानपणापासून ओळखत होते, त्यामुळें शारदाच्या सगळ्या गोष्टी सदानंदाला माहीत होत्या; म्हणून सदानंद आज त्याची छी: थू करायला गेला होता असे मात्र नाहीं, कारण तसा त्याचा स्वभाव नव्हता; पण शारदानें मात्र आपला समज बरोबर तसाच करून घेतला. मागच्या गोष्टींची आठवण करून देऊन सदानंद आपली छी: थू करायला आला आहे असंच शारदला वाटलं; आणि म्हणूनच पुष्कळ वेळ विचार केल्यानंतर शारदानं म्हटलं, " सदानंद झाल्या गेल्या गोष्टीचा विचार करून आतां काय फायदा ! तूं विचार कर जों पर्यंत माझे बाबा जिवंत आहेत तोंपर्यंत कुणालाहि मला मदत करतां येत नाहीं. तिनं तरी मला कुठं सांगितलं होतं. "

सदानंदानं आश्चर्यचकित होऊन विचारलं, " कांहींच सांगितलं नव्हतं ? ती तुझ्याकडे आलीच नव्हती का ?

" अलीकडे नव्हती आली, हां बऱ्याच दिवसापूर्वी एकदां आली होती खरी. "

" कशासाठीं ? कुठें ? "

शारदाचरणनं उत्तर दिलं, " सांगतो जवळ जवळ एक महिन्यापूर्वी एका अपरात्रीं तिनं मला शिवालयांत बोलावलं होतं. माझी जायची इच्छा नसतांना मी गेलो तिथं......"

सदानंदानें गहिंवरून विचारलं, " तुझी जायची इच्छा नव्हती ?"

शारदानें निस्तेज झालेल्या चेहऱ्यानें म्हटलं, " काय म्हणून जायची इच्छा व्हावी ! "

सदानंदानं त्याचं उत्तर न ऐकतांच म्हटलं, " बरं पुढें ? "

" ती लग्न करायला सांगत होती. "

" कुणाशीं ? "

" आपल्याशींच "

" आपल्याशींच ? ललनेनं स्वतःशी लग्न करायला सांगितलं ? बरं मग तूं काय उत्तर दिलेस ?"

शारदाला बालपणाच्या गोष्टीं आठवून लाज वाटली. त्यान अडखळतच उत्तर दिलं, " " मी.........मी......मला कसं लग्न करतां आलं असतं तिच्याशीं ? बाबा अजून हयात आहेत......"

मनांतील क्षोभ, व दुःख आवरूं न शकल्यामुळं सदानंद म्हटलं, " तुझे बाबा जिवंत असून काय फायदा ?"

शारदालाही पण राग आला. वडिलांच्या बाबतींत कसलाहि वाईट शब्द ऐकून घ्यायला तो तयार नसे. त्याने रागावूनच म्हटलं, " नुकसानीची गोष्ट कोणती आणि फायद्याची गोष्ट कोणती तें त्यानाच माहीत. याबाबतींत विचार करण्याचा अधिकार आम्हाला पोहचत नाहीं आणि शोभतही नाहीं. अच्छा, झालं ते झालं, मला तुझ्याशीं लग्न करतां येत नाहीं; असं मी तिला सांगितलं होतं. "

" आणि नंतर मग ती निघून गेली ?"

" नाहीं, एवढ्यावरच ती थांबली नाहीं; मला तिनं ललनेशी विवाह करायला सांगितलं "

" मग तूं तयार झाला नाहींस ? "

सदानंदाच्या चेहऱ्याकडं पाहून आणि त्याच्या मनांत काय चाललं आहे त्याचं अनुमान करून शारदानं हंसून म्हटलं,

" तयार झालो नाहीं असंही नाहीं; बाबा तयार झाले तर माझी कसलीच आडकाठीं नाहीं हें मी तिला सांगितलं. "

" बाबा तयार होत का ? "

" नाहीं "

" कां ? "

" सांगायची इच्छा नव्हती पण सांगतो ऐक. माझ्या लग्नांत पुष्कळसा हुंडा मिळावा अशी बाबांची इच्छा आहे. हारनबाबू हुंडा कोठून देणार ? "

सदानंदानं ऐकूनही न ऐकल्यासारखं करून म्हटलं, " तुमच्या वडिलांची किती हुंडा मिळावा अशी इच्छा आहे ? "

" ते मी कसं सांगूं ? "

" त्यांना जेवढा म्हणून हुंडा पाहिजे असेल तेवढा मिळाला तर आणखिन् दुसरी कांहीं आडकाठीं नाहीं ना ? "

" कदाचित् नसेल. "

" तुझी कांहीं हरकत आहे का ? "

" मुळींच नाहीं. "

" तर मग पाहतां येईल " असं म्हणून सदानंद आल्या वाटेनं परत जाऊं लागला. शारदानं त्याला जातांना पाहून म्हटलं, " कुठं चाललास ? आणखिन् थोडा वेळ बसून नाहीं का जाणार ? "

" नाहीं. "

" सदानंद माझ्याकडे कुठलाच दोष नाहीं. "

" कदाचित् नसेलही—देवाला सगळं माहीत आहे—मला कांहीं सांगतां येत नाहीं. "

" रागावलास ? "

" नाहीं. "

घरीं परत आल्यानंतर सदानंद ह्या खोलींतून त्या खोलींत आणि त्या खोलींतून ह्या खोलींत असा कितीतरी वेळ सारखा येरझारा घालीत होता. त्यानंतर पुन्हा घराबाहेर पडून तो गंगेकडे चालला. भागिरथीच्या लाटा पक्क्या घाटाच्या पायऱ्यावर छम्छम्–झम्झम् करीत आणि आघात–प्रत्याघात करीत परत जात होत्या. सदानंद कितीतरी वेळ त्या लाटांच्या खेळाकडे टक लावून पाहात उभा राहिला. दूरवर एक नौका धप्धप् करीत आणि वल्ह मारीत गंगेच्या प्रशान्त वक्षस्थलावरनं वाहात चालली होती. सदानंद अन्य मनस्कतेनें थोडा वेळ त्या नौकेकडेही पाहात उभा होता आणि नंतर घाटाच्या शेवटच्या पायरीवर येऊन पाण्यांत पाय सोडून, आपल्याच लहरींत गात बसला.

# ४

त्याच दिवशीं रात्रीं शीतल आणि धवल चंद्रिकेनें नहालेल्या गंगेच्या प्रशान्त वक्षस्थलावरनं प्रवास करीत सुरेन्द्रबाबूंची नौका हळूहळू उत्तरेहून दक्षिणेकडं चालली होती.

नौकेच्या छतावर सुरेन्द्रबाबू आणि जयावती बोलत बसलीं होतीं. खालीं खोलींत खिडकी उघडून चम्चम् चमकणाऱ्या गंगेच्या लाटा मोजीत आणि आपले अश्रू पुशीत मालती बसली होती. हलुदपूर गांव जवळ येत चाललं हें मालतीच्या लक्षांत आलं. नौका आणाखिन् कांहीं अंतर पुढें गेल्यानंतर गंगेच्या किनारीं असलेला पिंपळाचा वृक्ष दिसूं लागला. गंगेच्या किनारीं चम्चम् चमकणारा तो पक्का घाटही मालतीनं पाहिला. त्या घाटाच्या आणि वृक्षाच्या पाठी

मागें हलुदपूर शांतपणं झोपी गेलं होतं. त्या गांवांत त्या वेळीं झोपीं गेलेल्या प्रत्येक स्त्री-पुरुषाचा चेहरा मालती आपल्या मनश्चक्षूंच्या साहाय्यानं पाहूं लागली. तोच तो घाट. तिथं मालती ललना या नांवानं वावरत होती आणि नेहमीं त्या घाटावर स्नानासाठीं, कपडे धुण्यासाठीं येत होती! त्या घाटावरून कळशी भरून घरीं पाणी नेलं नाहीं तर स्वयंपाक होत नसे. ती आतां मालती होती, ललना नव्हती, तरी तिला ललनेची आठवण होती. इतकंच नव्हे तर शुभद्रा, माधव, हारान् मुकर्जी हीं सगळीं तिचीं मायेचीं माणसं—त्यांचा विसर तिला कसा पडणार? म्हणूनच ती विचार करीत होती. आणि अश्रू गाळीत होती. ती वेड्या सदानंदाला सुद्धां विसरली नव्हती. मालतीच्या स्मृतीपटलांवर एकेक चेहरे येऊन जात होते—छलना, बिन्दू, कृष्णाआत्या, गिरिजा, शैलवती रमा ह्या सगळ्यांच्या चेहऱ्यापेक्षा वेड्या सदानंदाच्या चेहऱ्यानेंच तिच्या स्मृति-पटलावरचा अर्धा भाग व्यापून टाकला होता. आणि त्याचंच गाणं सारखं तिच्या कानाला ऐकूं येत होतं. वेड्या सदानंदाचा करुण मधुर स्वर अभावित-पणें कुठून तरी येऊन आपल्या कानांत घुमतो आहे असं मालतीला वाटलं. मालती विस्मयानं स्तब्ध होऊन ऐकूं लागली. अरे, सदानंदासारखाच कोण गात आहे? नौका आणखिन् थोडीशी पुढं सरकली तेव्हां घाटावर पाण्यांत पाय घालून कुणी तरी बसलं आहे हें मालतीला दिसलं. परंतु गाण्याचा आवाज ऐकूं येत नव्हता; गाणं बन्द झालं होतं. तें कोण आहे हें जरी मालतीला नीट दिसलं नाहीं, तरी तो सदानंदच असला पाहिजे अशी मालतीची खात्री झाली. कारण, वेड्या सदानंदाशिवाय अशा अपरात्रीं गंगेच्या घाटावर कोण गात बसणार? तो सदानंदच असला पाहिजे ह्याबद्दल तिला संशय उरला नाहीं. सदानंदाच्या त्या अस्पष्ट दिसणाऱ्या आकृतीकडं पाहतांच मालतीला ललनेची आठवण झाली. आणि ललनेची आठवण होतांच शुभद्रा, माधव, छलना, दुर्दैवी हारानबाबू आणि रासमणिआत्या ह्या सगळ्यांची तिला आठवण झाली. माल-तीला भडभडून आलं. शेवटीं रडत रडतच ती झोंपी गेली.

दुसऱ्या दिवशीं पहाटे लवकरच मालती जागी झाली होती, तरी पण दिवस चांगला वर आला तरी ती अंथरुणावरनं उठली नव्हती. तिचं डोकं जड

झालं होतं, आणि अंग ठणकत होतं. दासीनं येऊन तिच्या अंगावर हात ठेवीत म्हटलं, ‘अरे, तुम्हाला तर ताप आला आहे.’ मालतीनं कांहींच उत्तर दिलं नाहीं. ती स्वस्थच पडून राहिली. जयावतीनं येऊन तिच्या अंगाला हात लावून पाहिला. खिडकी उघडी पाहून सौम्य रीतीनं मालतीला दटावीत जयावती म्हणाली, ‘छेः अशा तऱ्हेनं खिडकींत डोकं ठेऊन कुणी झोंपीं जातं का? रात्रभर डोक्याला पूर्वेकडली हवा लागल्यामुळं, डोकं जड होऊन अंग गरम झालं आहे.’

मालतीनं कोमल स्वरांत म्हटलं, ‘झोपेनं डोळे जड झाले होते, त्यामुळं खिडकी बंद करतां आली नाहीं.’

मालतीला ताप आल्याचं ऐकून सुरेंद्रबाबू तिला स्वतः पाहायला आले. खरोखरीच मालतीला ताप आला होता. सुरेंद्रबाबूंच्याजवळ होमिओपेथिक औषधांची पेटी होती; त्या पेटींतून औषध काढून त्यांनीं मालतीला दिलं आणि जयावतीला मालतीची काळजीपूर्वक शुश्रुषा करायला बजावून ते बाहेर गेले.

जयावती मालतीजवळ येऊन बसली. खोलीच्या खिडक्या सगळ्या बंद केल्या होत्या, त्यामुळें मालतीला बाहेरचं कांहीं दिसत नव्हतं, इतकंच नव्हे तर नौका उभी आहे का पूर्वीप्रमाणें पाणी कापत चालली आहे हेंहि तिला कळत नव्हतं.

खोलींत जयावतीशिवाय दुसरं कुणी नाहीं असं पाहून मालती म्हणाली, ‘आक्का’—मालतीनं आताशा जयावतीला आक्का म्हणून हांक मारायला सुरवात केली होती—‘आम्ही किती दूर आलों आहोत हें सांगतां येईल का?’

जयावतीनं उत्तर दिलं, ‘आठ—दहा कोस तरी दूर आलों आहो.’

मालतीला हें उत्तर नको होतं; तिनं पुन्हां विचारलं, ‘कलकत्ता अजून किती दूर आहे?’

‘जवळ जवळ दोन दिवसांचा रस्ता आहे अजून.’

मालती गप्प बसली आणि विचार करूं लागली. कांहीं क्षणानंतर ती म्हणाली, ‘आक्का तोंपर्यंत मला बरं वाटलं नाहीं तर?’

जयावतीच्या लक्षांत मालतीच्या म्हणण्याचा आशय आला; अशा वेळीं स्त्रियांच्या मनांत अढी उत्पन्न होत नाहीं. ती हंसून म्हणाली, 'तर मग आम्ही तुला पाण्यांत फेकून देऊं.'

मालतीही हंसली, पण तिच्या हास्यामध्यें आणि जयावतीच्या हास्यामध्यें फरक होता. मालती हंसून म्हणाली, 'पाण्यांत फेकून दिलं तर खरंच चांगलं होईल आक्का.'

जयावती मालतीच्या शब्दांनं चमकली. तिच्या म्हणण्याचा आणखिन् दुसराही अर्थ होऊ शकतो हे तिच्या लक्षांत आलं नव्हतं, त्यामुळं तिनं म्हंटलं छे असं आपण बोलू नये.

मालती गप्प बसली, पुन्हां तिनं उत्तर दिलं नाहीं. ती स्वस्थ राहून विचार करीत होती. जयावंतीचं म्हणणं खरं झालं तर काय होईल ? चांगलं होईल ? नाहीं, तिची मरायची इच्छा नव्हती. तिला जर खरं खरं विचारलं असतं तर तिनं सांगितलं असतं, मरणापेक्षां जरी मला जास्त त्रास होत आहे तरी सुद्धां आपली मरायची इच्छा नाहीं. मृत्यूला ती घाबरत होती असं नव्हे तर तिला जिवंत राहायचं होतं. तिच्या पेक्षां कमी दुःखातल्या माणसानं मरायचीच इच्छा केली असती. मृत्युच्या कल्पनेनं मालतीच्या डोळ्यांतून दोन आसवं खालीं पडलीं.

जयावतीनं स्नेहपूर्वक तिची आसवं पुसून म्हटलं, 'काळजी कां करतेस मालती ? पूर्व दिशेची हवा शरीराला झोंबल्यामुळं तुझ्या अंगांत थोडासा ताप आलीं आहे, त्याची एवढी काळजी करण्याचं काय कारण ? नंतर थोडा वेळ थांबून विचार करून म्हणाली, 'आणि समज कांहीं तसं झालंच तर कलकत्ता जवळच आहे; तिथं गेल्यावर डॉक्टर–वैद्याना काय कमी ?'

कुठल्याच गोष्टीची कमतरता नव्हती आणि जरुरतही नव्हती. नौका कलकत्त्याला पोंहचली त्या दिवशींच मालतीचा ताप उतरला. परंतु तिला अजून अशक्तता फार वाटत होती. त्यामुळं ती कांहीं खात-पित नव्हती. खलाशांनी कलकत्त्याहून थोडंस लांब एका बाजूला सुरेन्द्रबाबूंची नौका नांगरली. खिडकी उघडून नदींतली मोठमोठी जहाजं, आगबोटी आणि कलकत्ता नागरींतील उंच

इमल्यांची शिखरं मालती पाहूं लागली. मालतीला कलकत्त्याचं ते स्वरूप पाहून भीती वाटू लागली. कलकत्ता शहर ते हेंच का असा ती मनाशी विचार करूं लागली. कलकत्त्याचं स्वरूप जर असंच असेल तर मग एवढ्या गोंधळांत आणि आरडाओरडींत तिचा आवाज कुणाला ऐकूं जाईल ? अशा बकाली आणि कामाधंद्यानीं गजबजलेल्या अशा शहरांत तिच्याकडे दृष्टीपात करायला कुणाला फुरसत मिळणार ? पण आतां दुसरं ती काय करणार होती ? कलकत्ता शहरांत जाणं हे तिला भागच होतं. ज्या कार्यासाठीं तिन एवढं मोठ साहस केलं, ज्या माणसांच्या चेहऱ्यांची आठवण घेऊन आज ती नरकांत जायला तयार झाली होती, इतकेंच नव्हें तर इहलोक आणि परलोक कशाचाच तिनं विचार केला नाहीं, त्या कार्यासाठीं तरी तिला कलकत्त्यांत प्रवेश करणं भाग होतं. आज नाहीं तर उद्यां केव्हां तरी तिला हा आश्रय सोडावा लागणारच होता, मग भिऊन काय उपयोग ?

मालतीनं कलकत्ता शहरांत पाऊल टाकायचा निश्चय कायम केला, परंतु अजून तीन चार दिवस नौका कलकत्त्यांतून हालवूं नये असा सुरेन्द्रबाबूंनीं हुकूम सोडला आणि त्याबरोबरच मालतीनंही तीन चार दिवस नौकेवरच रहाव असं तिला कळवलं. त्यामुळं मालतीस आणखिन् तीन चार दिवस तरी नौकेवर मुक्काम करणं भाग पडलं. मालतीनं सुरेन्द्रबाबूंनीं केलेल्या ह्या व्यवस्थेसाठीं त्यांचे मनांतल्या मनांत शंभरदा आभार मानले. अशीच कांहींतरी व्यवस्था होऊन नौका सोडण्याचा दिवस लांबणीवर पडावा अशी तिची इच्छा होती, कारण कुठंही जाणं कितीही जरूर असलं तरी हातांतला आधार सोडून निराधार स्थितींत जायला मन सहसा तयार होत नाहीं. तसंच मालतीच्या मनाचीहि अवस्था तशीच झाली होती. पहिल्यांदा ह्याच गोष्टींवर ती मनांत संकल्प–विकल्प लढवीत होती, परंतु सुरेन्द्रबाबूंनीं जेव्हां तिला आपण होऊनच आणखी तीनचार दिवस अधिक रहायला सांगितलं तेव्हां तिनं सुटकेचा एक दीर्घ निश्वास सोडला.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं जयावती कलकत्त्यांत सहल करायला जाणार होती. ठरलेल्या वेळीं दुसऱ्या दिवशीं दुपारीं नौकरानें खबर दिली. छोटी नांव आणि गाडी तयार आहे. जयावतीनं सुरेन्द्रबाबूंना आपल्या बरोबर येण्यासाठीं

परोपरीनं विनविलं, हट्ट करून पाहिला, परंतु सुरेन्द्रबाबू तिच्या बरोबर जायला तयार झाले नाहींत. जयावतीबरोबर मालती जायला तयार झाली, परंतु तिची प्रकृती अजून पूर्णपणें सुधारली नव्हती आणि ती बाहेर गेल्यास कदाचित् परत ताप येण्याचा संभव आहे हें कारण दाखवून तिला जयावतीबरोबर जाण्याची बाबूंनीं मनाई केली. शेवटीं जयावती निरुपाय होऊन एकटीच, दास–दासींना बरोबर घेऊन गेली.

मालती खोलींत बिछान्यावर आडवी झाली होती, परंतु सुरेन्द्रबाबूंना खोलींत आलेले पाहतांच संकोचानें ती उठून बसली. सुरेन्द्रबाबू बाजूलाच थोड्याशा अंतरावर बसले. बराच वेळ कुणी कुणाशीं बोललं नाहीं; परंतु आज कांहींतरी बोलण्याचा मनाशीं निश्चय करूनच सुरेन्द्रबाबू खोलींत आले होते. सुरवातीलाच बोलण्याचं त्यांना धैर्य झालं नाहीं. पुष्कळ वेळ गेल्यानंतर विचार करून त्यांनीं विचारलं, " खरंच तूं जाणार ?

मालतीनं मान हालवून म्हटलं, " हो. "

" नीट मागचा पुढचा विचार केला आहेस का ? "

मालतीनं पूर्वीप्रमाणेंच मान हालवून म्हटलं, " हो. "

" कुठे जाणार ? "

" तें मात्र माहीत नाहीं. "

सुरेन्द्रबाबूंना हंसू आलं, त्यांनीं म्हटलं, " मग कसला विचार केला आहेस तूं ? आज तर नाहीं परंतु उद्यां कलकत्ता एकदां पाहून ये आणि मग ठरव. मी तुला अडवणार नाहीं. "

मालती कांहींच बोलली नाहीं.

कांहीं क्षण न बोलतां नंतर सुरेन्द्रबाबूंनी पूर्वीपेक्षां जास्त उदासीनतेनं म्हटलं " तूं स्वतःशी जितका विचार केला असशील त्यापेक्षां जास्त मी तुझ्याविषयीं विचार केला आहे. तू ब्राह्मण–कन्या आहेस; तुझ्या हातून पाप–कर्म होणार नाहीं. चांगल्या घरची मुलगी आहेस, त्यामुळं चांगल्या घरांत जागा मिळाली नाहीं तर तूं राहणार नाहींस. एवढ्या मोठ्या शहरांत अशा असहाय्य अवस्थेंत चांगल्या घरचा तूं पत्ता कसा लावणार. हेच मला समजत नाहीं. "

आणखिन् थोडा विचार करून ते म्हणाले, "पुन्हां विचार करून पाहा–ह्या अशा तुझ्या वयांत आपली इज्जत, अब्रू शाबूत ठेऊन, स्वतःचं रक्षण करीत तूं स्वतःचं जीवन कंठू शकशील? पावला पावलागणित तुझ्यावर संकट येतील अशी मला आतांच भीती वाटते."

मालती गपचुप अश्रू ढाळीत होती; सुरेन्द्रबाबूंनीं उल्लेखिलेल्या गोष्टींचा तिनं विचार केला होता तरी पण तिला तिथून गेल्याशिवाय गत्यंतर नव्हतं.

मालती रडत आहे हें सुरेन्द्रबाबूंच्या लक्षांत आलं. ह्यापूर्वीहि तिला रडतांना त्यांनीं पाहिलं होतं, परंतु पूर्वीच्या रडण्यांत आणि आतांच्या रडण्यांत असलेला फरक चट्दिशी लक्षांत येऊन ते म्हणाले, "काय, मग जाण्याचाच निश्चय कायम केलास?"

मालतीनं डोळे पुसून मान हालवीत म्हटलं, "हो."

कितीतरी लोक सुरेन्द्रबाबूंना भोंदू समजत असत, परंतु वास्तविक पाहतां ते तसे नव्हते. जे लोक त्यांना ही पदवी बहाल करीत त्याच्यापेक्षांहि सुरेन्द्रबाबू शतपटीनें बुद्धिमान् होते, परंतु कितीतरी वेळां दुर्बल प्रकृतीच्या माणसासारखे ते वागत होते. त्यामुळं लोकांचा गैरसमज होत होता. मालतीच्या मनांत काय चाललं आहे हे त्यांनी चट्दिशी ओळखलं. मालती शांत झाल्यानंतर थोडंस हंसून सुरेन्द्रबाबू म्हणाले, "मालती, तुला पैशांची फार जरूरी आहे, नाहीं?"

तिच्या डोळ्यांत पुनः आसवांनी गर्दी केली; पैशांची इतकी आवश्यकता जगांत आणखिन् दुसऱ्या कुणाला नसेल?'

'फार जरूरी आहे ना?'

मालतीनं कसं तरी रडं आवरून अस्पष्ट स्वरांत म्हटलं, "हो" सुरेन्द्रबाबू हसले; आतां कुठलीच गोष्ट त्यांच्या लक्षांत यायची शेष उरली नाही. त्यांच्या लक्षांत सगळ्या गोष्टी येऊन गेल्या. दुसऱ्यांच दुःख पाहून त्यांना हंसू आलं. कारण कुसंगतीच्या दोषामुळं रडायला कांहींतरी यथार्थ कारण असतं हे ते सरून गेले होते; मनुष्य दुसऱ्याना फसवायलाच रडतो अशी त्यांची समजूत झाली होती. त्यामुळं थोडंसं हंसून ते म्हणाले, 'मग तूं रडतेस कां? तूं सुंदर

आहेस, तरुण आहेस आणि शिवाय कलकत्त्याला जात आहेस, तेव्हां तुला पैशाची काळजी करावी लागणार नाहीं, कलकत्त्यांत रस्तो रस्तीं पैसेच पैसे पडलेले आहेत, ह्याचा तुला अनुभव येईल.'

मालतीला वाटलं आपल्यावर कुठून तरी वज्राघात झाला! तिचं मस्तक सुन्न झालं. पाण्यांत उडी मारून जीव दिला तर विशेष हानी होणार नाहीं असा विचार करून मालती तसं करायला निघालीही, परंतु काय झालं कुणास ठाऊक कुणाच्या तरी कुशींत ती मूर्च्छित होऊन पडली. त्या कुशींत जणू कांहीं आग पसरली होती, अतिशय कठोर आणि ऊष्ण, जणूं कांहीं त्या कुशींत तिळभरही मांस नव्हतें, रतीभरही कोमलता नव्हती. मूर्च्छित अवस्थेत मालती त्या कुशींतून शहारून उठली. मालती भानावर आली तेव्हां आपण कुणाच्या कुशींत नसून आपल्याच अंथरुणावर आहोत आणि आपल्या शेजारींच सुरेंद्र-बाबू आपल्याकडे टक लावून पाहात बसले आहेत हें तिच्या लक्षांत आलं. लाजेनं तिचा चेहरा लाल होऊन गेला. दोन्ही हातांनीं आपलं तांड झांकून घेऊन तिनं आपली कुशी बदलली.

कांहीं वेळानंतर सुरेंद्रबाबू पुन्हां म्हणाले, 'मालती, उद्यां मी येथून नौका पुढें हलविणार परंतु तुला मी सोडणार नाहीं. तुला माझ्याबरोबर यावं लागेल.' श्वास कोंडून मालती ऐकूं लागली—'ज्या कामासाठीं तूं कलकत्त्याला जाणार आहेस तें काम तुझ्या हातून कालत्रयीं होणार नाहीं. हा धंदा तूं पूर्वी कधींच केला नाहींस आणि ह्यापुढेंही तुझ्या हातून होणार नाहीं. तुला जेवढ्या म्हणून पैशाची जरूर असेल आणि तुला जेवढा आराम आणि चैन उपभोगावयाची असेल तेवढं सगळं मी तुझ्यापाशीं आणून हजर करितो.'

कोंडलेल्या श्वासाबरोबरच मालतीच्या डोळ्यांतून अश्रू बाहेर पडले. सुरेंद्रबाबूंनीं तिला आपल्या हृदयाशीं ओढीत म्हटलं, 'मालती, माझ्याबरोबर चल; मी फार श्रीमंत नसलो तरी गरीब खास नाही. तुझा कामल भार मी सहजच उचलूं शकेल. पुन्हां विचार करून पाहा. मी तुला इथं असाच सोडून गेलो तर तुझी काय अवस्था होईल? आणि माझ्या मनाला तरी शांति मिळेल का? तिला आपल्या हृदयाशीं आणाखिन् जवळ घेत, तिचे अश्रू प्रेमानं पुसत आणि छीः!...

छीः! लाडानं संकुचित अशा तिच्या ओठांचं त्यांनीं चुंबन घेऊन विचारलं, "काय माझ्याबरोबर येशील ना?'

मालतीचं सारं शरीर रोमांचित होऊन गेलं, तिच्या अंग-प्रत्यंगाला कंप सुटला. आतां ती ललना नव्हती, मालती नव्हती, कुणीच नव्हती. त्यावेळीं ती फक्त सुरेंद्रबाबूंची चिरसंगिनी, जन्मजन्मांतरिची प्रणयिनी होती. ती त्यांची सीता होती, सावित्री होती आणि दमयंती होती. परंतु सीता—सावित्रींचं नांव कां घ्या? ती सुरेंद्रबाबूंची राधा होती, चंद्रावली होती; परतु त्यांत तिचं नुकसान काय होतं? सुख—शान्तीच्या स्वर्गांतही मानापमानाचा विचार? निःस्पन्द, अचेतन सुवर्ण प्रतिमेप्रमाणं ललना सुरेंद्रबाबूंच्या बाहूंत निश्चल पडून होती. त्या कुशींत आग नव्हती; शांतता होती, माधुर्य होतं, कोमलता होती आणि स्निग्धत्व होतं! इतके दिवस आपण शापग्रस्त होतो परंतु पुन्हां आपल्याला स्वर्ग-प्राप्ती झाली असंच ललनेला वाटलं. मालतीच्या संकुचित ओठांवर स्मित उमटलं. सुरेंद्रबाबू पुनःपुन्हां त्या ओठांचं चुंबन घेत तिला आपल्या हृदयाशीं कवटाळून धरीत. पापाच्या पहिल्या पायरीवर पाय ठेवून आणि स्वतःला विसरून ललना स्वर्ग सुखाचा अनुभव घेत होती. त्याच वेळीं सूर्य अस्ताला आला होता. खिडकीच्या झरोक्यांतून हे पाप—चित्र पाहात पाहात सूर्य दिसेनासा झाला. संध्याकाळच्या सूर्याच्या आरक्त किरणांच्या स्पर्शानं ललनेचं मुखमंडल अधिकच मनोहर झालं आहे असं सुरेंद्रबाबूंना वाटलं, त्यामुळं सहस्रपट आवेगांन आणि तृष्णेनं तिच्या मुखाचं चुंबन घेत त्यांनी विचारलं.'

'मालती, येणार ना माझ्याबरोबर?'

'हो.'

सुरेन्द्रनाथ बेभान होऊन म्हणाले, 'तर मग चल आपण आत्ताच निघू.'

'आणि आक्का?'

'कुठली आक्का?'

'तुमची पत्नी?'

सुरेन्द्रबाबू चमकले, त्यांनी उत्तर दिलं, ' माझी बायको ? ती तर केव्हांच मेली. '

' जयावती ? '

सुरेन्द्रबाबू शुष्क हास्य करून म्हणाले, ' जया माझी पत्नी नाहीं, तिच्याशी मी लग्न केलेलं नाहीं. '

' तर मग ती कोण ? '

' माझी कुणीच नाहीं—तूंच माझें सर्वस्व आहेस, तिचा माझा कसलाच संबंध नाहीं. जिवाभावाची तूं एकटी. '

मालतीनं आपली मान वळवली, आणि त्यांच्या कुशींत तोंड लपवून म्हणाली, ' मी तुमची जन्माची दासी आहे, मला दूर लोटूं नका. '

' नाहीं, कधींच नाहीं. '

' मग मला घेऊन चला बरोबर. '

' चल. '

' ह्याच घटकेला आजच. '

बाहेर ह्याच वेळीं आरडा–ओरडीला सुरवात झाली. शेंकडो लोक मोठमोठ्यानें ओरडत होते—धरा–धरा, बाजूला व्हा, गेली–गेली, बुडाली, ओ हो हो ती पाहा ! " सुरेन्द्रबाबू पळतच बाहेर आले, त्यांच्या पाठोपाठ मालतीही बाहेर आली. ह्या किनारीं, त्या किनारीं, चहूंकडनं खलाशी, नाविक, कुली–मजूर एकत्रित होऊन आरडा–ओरड करीत असलेले सुरन्द्रनबाबूंनीं बाहेर येतांच पाहिलं. दूर अंतरावर गंगेच्या मधोमध एक छोटी नांव आगबोटीशीं टक्कर खावून बुडत असलेली सुरेन्द्रबाबूंना दिसली. वस्तुस्थिती काय आहे हें क्षणार्धात त्यांच्या लक्षांत आलं. त्यांनीं ओरडून म्हटलं, ' अरे त्या नांवेंत माझी जया आहे. माझी जया ! ' मोठ्यानं ओरडून सुरेन्द्रबाबु पाण्यांत उडी मारण्याच्या बेतांत होते इतक्यांत मालतीनं त्यांना घट्ट धरून ठेवलं, सुरेन्द्रबाबू वेड्याप्रमाणें धडपड करीत पुन्हां ओरडून म्हणाले,

' मला धरू नका. धरू नका, माझी जया माझी जया, बुडते आहे. '

'ती छोटी नाव तोंपर्यंत त्या विशाल आगबोटाखालीं हळू हळू बुडून गेली. आजूबाजूच्या माणसांच्या हातांत सुरेन्द्रबाबू बेशुद्ध होऊन पडले.



'जया!' भानांवर येतांच सुरेन्द्रबाबूंनी व्याकुल होऊन हाक मारली—'जया–' मालती आपले डोळे पुशीत जवळच बसून त्यांची सेवा करीत होती. व्याकुल होऊन त्यांनी हांक मारलेली ऐकतांच ती पुन्हां पुन्हां आपले डोळे पुसूं लागली; सुरेन्द्रबाबूंनीं मालतीचे अश्रू पाहिले नव्हते, फक्त एकदां पाहून न पाहिल्यासारखं करून त्यांनी डोळे मिटून घेतले होते.

पुष्कळ वेळां स्वस्थ पडून राहून नंतर एक दीर्घ, निश्वास सोडून त्यांनीं विचारलं, 'जयाचा कांहीं पत्ता लागला?'

जवळच एक जुना नौकर बसला होता, त्यानं भीतभीत म्हटलं,

'नाहीं.'

'पत्ता लागला नाहीं? तर मग ती आतां जिवंत कशी असणार?'

नौकरानं विचार करून म्हटलं, 'असंच वाटतंय'

सुरेन्द्रबाबूंनीं विचारलं, 'किती रात्र झाली?'

'जवळ जवळ दहा वाजले आहेत.'

'दहा? तरी पत्ता लागला नाहीं?'

नौकरानं उत्तर दिलं नाहीं.

सुरेन्द्रबाबूंनीं कपाळावर हात मारून आणि अधिक निराश होऊन म्हटलं, 'तुम्ही जा—सगळ्या कलकत्ता शहरांत आणि गंगाकिनारी तिचा शोध करा, जा—'

नोकरानं मनांतल्या मनांत म्हटलं, 'हुकूम तर मोठा गमतीदार आहे,' परंतु उघडपणं म्हटलं, 'जो आज्ञा' आणि मग तिथून उठून तो आपल्या अंथरूणांवर येऊन पडला.

खोलींत मालतीच्या शिवाय दुसरं कुणी नव्हतं, परंतु कांहींच न बोलतां सुरेन्द्रबाबू निरंतर अश्रू ढाळात स्वस्थ पडून राहिले. या प्रमाणें वेळ निघून जात होता; खोलीच्या भिंतीवर एक घड्याळ टांगलेलं होतं, त्याच्यांत रोजच्या नियमांप्रमाणें अकराच्या नंतर बारा, बाराच्या नंतर एक आणि त्यानंतर दोन—तीन—चार असं वाजत गेले. परंतु घड्याळाच्या त्या कार्याकडे कुणाचंच लक्ष गेलं नाहीं. सुरेन्द्रबाबू पुनः पुनः ह्या कुशीवरून त्या कुशीवर आणि त्या कुशीवरून ह्या कुशीवर तळमळत होते. आणि मालती त्याच्या जवळ बसून त्यांची ती तळमळ पाहात गुपचुप आपले अश्रू पुसत होती. तिलाही दुःख होत होतं, लाज वाटत होती, आणि ह्या सगळ्यापेक्षां अधिक म्हणजे स्वतःविषयीं तिरस्कार वाटत होता. भूत, भविष्य आणि वर्तमान ह्यांचं तिच्या डोक्यांत चक्कर सुरू झालं होतं.

एकतर कलकत्त्याची भागिरथी कधी स्वस्थ विश्रांती घेत नाहीं आणि आतां तर चार वाजून गेले होतें; त्यामुळें सगळीकडे परत धांवपळीला आणि आरडा—ओरडाला सुरवात झाली होती.

सुरेन्द्रबाबू अचानक उठून बसले आणि मालतीकडे टक लावून पाहूं लागले कांहीं क्षणानंतर ते म्हणाले, 'रात्रभर जागरण करणं चांगलं नाहीं, तूं जाऊन झोप जा. मालती उठून चालूं लागली परंतु तिला परत बोलावून त्यांनीं म्हटलं, 'बैस, जाऊं नकोस, तुला कांहीं सांगायचं आहे.'

मालती दोन पावलं पुढ गेली होती, ती पुन्हां पहिल्या जागीं येऊन बसली.

सुरेन्द्रबाबूंनीं डोळे चोळून गंभीरतेनं विचारलं, 'मालती हे कुणाच्या पापामुळं झालं?'

मालतीच्या डोक्यावर आकाश कोसळलं. तिनं हा प्रश्न आपल्या मनाशीं पुष्कळदां विचारला होता आणि त्याचं उत्तरही तिला मिळालं होतं; परंतु तोंड उघडून तें उत्तर उघड रितीनें बोलण्याचं धैर्य तिच्या हातून झालं नाहीं. मान खालीं घालून ती स्वस्थ बसून राहिली.

सुरेन्द्रबाबूंना बोलायचं होतं ते न बोलतां ते म्हणाले, ' ठीक आहे, तूं आतां जा, ह्या सगळ्या गोष्टी आपण नंतर बोलूं. '

मालती नंतर आपल्या खोलींत येऊन अंथरुणावर आडवी झाली; तिला झोप येईना. उरलेली रात्र तिनं बिछान्यावर तळमळत काढली. कितीतरी वेळां ती उठून बसली आणि परत अंथरुणावर आडवी झाली; कितीतरी देव देवतांचं तिनं स्मरण केलं आणि कितीतरी गोष्टींची तिनं आठवण केली. शेवटीं अर्धवट जागी असतांनाच तिला नाना प्रकारची स्वप्नं पडूं लागलीं. जयावती लाल लाल डोळे करून आपल्याकडे पाहात आहे तर कधीं वेडा सदानंद आपल्याच लहरींत गात बसला आहे; कधीं आई शुभदा व्याकुल होऊन रडत आहे तर माधव उशाशीं येऊन कुठल्या तरी अज्ञात स्थळीं चलायचा हट्ट करता आहे असं तिला दिसलं. परंतु त्या अज्ञात स्थळीं जायची तिची इच्छा नव्हती तरी सुद्धां माधव तिचा पिच्छा सोडत नव्हता. अचानक मालतीची झोंप उडून गेली. तिनं डोळे उघडून पाहिलं. कुठं कुणीच नव्हतं, फक्त सकाळच्या सूर्याची कोवळीं किरणं मात्र खिडकी वाटे येऊन तिच्या चेहऱ्यावर पडलीं होतीं. मालती बिछा-न्यांतून बाहेर आली.

मालतीला त्या दिवशीं दिवसभर सुरेन्द्रबाबू दिसले नाहींत. ती उठायच्या पूर्वीच थोडा वेळ आधीं नौका सोडून ते गेले होते. दुसऱ्या दिवशींही ते परत आले नाहींत, तिसऱ्या दिवशीं संध्याकाळ व्हायच्या आंत ते परत आले आणि आपल्या खोलीचा दरवाजा बंद करून घेऊन बसले. तो दिवसही तसाच निघून गेला. दुसऱ्या दिवशीं त्यांनी मालतीला बोलावून घेतलं. खोलींत येऊन एका बाजूला मान खालीं घालून मालती उभी राहिली.

सुरेन्द्रबाबू एका कागदांवर कांहीं तरी लिहीत होते—ते कुणाला तरी पत्र लिहीत असावेत. मालतीनं डोळ्यांच्या कोपऱ्यांतून पाहिलं, सुरेन्द्रबाबूंची अवस्था

मोठी विचित्र झाली होती. त्यांचे डोळे लाल लाल होऊन गेले होते, डोक्यावरले केस भुरे झाले होते आणि कपड्यांना जागीं जागीं चिखल लागला होता. मालती आंतल्या आंत शहारून आली. कुठल्या तरी अत्यंत घोर अशा अपराधामुळें तिला न्यायालयांत ओढून आणलं आहे असंच तिला वाटलं.

सुरेन्द्रबाबूंनीं अर्धा लिहिलेला कागद एका बाजूला काढून ठवीत आणि मान वर करीत मालतीला म्हटलं, ‘ तुझी प्रकृती आतां चांगली धडधाकट झाली आहे ना ? ’

मालतीनं खालीं मान घालून नुसत्या मानेनंच दर्शविलं हो झाली आहे.

‘ मी आजच इथून नौका हाकारण्याचा हुकूम देणार आहे. गंगेच्या पलीकडच्या किनाऱ्याला कलकत्ता आहे. तुझी इच्छा असेल तिथं जा. ’

सुरेन्द्रबाबूंचें ते कठोर शब्द ऐकून मालतीच्या डोळयांतून अश्रू वाहूं लागले, परंतु ती तोंडानं कांहींच बोलली नाही.

सुरेन्द्रबाबूंनीं शेजारचा कागद हातांत घेत म्हटलं, ‘ कलकत्त्यांत माझे एक मित्र आहेत, हें पत्र घेऊन त्यांचा पत्ता काढून त्यांच्याकडे जा ते कदाचित् कांहींतरी तुझी सोय लावून देतील. ’

टप् करून आसवाचा एक थेम्ब तिच्या पायापाशीं तिच्या डोळ्यांतून गालीच्यांवर पडला.

सुरेन्द्रबाबूंनीं तें पाहिलं, आणि म्हणून त्यांनी पुन्हां विचारलं, ‘ तुझ्याजवळ पैसे नाहींत ना. ’’

मालतीनं मान हालवून म्हटलं, ‘ हो. ’

“ हे घे. ” असं म्हणून उशाच्या खालून एक ‘ मनी बॅग ’ काढून तिच्या पायाजवळ फेंकीत ते म्हणाले, “ त्या मनीबॅगमध्यें जेवढे पैसे आहेत त्यानं तुझा एक वर्षभर निर्वाह व्यवस्थित होऊं शकेल. पुढें ईश्वराची मर्जी ! ”

टप्दिशीं आणाखिन् एक अश्रू गालिच्यावर पडला.

“ त्या दिवशीं ठिकाणावर नव्हतो ना ! त्यासाठींच विचारलं होतं कीं कुणाचं पाप नडलं ? माझ्याच पापाचं तें फळ; असं आतां मला दिसून आलं आहे; तूं निर्दोष आहेस. माझ्या जयाची हत्या मीच केली आहे. ”

कपाळांवर घामाचे बिन्दू जमा झाले होते. ते आपल्या हातानं पुसून ते पुढं म्हणाले, ‘ फार झालं—आतांपर्यंत मी पुष्कळ पाप केलं पण ह्यापुढें मुळींच करणार नाहीं. कांहीं दिवस चांगल्या मार्गानं चालून पाहावं सुख मिळतं कीं नाहीं तें ? ’

मालती उभीच राहिली आणि सुरेन्द्रबाबू पत्र पूर्ण करूं लागले. पत्र पूर्ण झाल्यानंतर त्याची घडी करून एका लिफाफ्यांत बन्द करून आणि त्यांवर पत्ता लिहून तिच्या पायापाशीं फेकीत म्हणाले, ‘ हें पत्र घे, शाम-बाजारांत त्यांचा पत्ता लागेल, कदाचित् तुझं कामहीं होऊन जाईल. ’

थरथरत्या हातांनं मालतीनं पत्र घेतलं.

सुरेन्द्रबाबूंनीं म्हटलं, ‘ ती पर्सही घेऊन जा. ’

मालतीनं ती ‘ मनीबॅग ’ ही उचलली. तें पत्र आणि ती मनीबॅग घेऊन मालती दरवाज्याकडं वळली तोंच सुरेन्द्रबाबूंच्या हृदयांत कसली तरी कालवाकालव झाली. त्यांनीं कातर स्वरांत म्हटलं, ‘ धर्माच्या रस्त्याचा त्याग करूं नकोस...... ’

मालतीनं आणखिन् एक पाऊल पुढें टाकलं. ह्या वेळेस सुरेन्द्रबाबू कांपऱ्या आवाजांत म्हणाले, ‘ संकटसमयीं, विपत्प्रसंगीं मला कळवायला विसरूं नकोस... ’

मालतीनं दरवाजाचं हॅंडल धरून फिरवलं, दरवाजा अर्धा उघडला, सुरेन्द्रबाबूंच्या आवाजाला जास्तच कंप सुटला होता, ते म्हणाले, ‘ मालती, त्या दिवसाची गोष्ट विसरून जा...... ’

मालती बाहेर निघून जातांच सुरेन्द्रबाबूंच्या डोळयांत पाणी आलं, त्यांनीं हांक मारली, ‘ मालती ! ’

मालती जिथल्या तिथंच उभी राहिली.

त्यांनीं पुन्हां हांक मारली, ‘ मालती ! ’

ह्या वेळीं आंत येऊन ती दाराचा आश्रय घेऊन उभी राहिली.

डोळे पुसून सुरेन्द्रबाबू म्हणाले, ‘ जयाच्या दुःखाचा विसर अजून मला पडत नाहीं... ’

दाराचा आश्रय सोडून मालती तिथंच मटकन् बसली; तिचे पाय कांपत होते.

‘ मालती, कुणाच्या आश्रयानं ह्या जगांत मी जगूं ? ’ सुरेन्द्रबाबू लहान मुलासारखं रडूं लागले, तूंही मला सोडून निघून गेलीस तर मी कदाचित् जिवंत राहाणार नाहीं. ’

एवढं म्हणून ते गालीच्यावर आडवे पडले.

मालती त्यांच्या जवळ जाऊन बसली. त्यांचं डोकं आपल्या कुशींत घेत त्यांचे अश्रू पुसून म्हणाली,

‘ मी जाणार नाहीं. ’

मग नंतर दोघेही पुष्कळ वेळ रडत होतीं.

मालतीनं पुन्हां एकदां त्यांचे डोळे पुसले. सुरेन्द्रबाबूंनीं डोळे बंद करून दाटलेल्या कठानं मालतीला प्रश्न केला, ‘ त्या दिवशीं तूं काय म्हणाली होतीस आठवतं ? ’

‘ काय ? ’

‘ जन्माची दासी ! ’

‘ आहेंच मी ! ’

सुरेन्द्रबाबूंनी हांक मारली, ‘ हरिचरण ! ’

छतांवरून हरिचरण खलाशानं उत्तर दिलं, ‘ हुजूर ? ’

‘ नौका ह्याच वेळीं, ह्याच क्षणाला हांकारा. ’

‘ ह्याच क्षणाला ? ’

‘ हो ह्याच क्षणाला. ’

# ६

ती नौका दिसत होती तोंपर्यंत सदानंद त्या नौकेकडं एकसारखा टक लावून पाहात राहिला आणि नंतर घरीं येऊन झोपी गेला. त्याचं मन प्रसन्न नव्हतं त्यामुळें त्याला झोप चांगली लागली नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं शुभद्राकडे जाऊन सदानंदानं म्हटलं, ' दररोज तुमच्या इथं येऊन मी जेवलो तर कसं होईल ? '

शुभद्रानं सुकलेल्या चेहऱ्यानं उत्तर दिलं, ' चांगलंच होईल. '

' मी देखील हाच विचार करीत होतो; माझं तर आतां कुणीच नाहीं तेव्हां मी विचार केला कीं—

तुमच्याकडेच कां खाऊ-पिऊ नये ? '

शुभद्रानं विचार करून म्हटलं, ' ठीक आहे. '

' आत्त्याच्या सासरीं तिचा थोडा जमीन जुमला आहे तो मलाच मिळाला आहे. दोन एक दिवसांतच तिथं जाऊन मला त्याची व्यवस्था करावी लागेल.'

शुभद्रा म्हणाली, ' त्याची व्यवस्था तूं नाहीं करणार तर आणखिन् दुसरं कोण करणार ? '

' म्हणूनच माझा विचार तुमच्या इथंच धान्याचं कोठार ठेवावं असं आहे, नाहींतर धान्याची चोरी होण्याचा संभव फार '

शुभद्राला सदानंदाच्या म्हणण्याचा आशय नीट न समजल्यामुळं ती म्हणाली, 'आतापर्यंत धान्य चोरीला गेलं नव्हतं ना ?'

' आतापर्यंत गेलं नाहीं म्हणून ह्य पुढें जाणार नाहीं असं थोडंच आहे '

शुभद्रानं कांहींच उत्तर दिलं नाहीं.

त्यानंतर एक दोन दिवसांनीच धान्य, डाळी, बटाटे, नारळ, गूळ यांची श्रीहारानमुकर्जी महाशयांच्या घरीं रेलचेल उडाली.

ते सगळं पाहून शुभदानं विचारलं; ' सदानंद, लोकांनीं पाहिलं तर ते काय म्हणतील ! '

सदानंदानं हंसून उत्तर दिलं, ' वस्तू माझ्या आहेत लोकांच्या नाहींत. मी इथंच खातो–पितो, इथंच राहतो मग माझ्या वस्तूही इथंच राहतील. '

शुभदाच्या आजूबाजूला राहणाऱ्या लोकांत कुज–बुज सुरू झाली. नाना तऱ्हेचे लोक नाना तऱ्हेच्या गोष्टी बोलूं लागले आणि नाना तर्क–वितर्क लढवूं लागले. कुणी म्हणत, ' अरे हारानच्या बायकोनं सदानंदावर जादू–टोणा केला आहे. ' कुणी म्हणत, ' सदानंद खरोखरीच वेडा झाला आहे. ' तिसऱ्यानं तर अशी बातमी उठवली कीं ' छलनामयीचं लग्न सदानंदाशी होणार आहे; सदानंद ह्या गोष्टी ऐकून मनांतल्या मनात हंसत असे. कुणी जर ह्या गोष्टीची चर्चा सदानंदासमोर केली तर तो हंसत· हंसत त्यांना एखादं गाणं ऐकवीत असे नाहींतर थट्टेनं...म्हणे, ' अरे बाबा, मी मरायच्यापूर्वी माझी दोन बिघे जमीन तुझ्या नांवानं करून देईन, ' या उप्परही लोकांनी पिच्छा सोडला नाही तर मग तो गंभीर होऊन उत्तर देई, 'वेडे लोक वेडाचार करतातच त्याच्यासाठीं तुम्हाला काळजी करायची जरुरी नाहीं.'

हळूहळू लोकांची तोंडं बंद होत चालली; परंतु ज्या लोकांचा स्वभाव मत्सरी होता ते आंतल्याआंत जळफळूं लागले. भवतारण गंगोपाध्याय महाशयांनी जेव्हां ही गोष्ट ऐकली तेव्हां सदानंदाला बोलावून त्यांनीं त्याला उपदेशाचा एक चांगला डोस पाजला.

भवतारण गंगोपाध्याय महाशयांचा उपदेश लक्ष देऊन ऐकल्यानंतर दुःख प्रदर्शित करीत सदानंद म्हणाला,

' व्हायचं ते होऊन गेलं, यापुढं आत्त्याच्या सासरहून परत आल्यानंतर तिथलं धान्याचं कोठार उचलून तुमच्या इथं आणून ठेवीन. '

गंगोपाध्याय महाशय रागाऊन म्हणाले, ' अरे सदानंद, तुझे वडील सुद्धां माझा मान ठेवीत असत. '

‘ मी तरी तुमचा कुठं अपमान केला आहे ? ’

‘ तर मग तोंडानं असे शब्द कां काढतोस ? ’

सदानंदानं चमकून उत्तर दिलं, ‘ माझं डोकं ठिकाणावर नसतं माहीत आहे ना ’

गंगोपाध्याय महाशय आणखिन संतापून म्हणाले,

‘ तूं घसरत चालला आहेस खालीं खालीं.’

सदानंदान हंसून म्हटलं, ‘ तुम्ही लोकांनीं प्रयत्न केला असता तर कदाचित मी घसरलों नसतों. ’

‘ जा माझ्या समोरून निघून जा.’

‘ जी आज्ञा ! ’ असं म्हणून सदानंद बाहेर येऊन खूप पोट धरधरून हंसला, हंसून झाल्यानंतर त्यानं मुक्तकंठानें गायला सुरवात केली.

कंगालीचरण डोक्यावर पडवळीचं ओझं लादून तिकडूनच बाजाराला चालला होता. त्यानं सदानंदाच्या डोक्यांतून जेव्हां आनंद ओसडतांना पाहिलं आणि कंठांतले मधुर स्वर ऐकले तेव्हां कुतूहलानं विचारलं. ‘ एवढा आनंद कशाचा झाला तुला ? ’

सदानंदानं हंसून उत्तर दिलं, गांगूली महाशयांच्या घरीं आज आमंत्रण होत ना, तिथं मी खूप खाल्लंय, त्याचा आनंद झाला आहे मला. ’

कंगालीचरणनं म्हटलं, ‘ असं होय ? तर मग ठीक ! ’

ह्या प्रश्नोत्तरानंतर सदानंदानं पडवळाच्या भावाची चौकशी केली आणि मग आपल्याच लहरींत गुणगुणत तो घरीं आला. कंगालीचरणही आपल्या वाटेनं बाजारहाट करायला निघून गेला.

इथं एक गोष्ट सांगणं आवश्यक आहे. मनांतच स्वर्ग आणि नरक वास करीत असतात असं कवींनी म्हटलं आहे. ही गोष्ट संपूर्णपणें सत्य जरी नसली तरी तींत थोडा फार सत्याचा अंश आहे ह्याबद्दल शंका नाहीं. कारण, हारानचंद्राला ज्या गोष्टींत भौतिक सुखांची चरणसीमा सांठलेली आहे असं वाटत होतं त्या गोष्टींत तितका आनंद शुभदाला वाटत नव्हता. हल्ली हारानबाबू दोनदां समाधानानं यथास्थित भोजन करीत असत. आणि दोनचार आण्याचे पैसेहि बायको

कडून त्याना मिळत होते. आणि शिवाय कर्ज भागावण्याची त्यांच्यामागें कटकटही पण नव्हती. त्यामुळं त्यांना स्वर्गसुखाची प्राप्ती झाल्यासारखं वाटत होतं. हल्लीं बाजारांतून अभिमानानं छाती वर करून जातांना त्याना कुणाचच भय वाटत नसे. आतां कुणाचीच बाकी द्यायची राहिली नव्हती. अड्डेवाल्यांनी पूर्वींचं त्यांचं अधिकाराचं स्थान त्यांना परत बहाल केलं होतं. त्यामुळें त्यांना आतां कुठल्याच गोष्टीची कमतरता भासत नव्हती. सदानंदाचा हा वेडेपणा असाच उत्तरोत्तर वाढत गेला तर बरं होईल असा विचार त्यांच्या मनांत कधीं मधीं येत असे, नाहीं असं नाहीं; त्या वेळेस सगळं अफूचं दुकान खरेदी करून कात्यायनीच्या गर्वाचं हरण करण्याची स्वप्नं पाहायला ते सुरवात करीत असत. तिची एका वर्षाची चन्दी ' झन् ' करून तिच्या समोर फेंकून ' हरामी अवलाद, रंडी, माझा अपमान करतेस ? पुरुषाचं भाग्य आणि स्त्रीचं चरित्र स्वतः देवाला सुद्धां कळत नाहीं तर मग तुझी: काय कथा ! अशा तऱ्हेनं आपल्या अपमानाचा सूड उगवायचा विचार त्यांच्या मनांत बळावत असे. आणि शिवाय तो भगवान नन्दी ? त्याच्या घरासमोर अफूचा अड्डा नाहीं उघडला तर माझं नांव हारान मुकर्जीच नव्हे. असाही मधून मधून ते दम भरीत असत. बस्स त्यांच्या स्वर्ग सुखांत वर सांगितलेल्या गोष्टींचीच काय ती कमतरता होती, एकदां त्या पूर्ण झाल्या म्हणजे आपल्या आयुष्याचे सार्थक झालं आणि याच देहीं याच डोळं स्वर्गसुखाचा आपण अनुभव घेतला अशी ते खूणगांठ बांधीत.

परन्तु शुभदा ? तिला काय वाटत होतं ? तिला कां कसल्या गोष्टींची काळजी होती आतां ? पतीचं सुख तिला कधींच मिळालं नाहीं ह्याला प्रत्यक्ष परमेश्वर साक्षी होता. परंतु अशा पतीच्या तोंडांतही चार घांस टाकताना तिला केवढं सुख होत होतं, तिला केवढे समाधान होतं ह्याचं तिला स्वतःलाच अजून ज्ञान नव्हतं. आनंदातियामुळं तिच्या डोळ्यांत अश्रू उभे रहात, परंतु ते आनंदाश्रू पाहायला आतां कोण होतं ? त्याना पाहून आनंद मानणारी व्यक्ती होती, पण ती तर केव्हांच मरून गेली होती ! एवढीच एक गोष्ट असती तर शुभदानें आपले दोन्ही डोळे आनंदानें कायमचे मिटून घेतले असते आणि

ह्या कष्ट–प्रद संसार–यात्रेची समाधी केला असती, परंतु छलनामयी दिवसें दिवस मोठी होत चालली होती, तिच्या ऋणांतून मुक्त करूं व्हायचं ? मरून गेली तिचं कल्याण झालं परंतु माधवच्या प्रकृतीचं काय होणार ह्याचा पुष्कळ विचार करूनही शुभदाला अंदाज लागला नव्हता. औषधपाण्याची तरतूद चांगलीच लागली होती त्यामुळें त्याची शुश्रुषाही चांगली होत होती परंतु त्याचा परिणाम अजूनही दिसून येत नव्हता. हें पाहून शुभदा आपल्या कपाळांवर हात मारून ढळढळां रडत असे. ललनेची आठवण झाली म्हणजे एकांतांत जाऊन अश्रू ढाळीत ' तिच्याकडे मला घेऊन जा. ' अशी देवाला मनोगत प्रार्थना करीत असे. इतकं असूनही ती आपलं दुःख गुपचुप आंतल्या आंत गिळून नदींवरून पाणी आणीत असे, स्वयंपाक करीत असे आणि सगळ्यांना खाऊं-पिऊं घालीत असे. अशाच तऱ्हेनं तिचे आणि तिच्या कुटुंबाचे दिवस जात चालले होते.

एके दिवशीं दुपारीं जेवतां जेवतां सदानंदानं शुभदाला म्हटल, ' छलना आतां मोठी झाली आहे.'

शुभदा उदास होऊन म्हणाली, 'हो '

'ह्यापुढें तर तिला तसंच ठेवता येत नाहीं आणि ते चांगलंही दिसत नाहीं.'

शुभदानं म्हटलं, ' आई दुर्गेला काळजी.'

सदानंदानं हसून म्हटलं, 'आई दुर्गा प्रत्यक्ष येऊन कांहीं लग्न करून जाणार नाहीं!'

शुभदानं कांहींच उत्तर दिलं नाहीं.

'हरमोहन बाबूच्या मुलाशीं ललनाचं लग्न झालं तर कसं होईल ? '

शुभदाला नीटसं समजलं नाहीं, त्यामुळं तिनं विचारलं.

' शारदाशीं ? '

'हो.'

'पण हें व्हायचं कसं ? '

'कां ? '

'कुणाला माहीत !' शुभदानं निराशेनं म्हटलं.

वेड्या सदानंदाच्या लक्षांत सगळं कांहीं आलं. तोंड फिरवून त्यानं थोडंसं हंसूनही घेतलं आणि नंतर शुभद्राकडे वळून त्यानं म्हटलं, 'एक दिवस यासंबंधीं शारदाकडे मी ही गोष्ट काढली होती. त्याच्या म्हणण्यावरनं मला असं दिसून आलं कीं, त्याची या गोष्टीला तयारी आहे.'

शुभद्राचा चेहरा क्षणभर फुलून उठला, लगेच उदास होऊन ती म्हणाली, 'परंतु त्यांच्या वडिलाचं काय? ते तयार होतील का?'

'न व्हायला काय झालं?'

शारदाचा बाप या संबंधाला तयार का होणार नाहीं, हे शुभद्राला माहित होतं परंतु तोंडानं तिला बोलतां येत नव्हतं. शारदाच्या वडिलांची सम्मती मिळवायला कोण जाणार? हें विचारायचं एकदां तिच्या मनांत आलं; पण तेंही तिनें विचारलें नाहीं. मुकस्तंभासारखी कातर नेत्रानं ती सदानंदाकडे पाहात राहिली.

सदानंदाला त्या मूक भाषेचा अर्थ समजला; त्यानं म्हटलं, 'नाना खट-पटी करून त्याच्या वडिलांना आपणच तयार केल पाहिजे. आम्हाला छलनाचं लग्न करणं भाग आहे ना?'

शुभद्रानं भीत भीत विचारलं, 'पण ते तयार होतील का?'

'जरूर होतील.'

'हें तुला कसं कळलं?'

वेड्यानं पुन्हां हंसून म्हटलं, 'मला माहीत आहे; तुम्ही मुळींच काळजी करूं नका. मी खात्रीनं त्यांची सम्मती मिळवीन.'

वृद्ध हरमोहनबाबूंची सम्मती कशी मिळल हे सदानंदाला माहीत होतं आणि त्यांची सम्मति मिळेल अशी खात्री हो ीं.

शुभद्राला आतां रहावेना. खोलींतून दूध आणायला ती तिथून निघून गेली. दुधाच्या वाटींत बेसावधपणामुळें तिच्या डोळ्यांतून एक मोठा थेंब गळून पडला. दुधांत डोळ्यांतून थेंब पडलेला पाहून शुभाद्रानं बाहेर येऊन म्हटलं, 'सदानंद, थांब जरा खोलींत जाऊन मी दुसरं दूध घेऊन येतें.'

दुधाची कढई ठेवली होती त्या खोलींत जाऊन कढईवर हात ठेवून शुभद्रानं रडून घेतलं, ह्या वेळीं मात्र अश्रू दुधांत न पडतील अशी तिनं खबर-

दारी घेतली होती. रडून घेतल्यानंतर डोळे पुसून कढईतलं दूध वाटींत ओतूं लागली. शुभदा रडली, पण तिचे अश्रू म्हणजे हृदयाला भेदून निघणारे रक्त-बिन्दू नव्हते, एवढं मात्र खरं कीं, त्यांतला एक अश्रू ललनेसाठीं होता आणि एक अभागी हारानबाबूंच्या दुर्दैवी जीवनासाठीं होता !

जेवण संपल्यानंतर सदानंद आपल्या शेताकडे निघून गेला. तिथें बांधावर थोडंसं हिंडून फिरून एका पिंपळाच्या झाडाखालीं जाऊन बसला. कांहीं क्षण त्या झाडाखालीं त्यानें विश्रांति घेतली. नंतर तंबाखू ओढून आणि दोनचारदां दुर्गाचं नांव घेऊन वृद्ध हरमोहनबाबूंच्या बैठकींत तो येऊन दाखल झाला.

हरमोहन नुक्तेच झोपून उठून तंबाखू फुंकीत बसले होते. चिलीम पूर्ण पणें पेटली नव्हती, तींतून थोडा थोडासा धूर निघत होता.

सदानंद आलेला पाहतांच हरमोहन म्हणाले, ‘ अरे, पुष्कळ दिवस दिसला नाहींस कुठं ? हां, तुझ्या आत्यानं काशींतच देह ठेवला एवढं मात्र ऐकलं खरं. केव्हां आलास ? बैस. ’

संकोच न करतां सदानंद त्यांच्याजवळच बसला. कसलीच प्रस्तावना न करतां सदानंदानें बसल्याबरोबर मुद्यालाच हात घातला, ‘ मुलगी सांगायला आलोय मी.

हरमोहननीं हंसून विचारलं, ‘ कुणाला ? ’

‘ आपल्या मुलाला. ’

सदानंदाचं उत्तर ऐकतांच हरमोहन बाबू एकदम गंभीर झाले. व्यवहारी लोक व्यवहारांतील गोष्टी सुरू झाल्या कीं त्यांना हास्यविनोद सुचत नाहीं. हरमोहनबाबू हे पक्के व्यवहारी गृहस्थ होते आणि आपल्या पुत्राच्या लग्नाचा विषय म्हणजे एक व्यवहारच आहे असं ते समजत होते. त्यामुळं तो विषय निघतांच व्यवहारी माणसाप्रमाणें ते गंभीर झाले होते. लग्नासारख्या गंभीर विषयावर बोलणीं चालणीं करायला पिकल्या केसाचे आणि मिशांना चाट दिलेले लोक येत असतात असा त्यांचा समज होता. परंतु सदानंदासारख्या कोवळ्या पोरानं तो विषय काढलेला पाहतांच ते संकटांत पडल्यासारखे दिसले. सदानंदाचं डोकं

आतां काल फिरलं आहे असं त्यांच्या कानांवर आलं होतं आणि त्याचं प्रत्यक्ष प्रमाण जेव्हां त्यांना दिसलं तेव्हां कठोर स्वरांत त्यांनीं विचारलं, 'कुणाचं लग्न जुळवतो आहेस ? शारदाचं ?

'हो.'

अन्यमनस्कतेनं त्या म्हाताऱ्यानं आंत घराकडे बोट दाखवून म्हटलं, 'घरांतच शारदा असेल, जा.'

म्हाताऱ्याची ती कृति पाहून सदानंदानं त्यांच्या मनांत काय आलं असावं ह्याचा बरोबर अंदाज बांधला.

त्यानं थोडंसं हसून म्हटलं, 'शारदाशीं माझं काम नाहीं, माझं काम आपल्याशीं आहे.'

म्हाताऱ्यानं पूर्वीच्याच स्वरांत विचारलं, 'माझ्याशीं ?'

'हो.'

'कां ?'

'आतांच तर मी सांगितलंय. मुलीचं स्थळ घेऊन आलो आहे मी. शारदाचं लग्न करणार ना ?'

'कां करणार नाहीं ? पण त्याच्याशीं तुझा काय संबंध ?'

'संबंध नसता तर आलो असतो कशाला तुमच्याकडे ?'

'त्याच्या लग्नासंबंधानं तुला माझ्याशीं बोलणीं करायचीं आहेत का ?'

'हो'

'परंतु तुझ्याबरोबर असलीं बोलणीं कशी करायचीं ?'

सदानंदानं गंभीर होऊन म्हटलं, 'काय हरकत आहे ? मी लहान असतांनाच माझे वडील वारले. तेव्हांपासून मी त्यांचा जमीन-जुमला पाहात आलो आहे. त्यामुळें व्यवहारांचीं बालगी मलाच करावीं लागतात. लग्नाची बोलणीं करायला गेल्यानंतर देण्या-घेण्याची ही भाषा व्यवहाराला अनुसरून करावी लागते, त्याचंही मला ज्ञान आहे आणि या विषयांत तुम्हांला जितकं समजतय तितकच मलाही समजतं याची मला खात्री आहे.

वेड्यासारखं सदानंद कांहींतरी बडबडला नाहीं ह्याचं ज्ञान त्याचें बोलणं ऐकून हरमोहनबाबूंना पहिल्यांदाच झालं. त्यांनीं जरा चिडूनच म्हटलं, 'हो, देण्या–घेण्याची भाषा तर करायलाच हवी.'

सदानंदाला आतां मग हंसू आवरलं नाहीं; त्यानं हंसून म्हटलं, 'देण्या-घेण्याची भाषा माझ्याशीं केली तर तुमचं कांहीं विशेष नुकसान होणार नाहीं. त्या संबंधीं कांहीं तरी नक्की करायला मी तुमच्याकडे आलों आहे.'

हरमोहरबाबू थोडसं नरम पडून म्हणाले, 'मुलगी कुणाची आहे ? कुठली आहे ?'

'मुलगी इथलीच आहे. श्री हारानचंद्र मुखोपाध्यायांची दुसरी मुलगी.'

'हारानची ?'

'हो.'

'तो काय देणार ?'

'तुम्ही जें मागाल तें.'

म्हातान्यानें कांहीं क्षण विचार करून विचारलं, 'मुलगी दिसायला कशी आहे ?'

मुलीला तुम्ही पाहिलेलं आहे, तुम्हाला आतां आठवत नसेल, माझ्यामतें मुलगी दिसायला बरी आहे आणि तुमच्या मुलाला ती पसंत आहे.'

म्हाताऱ्यानं ह्यावेळीं हंसून म्हटलं, 'मग तर ठीकच झालं आम्ही गृहस्थ लोक. आम्हाला मेणाची बाहुली चालणार नाहीं. दिसायला चांगली आणि काम–काजाला बरी असली की पुष्कळ झालं.'

सदानंदानं म्हटलं, 'काम काज सगळं तिला करतां येतं'

'परंतु हारान हुंडा किती देईल ? आज काल त्याची परिस्थती तितकीशी चांगली दिसत नाहीं.'

'परिस्थिती खरोखरीच चांगली नाहीं आणि याचा—तुम्ही विचार करून जे मागाल ते तुम्हाला खात्रीनं देतील' वृद्ध महाशय पुन्हां संकटांत पडल्यासारखे दिसले. ही गोष्ट तोंडांतून काढली नसती तर बरं झालं असतं असं ते मनांतल्या मनांत म्हणूं लागले, तरी व्यवहार कुशल वृद्धानें आपली चूक

सुधारीत म्हटलं, ' आतां हें पहा सदानंद, मुलींच्या लग्नांत थोडाफार खर्च ह करावा लागतोच '

' हो, '

हरमोहनबाबूंनी तेव्हां गंभीर चेहरा करून म्हटलं,

' नगद एक हजार रुपयांच्या पेक्षां कमी हुंडा मी घेणार नाहीं. '

सदानंदानं हंसत म्हटलं, ' मग हें नक्की ठरलं ? '

सदानंदाचे शब्द ऐकून वृद्ध आपल्यावरच रागावले मनांतल्या मनांत स्वतःला गाढव ठरवून दीड हजार रुपये कां सांगितले नाहींत याबद्दल ते स्वतःला दोष देऊं लागले. परंतु एकदां शब्द दिल्यानंतर तो परत घेता येत नाहीं, तरी त्यांतल्या त्यांत जेवढं सुधारून घेता येईल तितकं सुधारून घेण्यासाठीं त्यांनी म्हटलं, ' मुलीच्या अंगावर शिवाय दागिने तर घालीलच. '

' हो. '

' आणि यथानियम मानपान राखले पाहिजेत. '

' हो राखणारच. '

' तर मग मला कबूल आहे '

' मग मुहूर्त ठरवा. '

वृद्धानं थुंकून म्हटलं, ' हा संबंध एक प्रकारे आपल्या माणसांतच होतो आहे हें एका परीनं बरंच झालं, हारान कांहीं आम्हाला परका थोडाच आहे आणि तरी सुद्धां जनरुढीप्रमाणं प्रत्येकाला वागलंच पाहिजे. '

सदानंदानं शंकित होऊन विचारलं, ' आणखिन् जनरूढी ती कसली?'

वृद्धानें हंसत म्हटलं, ' जनरूढी ती दुसरी कसली असणार ? हेंच कागदावर झालेलं बरं. '

' ठीक आहे, तेंही होऊन जाऊं द्या. '

' परंतु कुणाबरोबर करायचं ? '

' माझ्याच बरोबर. '

' केव्हां ? '

सदानंदानं थोडा विचार करून म्हटलं, ‘ एका महिन्यानंतर. ’ वृद्धानें कबूल केलं.

त्यानंतर सदानंदानं म्हटलं, ‘ माझी एक प्रार्थना आहे. ’

‘ काय बाबा ? ’

‘ ही देण्या-घेण्याची भाषा तिसऱ्या कुणाला सांगू नये. ’

‘ कां ? ’

‘ कारण आहे एक. ’

हरमोहन हे पक्के व्यवहारी गृहस्थ होते; सदानंदाच्या मनांतील भाव ओळखून त्यांनीं विचारलं, ‘ गुप्त–दान करावं म्हणतोस ? ’

सदानंदानं कसलंच उत्तर दिलं नाहीं. त्याची निःस्वार्थ दया बघून हरमोहनबाबूंनाही स्वतःची लाज वाटली. परंतु ते पक्के व्यवहारी गृहस्थ होते; तो भाव मनात जास्त वेळ टिकूं न देतां शुष्क हास्य करून म्हणाले, ‘ सदानंद, तुझी इच्छा गुप्तदनाच करायची आहे. मीही तिचा स्वीकार गुप्त रूपानेंच करीन; त्याबद्दल तूं काळजी करूं नकोस. ’ त्यांना नमस्कार करून आनंदानें सदानंद तिथून निघून गेला.



शुभदाला कळलं, हारानबाबूला समजलं आणि खुद्द छलनामयीनं ऐकलं . सदानंदाच्या प्रयत्नामुळं शारदाचरणशीं तिचं लग्न होणार आहे. सदानंद हा शुभदाचा पूर्वजन्मींचा मुलगा असावा असं मत ही बातमी ऐकतांच रास-

मणानं जाहीर केलं. ही गोष्ट सदानंदाला कळली तेव्हां तो कांहींच बोलला नाहीं. निदान त्यानें प्रतिवाद तरी केला नाहीं.

पुष्कळशा भानगडींत पडल्यामुळें आत्याचा जमीनजुमला पाहायला जाण्याची त्याला सवड झाली नव्हती; परंतु आतां वेळ मिळतांच त्यानें आपला बेत शुभदाला कळवला आणि शुभदानें पण त्याला सम्मति दिली. नंतर एके दिवशीं सामानसुमान बांधून श्रीमान् सदानंद हे विदेश-यात्रेला घराबाहेर पडले. शुभदाचा परिवार आतां त्याचा परिवार होऊन गेला होता त्यामुळें निघतांना त्या परिवाराची नीट व्यवस्था लावून आणि लग्नापूर्वीं ज्या गोष्टींची तयारी करावी लागते त्या शुभदाला नीट समजावून सांगून तो तिथून निघाला. आत्याच्या गांवीं जाऊन तिच्या जमीन–जुमल्याची माहिती करून घेऊन त्यानें त्याची चांगल्या प्रकारें वासलात लावली. अर्थातच तो जमीन–जुमला कुणाला तरी विकून एका पंधरवड्यांत तो परत हलुदपुरला आला. हलुदपुरला परत आल्यानंतर हरमोहनबाबूंशीं त्यानें विवाहासंबंधीं कागदपत्र केले, दागिने बनविले आणि तिथी–निश्चय केला. ह्या सगळ्या गोष्टी झाल्यावर सवड मिळतांच त्यानें शारदाचरणची भेट घेतली. इतके दिवस एकांतांत त्याच्याशीं गप्पा–गोष्टी करायला त्याला वेळ मिळाला नव्हता. आज फार दिवसानंतर दोघांनाही एकमेकांना भेटायची इच्छा झाली होती त्यामुळें हातांत हात घालून ते गंगेच्या किनारीं येऊन बसले.

बसल्यानंतर शारदानं विचारलं,

‘ सदानंद बाळपणची गोष्ट तुला आठवते ? ’

‘ थोडीशी आठवण आहे. ’

‘ त्या वेळीं मी कुणावर तरी अतिशय प्रेम करीत होतो आठवते तुला ? तेव्हां दिवस–रात्र–एकच गोष्ट माझ्या मनांत घोळत असे आणि कितीतरी सुखस्वप्नं मी तुझ्यापुढें येऊन सांगत होतो. मझ्यावर कुणी रागावलं तर तुझ्याजवळ येऊन रडत असे, तेव्हां तूं हंसून सगळ्या गोष्टी उडवून तरी लावीत होतास नाहींतर माझी थट्टा तरी करीत होतास—आठवतात ना तुला ह्या सगळ्या गोष्टी ? ’

' कां आठवणार नाहींत ? जरूर आठवतात ! ह्या गोष्टी घडून सात-आठ वर्षे झालीं असलीं तरी अजून त्या कालच घडल्यासारख्या वाटतात ! परंतु तुझी थट्टा मात्र मी कधींच केली नाहीं ! '

' तूं माझी थट्टा करीत आहेस असंच मला वाटत असे. ब ऽ ऽ रं ! कांहीं कां असेना ज्या दिवशीं तिनं माझ्या संबंधीं तोंडून बोलणें बंद केलें त्या दिवशीं रात्रीं तुझ्याकडे येऊन मी किती रडलो हेंही तुला आठवतं ना ? '

' हो आठवतं ! '

सदानंद दुःखी होऊन विचारांत गढून गेला, सदानंदांत झालेला हा बदल शारदाच्या लक्षांत आला नाहीं; त्यानें जवळच एकीकडे बोट दाखवून म्हटलं, ' तिथं ती बुडून मेली ! '

सदानंदाला शारदाचे शब्द ऐकू गेले नाहींत. गंगेत एक नौका शीड फुगवून चालली होती, तिच्याकडेच विचारांत गढून तो सारखा पाहात होता.

शारदानं पुन्हां म्हटलं, ' तिथंच ललना बुडून मेली आहे. '

या वेळीं मात्र सदानंदानं तोंड वळवून विचारलं, ' कुठं ? '

' त्या-त्या ठिकाणीं. '

' हें तुला कसं माहीत झालं ? '

' त्याच ठिकाणीं तिची साडी पडलेली होती. '

सदानंद एकदम उठून उभा राहात म्हणाला, ' चल तर मग आपण ती साडी पाहूं. '

शारदानं हंसून म्हटलं, ' साडी काय आतांपर्यंत तिथंच पडलेली असणार ? '

' मग नुसतीच ती जागा आपण पाहून ठेवूं. '

दोघेही त्या जागीं जाऊन उभे राहिले. सदानंदानं पाण्यांत उतरून आपल्या डोक्यावरून व तोंडावरून पाणी फिरवलं आणि मग तो पूर्वीच्या जागीं जाऊन बसला.

' सदानंद, मला आतां मोठा पश्चात्ताप होतो आहे. '

' कां ? '

'कधीं कधीं मला असं वाटतं कीं मीच तिला मारलं आहे.'

'कां ?'

'तिच्या आयुष्याची घटका भरली होती कीं नाहीं हें देवालाच माहीत, परंतु मला असं अजूनही वाटतं कीं तिच्याशीं मी लग्न केलं असतं तर ती आज जिवंत असती.'

सदानंदानं एक दीर्घ निश्वास सोडून म्हटलं, 'तिचा मरायचा योगच होता. तो कांहीं केलें तरी टळणार होता थोडाच ? तुझा त्यांत काय दोष ?'

'हें मला माहीत आहे, परंतु तिची इच्छा पूर्ण केली असती तर आज माझं तिच्याशीं लग्न होऊन गेलं असतं.'

सदानंदानं हंसून म्हटलं, 'जातीला अंतरला असता ना ?'

शारदानं विचार करून म्हटलं, 'हो, अंतरलों असतो खरा.'

'मग तूं काय केलं असतंस ?'

शारदाचे डोळे पाण्यांनीं भरून आले. त्यानं गदगदीत कंठानं म्हटलं, 'हां, मी तरी काय केलं असतं म्हणा ! आतां मनाला जो पश्चात्ताप होतो आहे तो झाला नसता.'

सदानंदानं दुसरीकडं पाहात म्हटलं, 'हळूहळू विसरून जाशील सगळं.'

'तिची शेवटची इच्छा जरी मी पूर्ण केली असती तर किती बरं झालं असतं !'

'कसली इच्छा ?'

'तिनं म्हटलं होतं—एका दरिद्री कुटुंबाची लाज राखा. छलनामयीशीं लग्न करा.'

सदानंदानं त्याच्या तोंडाकडं पाहात विचारलं, 'छलनामयीशीं तूं लग्न करणार नाहींस आतां ?'

'लग्न तर मी करीनच, परंतु तिच्या शब्दाला मी मान दिला असता तर—'

'दिल्यासारखाच नाहीं का ?'

'हो, तिच्या शब्दाला मी मान दिला असं एका तऱ्हेनं जरूर म्हणतां येईल, पण—बरं, सदानंद, बाबांची सम्मत्ती तूं कशी मिळवलीस ?'

सदानंदानं हंसून म्हटलं, 'छलनाशीं लग्न करायची तुझी इच्छा आहे असं मी त्यांना सांगितलं.'

'बस्सं, एवढंच ?'

'आणखी काय ?'

'बाबांना मी ओळखत नाहीं का ?'

सदानंदानं पुन्हां हंसून म्हटलं, 'तर मग तूं विचारतोस काय मला ?'

'किती रुपये घेतले हें कळेल तर बरं.'

'कळून तुला काय करायचं आहे ?'

'सदानंद, हें पापाचं धन आहे.'

'तुझं जीवन सदैव सुखी होईल असा मी आशिर्वाद देतों.'

'वेळ आली की हा पैसा मी तुला परत देईन.'

'बरं.'

एवढं बोलून ललनाचें लुगडें जिथें पडलें होतें तिथें सदानंद येऊन उभा राहिला. कांहीं क्षण तसाच तो उभा होता. नंतर खालीं वांकून तिथली माती तो आपल्या हातानं गोळा करूं लागला. सदानंदाचं तें कृत्य पाहून शारदानं विस्मय–चकित होऊन विचारलं, 'सदानंद , हें काय करतो आहेस तूं ? संध्याकाळच्या वेळेला माती कशाला गोळा करतोस ?'

सदानंदानं खूप जोरानं हंसून म्हटलं, 'वेडेपणाच हा !'

शारदाला पहिल्यांदा असंच वाटलं. तो म्हणाला, 'वेडेपणा करतो आहेस असं मी म्हटलं नाहीं.'

'तूं कशाला म्हणायला हवास ? मी स्वतःच म्हणतों आहें.'

'नाहीं, नाहीं. खरं सांगा, त्या मातीचं काय करणार आहेस तू ?'

'आजकाल मी घरीं महादेवाची पूजा करीत असतों; घरांत गंगेची माती नाहीं म्हणून हीं गोळा करून घरीं नेतो आहे मी.'

शारदाचरण उभ्या उभ्यानेंच सदानंदाच्या त्या कृतीकडे पाहात होता.

सदानंदानें माती गोळा करून तिचा एक गोल पिण्ड तयार केला. तो पिंड गंगेच्या पाण्यांत फेंकून देऊन शारदाच्या जवळ येऊन उभा राहात तो म्हणाला, ' चल, शारदा, घरीं जाऊ आतां. '

' सदानंद काय केलंस हें तूं ? '

' डोळ्यांनींच पाहिलंस ना तूं ? '

' महादेवाच्या पूजेसाठीं माती गोळा केलीस ना ? '

' नाहीं. मी महादेवाची पूजा यापुढें करणार नाहीं. '

' कां ? '

' सांगेन कधीं तरी. '

त्यानंतर दोघेही आपापल्या वाटेनें घरीं निघून गेले.

घरी आल्यानंतर सदानंदानं स्वतःला एका खोलींत कोंडून घेतलं.

रात्रीं जेवायला बोलवायला रासमणी आणि छलना आली तरी सुद्धां त्यानें दरवाजा उघडला नाहीं. शुभदा स्वतः आली. तिनं कितीतरी हांका मारल्या तरी पण त्यानं खोलीचं दार उघडलं नाहीं. शेवटीं तो झोंपी गेला असेल असे समजून शुभदा परत गेली.

दुसऱ्या दिवशीं उजाडल्यानंतर परत त्यानें आपल्या नित्य क्रमाला सुरुवात केली, परंतु दिवसें दिवस तो बदलत चालला होता हें कुणाच्याच लक्षांत आलं नाहीं. हळूं हळूं छलनेच्या लग्नाची तिथी येऊन ठेपली. त्या दिवशीं सगळ्यांच्याच चेहऱ्यावर आनंद होता. सगळ्यांचेच चेहरे फुलून उठले होते. सदानंदाला बसायला फुरसत नव्हती आणि हारान मुखर्जींच्या आरडा ओरडीला अंत नव्हता. रासमणीच्या डोळ्याचं पाणी त्या दिवशीं खेळत नव्हतं. जे कुणी घरीं येत त्यांच्यासमोर तो ललनेची आठवण काढून डोळ्यांतून पाणी काढीत. आलेली माणसंहि त्यांत भाग घेत. फक्त शुभदाच काय ती धीरगंभीर आणि शान्त होती.

हळू-हळू संध्याकाळ झाली, वाजंत्री व चौघडे वाजूं लागलीं आणि मोठ्या समारंभानं, थाटामाटांत शुभ मुहुर्तावर छलनामयीचं लग्न पार पडलं.

त्या दिवशीं सगळ्या गांवात कंजूष हरमोहनच्या उदारपणाचा बोलबाला झाला. म्हाताऱ्याच्या हृदयांत अपरंपार दया साठविलेली आहे हें त्यांच्या शत्रूनींही त्या दिवशीं मान्य केलं.

त्याच्या तोंडावर जर कुणी त्याची प्रशंसा करूं लागला तर तो संकोचून म्हणे—'काय करूं, बाबा? एकुलता एक मुलगा. त्याची इच्छा तर लग्न करायची मी कशाला आड येऊं? सगळ्या गांवांत आमचंच एक घर, हारानच्या कुटुंबियांचा शरीरसंबंध जडून येईल असं. या सगळ्या गोष्टींचा आणि शेजारधर्माचा विचार करूनच मी ह्या लग्नाला सम्मति दिली.'

आपल्या वडिलांचे हे शब्द ऐकून भुंवया चढवून आणि तोंड फिरवून शारदा स्वस्थ बसत असे.



कामांचा पुढ्यांत ढीग पडला होता—जिवापाड मेहनत करून तीं एकदांची सगळीं उरकलीं म्हणजे विश्रांतीचा आणि सुखाचा निःश्वास सोडतांना मजा वाटते. पण किती? दोनचार दिवसच. नंतर त्यांतली मजा निघून जाते. आणि स्वस्थ बसून रहाणं मनाला प्रशस्त वाटत नाहीं.

छलनामयीचा विवाह केल्यानंतर आणि हरमोहन बाबूला गुप्त रीतीनें पैसे दिल्यानंतर खुनाच्या अपराधांतून मुक्त झालेल्या माणसासारखं सदानंदाला हायसं वाटलं आणि त्याने दोनचार दिवस बिछान्यावरच लोळून काढले. परंतु त्यानंतर बिछाना अंगाला खुपूं लागतो, उशा डोक्याला दगडासारख्या कठीण

लागतात आणि खालींत अंधार पसरलेला आहे असा सदानंदाला भास होऊं लागला. सदानंद खोलीच्या बाहेर पडला, त्यावेळीं जवळ जवळ संध्याकाळ होऊन गेली होती. दिवसभर जी सारखी पाऊसाची झिमझिम् चालू होती ती अजून थांबली नव्हती. काळे काळे ढग हलक्या हवेमुळं दोनचार पावलं पुढं मागं होत आहेत परंतु सर्वथैव ते नाहींसे होणार नाहींत असंच सदानंदाला वाटलं. छत्री उघडून तो घराबाहेर पडला. पुष्कळ वेळपर्यंत तो रस्तो-रस्तीं भटकला. कपडे ओले चिम्ब झाले आणि गुडघ्यापर्यंत पाय चिखलानं माखले. नंतर स्वारी हारानचंद्र मुखर्जींच्या घरांत घुसली.

शुभदा स्वयंपाकघरांत होती. तिकडे तो गेला नाहीं. रासमणि शेजारीं पाजारीं कुठंतरी बसायला गेली होती. तिचीही त्यानें वास्तपुस्त केली नाहीं. पाय धुवून, थोडंसं इकडं तिकडं करून तो सरळ माधवचन्द्राच्या खोलींत गेला आणि त्याच्याजवळ जाऊन बसला.

कितीतरी दिवस झाले माधवचंद्राचा समाचार घेतला नाहीं. त्याचें कसं काय चाललं होतं हें सांगणं आवश्यक आहे. ललना निघून गेल्यानंतर माधव-चंद्र शहाणा होत चालला होता. एखाद्या वयोवृद्ध माणसाप्रमाणं कुठल्याही गोष्टीवर विचार करून तो आपलं मन प्रकट करीत असे, आणि आजकाल खाण्याच्या बाबतींतही हट्ट करीत नसे. कित्येक दिवस तो कुणाशींच बोलत नसे. एखाद्या ब्रह्मज्ञान्याप्रमाणें एकावर एक उश्या रचून त्यांच्या सहाय्यानं गंभीर चेहरा करून आपल्याच विचारांत मग्न होऊन बसत असे. अशा वेळीं आल्यागेल्याकडे त्याचें मुळींच लक्ष नसे.

आजही तो तसाच बसला होता. सदानंद जवळ येऊन बराच वेळ उभा राहिला. नंतर माधव भानावर आला.

'सदा भैय्या, आजकाल तूं माझ्याकडे येत कां नाहींस ?'

'माझ्यामागं कितीतरी कामं होतीं, बाळ !'

'सगळीं उरकलीं ?'

'हो. झालों मोकळा एकदांचा—'.

'धाकटी आक्का परत केव्हां येईल आतां ?'

‘ तीनचार दिवसांनीं येईल ती. ’

‘ हें पाहा, सदादादा, पुष्कळ दिवस तुला एक गोष्ट सांगायची होती मला. परंतु अजूनपर्यंत ती सांगता आली नाहीं. ’

‘ कां बरं ? ’

‘ तुझी माझी एकांतांत गांठ पडत नव्हती म्हणून. ’

सदानंदानं त्याच्याजवळ बसून विचारलं, ‘ एकांतच कशाला हवा माधव ? ’

‘ दादा, फक्त तुझ्या जवळच ती गोष्ट सांग, असं आक्कानं मला बजावलं आहे. ’

‘ कुणी, माधव ? ’

‘ ललना आक्कानं दादा ! ती इथून गेली त्यावेळीं तूं इथं नव्हतास. परत आल्यानंतर ती गोष्ट सांग असें सांगून ती निघून गेली. ’

सदानंद त्याच्याजवळ आणखिन् सरकून बसला. त्याच्या अंगावरून हात फिरवीत त्यानं विचारलं, ‘ ती कां निघून गेली, माधव ? तिला कुणी बोललं तर नव्हतं ना ? ’

‘ छेः कुणीच नाहीं. ’

‘ मग ती कां निघून गेली ? ’

‘ मी पण जाणार आहें. ’

‘ कुठं ? ’

माधवनें थोडसं हंसून म्हटलं, ‘ दुसऱ्या कुणालाच माहित नाहीं. फक्त मला आणि आक्कालाच तेवढं माहीत आहे. ती आधीं निघून गेली आहे तिथं सगळं ठाकठीक करायला. मग ती मला घेऊन जाणार आहे. तिथं आम्ही दोघंही मजेंत राहूं ’

सांगतां सांगतां माधवचंद्राचा चेहरा प्रफुल्लीत होऊन गेला.

त्यानं थोडसं हंसून सदानंदाकडे पाहात म्हटलं, ‘ आक्का यइल नी मला खात्रीनं घेऊन जाईल. ’

सदानंद पुष्कळ वेळ स्वस्थ बसून राहिला.

नंतर त्यानं विचारलं, ‘ केव्हां ? ’

‘ माझी वेळ येईल तेव्हां. ’

‘ माधव, ह्या गोष्टी तुला कुणी शिकविल्या ? ’

‘ मोठ्या आक्कानं ’

‘ तुला घेऊन घेऊन जाईन असं तिनं म्हटलं होतं ? ’

‘ हो. ’

‘ आणि समज ती घेऊन गेली नाहीं तर ? ’

‘ कां नाहीं घेऊन जाणार ? खात्रीनं घेऊन जाईल. ’

‘ समज, ती घेऊन नाहीं गेली तर तूं एकटा जाशील ? ’

माधव थोडासा खिन्न झाला.

त्यानं विचार करून म्हटलं, ‘ कसं सांगूं ? ’

सदानंदही गप्प बसला.

माधवला काय वाटलं कुणास ठाऊक, त्यानें पुन्हां प्रश्न केला,

‘ सदादादा, तिथं एकटयाला जातां येतं कारे ? ’

‘ कां नाहीं ? तुझी आक्का एकटीच गेली ना ?

‘ तर मग मीही जाईन ? ’

‘ बरं. ’

माधव विचार करूं लागला. नंतर कांहीं वेळानें दुःखी स्वरांत म्हणाला,

‘ पण मी कसा जाऊं ? माझ्या अंगांत आतां थोडीसुद्धां शक्ति राहिली नाहीं. ’

सदानंद त्याच्या तोंडाकडे पाहात होता आणि तो तसाच बोलत होता.

‘ आक्का गेली त्यावेळीं माझ्या अंगांत थोडीतरी शक्ति होती पण आतां मुळींच नाहीं. कसं जातां येईल मला ? उभं सुद्धां राहवत नाहीं...मला आतां. मग इतक्या लांब मी कसा जाऊं ? ’

सदानंदाचे डोळे पाण्यानं भरून आले. अंधारांत माधवला तें दिसलें नाहीं. माधवची प्रकृती दिवसेंदिवस खालावत चाललेली सदानंदाला दिसत होतं.

इतकंच नव्हे तर माधव हा फारच थोड्या दिवसांचा सोबती आहे याबद्दल त्याची खात्री होऊन चुकली होती.

त्याच्या मनांत शुभदाचा विचार आला; ललनेचा विचार आला, तो संकटांत सांपडला. माया—ममतेंत गुरफटल्यामुळें पूर्वीप्रमाणें आपले दिवस निश्चिंतपणांत जात नाहींत हे त्याला कळून आलं. पूर्वीसारखं तो गात नव्हता, स्वच्छंदपणें भटकत नव्हता आणि आपल्याच लहरींत आणि मस्तींत राहत नव्हता. पूर्वी तो सुखी होता, पण हल्लीं तो काळजींत होता. पूर्वी तो विरागी होता, हल्लीं संसारी झाला होता.

त्यानें डोळ्यांतले अश्रू पुसले. सदानंदाला पहिल्यांदाच आज कळून आलं. जिवंत राहण्यांत कसलंच सुख नाहीं; जिवंत आहे तो दुःखी आहे आणि मेला तो सुखी; त्या दिवशीं रात्रीं घरीं गेल्यानंतर त्यानें पुष्कळ विचार केला जातांना आपल्याला ललना विसरली नव्हती हें त्याच्या लक्षांत आलं माधवचंद्र आतां फार दिवस काढीत नाहीं हेंही त्याला कळून चुकलें. मग शुभदाची काय वाट ? त्याला वाटलं. ललना मरून गेली ती आपलीं सारीं दुःखं आपलीं सगळीं संकटं त्याच्याच शिरावर लादून.

माधवचंद्रही त्या दिवशीं पूर्वीप्रमाणें निश्चिंत नव्हता. त्याच्या मनाला घोर लागून राहिला. इतके दिवस ललना येऊन आपल्याला घेऊन जाईल या कल्पनेंत तो निश्चिंत होता, परंतु सदादादानं दुसरंच सांगितल्यामुळं तो बेचैन झाला होता. त्याच्या मनांत विचार येत होता. आपल्या अंगांत आतां मुळींच शक्ति उरली नाहीं. एकटंच कसं जायचं तिथं ? उलटसुलट विचारांची पुष्कळ भवति न भवति करून तो एकदांचा निश्चयावर येऊन ठेपला. नाहीं आक्का कधींच खोटं बोलणार नाहीं; ती येऊन खात्रीनं मला घेऊन जाईल—हा विचार मनांत ठाम झाल्यानंतर माधवचन्द्र शांतपणें झोपीं गेला.

# ९

असेच आणखिन कांहीं दिवस निघून गेले. छलना माहेरीं परत आली, शेजारींपाजारीं पुन्हा एकदां मुलीला आाण जावयाला पहावयाला जमले. हास्य-विनोदाला भरती आली, हरमोहन स्वत: व्याह्याच्या घरीं आला, सगळ्यांना गोड वाणीने संतुष्ट करून आणि जातांना विहिणीच्या नमस्काराचा स्वीकार करून निघून गेला. कमरेला शुभ्र चादर गुंडाळून घेऊन आणि ब्राम्हणपाड्याच्या प्रत्येक दुकानावर पा ीपाळीनं आसन ठोकून हारानचंद्रानें किती तरी लोकांना चकित करून सोडलें. अशाच तऱ्हेचे किती तरी प्रसं । घडून आले.

माधवचंद्राची प्रकृति आज फारच बिघडली होती. बिछान्यावर तो सारखा तळमळत होता. त्याच्या शेजारीं, उशाशी आणि पायथ्याशीं रासमणी कृष्णा ब्राह्मणी आाणि छलना अशी सगळीजणं बसलीं होती. शुभदा तेवढी तिथं नव्हती. ती स्वयंपाक घरांत आपले डोळे पुशात पुशीत स्वयंपाक करीत होती. सदानंद डॉक्टर आणायला गेला होता आणि हारानचंद्र आतां येतो म्हणून जो बाहेर गेला तो तीन तास होऊन गेले तरी अजून परत आला नव्हता. सगळेजण एकमेकाच्या तोंडाकडे पाहात होते आणि कृष्णा ब्राम्हणी माधवच्या अंगावर हात फिरवीत डॉक्टराची वाट पहात होती. शेवटीं अंधार पडायच्या अगोदर डॉक्टर येऊन पोंहचले. आज सहा सात दिवस ते दररोज येऊन बघत असत. रोग्याची प्रकृति दिवसेंदिवस न सुधारतां उलट बिघडतच चालली होती आणि तो आतां वांचणार नहीं ह्याची खात्री डॉक्टरांना झाली होती. त्यांची आज यायची इच्छा देखाल नव्हती परंतु सदानंदाच्या जुलुम—जबरदस्तीमुळं ते आले होते.

डॉक्टरनीं माधवची प्रकृती तपासली. नंतर बाहेर येऊन, सदानंदाला बोलावून त्यांनी म्हटलं, ' सदानंदबाबू, हा मुलगा कदाचित् उद्यांची सकाळ पाहणार नाहीं. '

सदानंदाला हें माहीत होतं.

रात्र बरीच उलटून गेल्यानंतर हारानचंद्र घरीं परत आला. चोराप्रमाणें माधवाच्या खोलीबाहेर कांहीं क्षण उभं राहून, नंतर आंत हळूच डोकावून त्यानें चौकशी केली, ' आतां कसं आहे माधवचं ? '

कुणीच उत्तर दिलं नाहीं, फक्त शुभदा त्याला पाहतांच बाहेर आली आणि जेवणाचं ताट त्याच्या पुढं ठेवून बसली.

हारानबाबूनें प्रश्न केला, ' माधवची प्रकृति आतां कशी आहे ? '

' फारशी चांगली नाहीं. '

' चांगली नाहीं ? ' मग कांहीं क्षण थांबून म्हणाले, ' मलाहि बरं वाटत नाहीं. '

कसला विचार करून त्याने हें म्हटलं आणि कोणत्या हेतूनं त्यांनीं स्वतःच्या प्रकृतीबद्दल गोष्ट काढली सांगतां येत नाहीं. आणि त्या गोष्टींत किती तथ्य होतं, हेंहि मला माहीत नाहीं. परंतु ते शब्द शुभदाच्या कानांत शिरले नाहींत हें मात्र नक्की. हारानचंद्र मनांतल्या मनात अतिशय चिडला. बायकोच्या पुढे प्रकृति चांगली नाहीं हें बोलल्यानंतर तिनं सहानुभूतीचे चार शब्दसुद्धां तोंडावाटे काढूं नयेत याचं त्यांना आश्चर्य वाटलं, नव्हे, त्याला तो स्वतःचा अपमान वाटला. तो नशा—पाणि करून आला होता त्यामुळें अपमानाच्या त्या लहानशा अंकुराचा दोन—चार क्षणांतच भला मोठा वृक्ष बनला. पुढच्यातलं ताट पायानं लाथाडून हारानचंद्र म्हणाला ' मी आणखिन् खाणार नाहीं, मला काय मरायचं आहे ? ' ताटांवरनं उठून, चूळ भरून आपल्या खोलींत येऊन तो विधीपूर्वक झोपीं गेला. हारानचंद्र आपल्या खोलींत गेल्यानंतर शुभदा हात धुंवून माधवच्याजवळ येऊन बसली. शुभदाला आलेली पाहतांच कृष्णा ब्राह्मणी म्हणाली, ' हारान कुठं आहे ? '

' त्यांना बरं वाटत नाहीं, पडले आहेत. '

'थोडा वेळ गप्प बसून कृष्णा ब्राह्मणीनं म्हटलं, 'मनाची नसली तरी जनाची तरी लाज हवी माणसाला.'

हळूहळू रात्र सरूं लागली. कृष्णा ब्राह्मणीनं मृत्यु–शय्येच्या शेजारीं बसून कितीतरी रात्रीं जागून काढल्या होत्या आणि किती तरी मृत्यू तिनं आपल्या डोळ्यांनीं पाहिले होते ! माधव शेवटचे श्वास घेतो आहे असं तिला वाटलं.

थोड्या वेळानं माधवनं म्हटलं, 'डोकं फार दुखतंय माझं.'

कृष्णा आत्या त्याच्या डोळ्यावरनं हात फिरवूं लागली.

थोडा वेळ थांबून त्यानं पुन्हां म्हटलं, 'पोटसुद्धां दुखतं आहे.'

तिथं बसलेल्या प्रत्येकानं एकमेकाच्या तोंडाकडं पाहिलं; कांहीं काळ तिथं स्तब्धता पसरली. सगळींच म्लान मुखानं शेवटल्या क्षणाची वाट पाहात बसलीं.

आणखिन् थोडा वेळ गेल्यानंतर क्षीण स्वरांत माधवनं म्हटलं, 'तहान लागली आहे.'

आत्यानें दुधाऐवजी गंगोदक त्याच्या तोंडांत घातलं.

अतिशय कष्टानं सगळंच्या सगळं ते गंगोदक माधवनं पिऊन टाकलं.

हळू हळू श्वास वाढत चालला. कृष्णा ब्राह्मणीला नाडीची परिक्षा होती. पुष्कळ वेळपर्यंत त्याचा हात हातांत धरल्यानंतर सदानंदास बोलावून ती म्हणाली, 'आतां त्याला जमिनीवर घ्यायला पाहिजे.'

सदानंद गप्प बसला.

रासमणिच्या कानांवर ते शब्द पडले. क्षीण आणि रडक्यां स्वरांत तिनं म्हटलं, 'आतां काय पाहतोस बाबा सदानंद ?'

माधवचन्द्राचं प्राणहीन शरीर खालीं जमिनीवर ठेवतांच सगळ्यांनीं एकच आकांत केला.

बराच वेळ गेल्यानंतर माधवनें पुन्हां एकदां तोंड उघडलं, कृष्णा आत्यानं पूर्वीप्रमाणेंच त्यांत गंगोदक घातलं. माधवला जणू थोडी शक्ति आली,

त्यानं डोळे उघडून हंसून म्हटलं, ‘ सदा दादा......आक्का......आक्का...
...आली आहे. ’

छलनामयी जवळच बसली होती. माधवचे ते शब्द ऐकतांच भितीनं आणि दुःखानं ती आपल्या आईला बिलगली.

कांहीं क्षणानंतर माधवचंद्राची तळमळ जास्तच वाढली. त्याचा श्वास जोरानं चालू झाला आणि त्याने हातपाय झाडायला सुरवात केली. माधव-चन्द्राची ती अवस्था पाहून कृष्णा आत्यानं रडक्या स्वरांत म्हटलं, ‘ आतां तोंडाकडे काय पाहतां ? तुळशीच्या कट्ट्यावर......’

सगळ्यांनीं एकदमच आकांत मांडला. रडक्या भेकण्याचे स्वर ऐकून हारानबाबूंची झोंप उडाली. बाहेर येऊन पाहतो तों माधवचं शव बाहेर आणीत होते. त्यानेंही हंबरडा फोडला आणि मुलाचें शव घेऊन तुळशीच्या कट्ट्यावर जाऊन बसला. तुळशीच्या कट्ट्यांवर बसतांच त्यानें मोठमोठ्यानें हांक मारायला सुरवात केली, ‘ माधव......अरे माधव...... ! ’

# १०

बादशाही थाटाच्या महालांत राजशाही कोचावर स्वरूपसुंदरी मालती विराजमान होऊन सगळ्या खोलीची शोभा वाढवीत बसली होती. जवळच एका संगमरवरी स्टुलावर चांदीचा दिवा जळत होता आणि त्या दिव्याच्या प्रकाशांत मालती एक पुस्तक वाचीत बसली होती. मालती ज्या खोलींत बसली होती ती एका विशेष प्रकारानं सजविलेली होती. सगळ्या जमिनीवर एक

मूल्यवान् गालीचा पसरलेला होता आणि भिंतीवर नाना प्रकारची सुरेख चित्रं काढलीं होती. खोलीची शोभा आणखिन् वाढविण्यासाठीं बिलोरी कांचांचीं नाना रंगाचीं हंड्याझुंबरें लटकावलेलीं होतीं आणि त्या बिलोरी कांचांतून परावर्तित होऊन लाल, हिरवी, आणखिन् इतर रंगाची किरणं खोलीभर पसरलेली होती. दोन्ही बाजूनीं मोठमोठे आरसे लावलेले होते. त्यांतून प्रकाश किरण परावर्तित होऊन खोली अधिक प्रकाशमान दिसत होती. आरशाच्या जवळच संगमरवरी दगडाचं एक टेबल ठेवलं होतं.

अशा त्या राजेशाही महालांत जिवंत सुवर्ण प्रतिमेप्रमाणें मालती बसली होती. नाना प्रकारच्या साज शृंगारांने आपलं सौंदर्य तिनं हजारपटीनं वाढवून ठेवलं होतं, परंतु मंत्रमुग्ध नेत्रानीं ते सौंदर्य पाहायला तिथं कुणी हजर नव्हतं म्हणून मालती वाचनांत तल्लीन होऊन गेल्यासारखी दिसत होती. परंतु ती खरोखर वाचत होती का ? वाक्यावरून आणि शब्दांवरून तिचे डोळे फिरत होते आणि तशींच पानावर पानं उलटलीं जात होती हे खरं, परंतु वाचलेल्यापैकी तिच्या बुद्धींत किती शिरत होतं हें मात्र सांगतां येत नाहीं. कारण तिच्या गालावरचे सुकलेल्या अश्रूंचे डाग पाहिले म्हणजे असं वाटतं कीं थोड्या वेळां-पूर्वींच ती रडत असावी. ह्या सुख—स्वर्गात ती रडत कां होती हे कुणाला कळणार ? परंतु ती रडत होती हें मात्र निश्चित. वस्तुतः रडं आवरण्यासाठींच तिनं हातांत पुस्तक घेतलं होतं. मालतीच्या रडण्यावरनं ती सुखांत नव्हती असं अनुमान काढायला कांहींच हरकत नाहीं. पुस्तक बंद करून तिनं टेबलावर फेकून दिलं, आणि गुपचुप कोचांवर आपलं डोकं टेकून ती स्वस्थ बसून राहिली. पुन्हां तिचे डोळे भरुन आले. परंतु यावेळीं आसवांना आवरण्याचा तिने प्रयत्न केला नाहीं. एकेक अश्रूबिंदू कोचांवर गळून पडूं लागला.

अशा स्थितींत बराच वेळ गेल्यानंतर सुरेंद्रबाबूंनी खोलींत प्रवेश केला. खोलीभर जाड गालीचा पसरला होता त्यामुळे सुरेंद्रबाबूंच्या पायांचा आवाज मालतीला ऐकू आला नाहीं त्यामुळें ती पूर्ववत अश्रू गाळीतच बसली होती. सुरेंद्रबाबू आश्चर्यचकित झाले. मालती रडत त्यांना दिसली. कांहीं क्षण निस्तब्ध राहून सुरेंद्रबाबू मालतीजवळ येऊन म्हणाले,

‘ मालती ! ’

मालतीनं चमकून त्यांच्याकडे पाहात म्हटलं, ‘ काय ? ’

सुरेन्द्रबाबूंनीं मालतीजवळ बसून तिचे हात आपल्या हातांत घेत म्हटलं, ‘ मालती तूं पुन्हां रडत होतीस ? ’

रडताना मालतीला पकडलें होतें, त्यामुळें तिला नाहीं म्हणतां येईना. ती स्वस्थ बसून राहिली.

सुरेन्द्रबाबूंनी विचारलं,

‘ कां रडत होतीस ? ’

मालती गप्पच.

कांहीं वेळ सुरेन्द्रबाबू बोलले नाहींत.

त्यानंतर तिचे हात आपल्या हातांत अधिक आवळून त्यांनीं म्हटलं,

‘ तुला सुखी करतां आलं नाहीं याबद्दल मला वाईट वाटतं. ’

उत्तर देण्याची मालतीला इच्छा होती, परंतु उत्तर काय द्यावं हे तिला सुचत नव्हतें. तिच्या हातून आणखी एक गोष्ट घडली नाहीं. पुन्हां कधी रडणार नाहीं अशी प्रतिज्ञा तिनं मनांतल्या मनांत नुक्तीच केली होती, परंतु कांहीं केल्या तिला आपल्या अश्रूंवर ताबा ठेवता आला नाहीं.

सुरेन्द्रबाबू पुढें म्हणाले, ‘काय केलं म्हणजे एखादा माणूस सुखी होईल, हें कुणालाच कळत नाहीं. परमेश्वराला तरी हें माहीत आहे कां नाहीं कुणास ठाऊक ? समाधानासाठीं, सुखासाठीं, ह्या खोलीची इतकी सजावट केली आणि तुझ्यासारख्या देवीची त्यांत प्राणप्रतिष्ठा केली, पण काय सुख मिळालं मला ? सुखाची गोष्ट राहिली बाजूला आणि उलट दुःखच पुढ्यांत वाढलेलें दिसतें आहे. जिला सुख व्हावें म्हणून एवढा खटाटोप मी केला, तिला सुखी असलेली मी एकदाही पाहिली नाहीं. ’ असं म्हणत म्हणत त्यांनी मालतीचे हात सोडून दिले. आणि अत्यंत अधीरतेने तिचा आसवांनीं मलिन झालेला चेहरा आपल्या दोन्ही हातांनीं वर धरून विचारलं, ‘ मालती, इतके दिवस झाले, तुझा चेहरा हंसरा असा कधींच दिसला नाहीं. असंच कां चालायचं सदोदित ? ’

मालतीनं आपले अश्रु पुसून टाकले.

सुरेन्द्रबाबूंनी आपलें बोलणें पुढें चालू केलें, किती सुंदर दिसते आहेस तूं ! तुझ्यां स्वरूपानें मला किती वेड लावलं आहे हें सांगायला माझ्याजवळ शब्द नाहींत. किती उत्साहानं तुझ्यासाठीं मूल्यवान् वस्त्रं आणि दागदागिने घेऊन आलों परंतु एक क्षणभर सुद्धां तुला ते अंगावर घालतांना मी पाहिलं नाहीं. मालती, माझं तोंड सुद्धां पाहूं नये असं तुला वाटतं का ? '

मालती त्यांच्या कुशींत डोकं खुपसून रडूं लागली. सुरेन्द्रबाबूंच्या डोळ्यांतही अश्रु उभे राहिले. त्यांनीं तिच्या केसावरनं प्रेमानं हात फिरवीत म्हटलं, ' रडूं नकोस. तसंच आहे असं मी म्हणत नाहीं, पण माझ्या मनांत नाना तऱ्हेच्या शंका येतात. त्या एकदां सगळ्या बोलून टाकूं दे. तूं रागावूं नकोस. तूं जो मार्ग धरला आहेस त्याच मार्गाचा आश्रय नीच वृत्तीच्या स्त्रिया घेतात. परंतु कपडे–लत्ते, धन–दौलत यांच्याशिवाय दुसऱ्या कुठल्याहि गोष्टींत त्यांना सुख मिळत असेल असं मला वाटत नाहीं. परंतु त्यांच्यापैकीं तूं नाहींस हे मला पक्कं माहीत आहे. त्यामुळं काय केलं असतां तुला सुख होईल मला कळत नाहीं; तूं जर त्यांच्याप्रमाणं असतीस तर एव्हांना सुखी झाली असतीस......, असं म्हणत म्हणत सुरेन्द्रबाबू कांहीं क्षण गप्प राहिले. नंतर गंभीर होऊन त्यांनीं प्रश्न केला, ' मालती, तुझे पति जिवंत आहेत कां ? '

आपले पति जिवंत नाहींत हें मालतीनं मान हालवून दर्शाविलं.

' तर मग सांग, तुझ्याशीं मी लग्न केलं तर सुखी होशील तूं , सांग, सांग मला त्यांत मुळींच कमीपणा वाटणार नाहीं. '

सुरेन्द्रबाबूंचे ते शब्द ऐकतांच मालती त्यांच्या पायांवर पडली. त्यांच्या दोन्ही पायांत तिनं आपलं तोंड लपवलं. सुरेन्द्रबाबूंनी तिला वर उठविण्याचा प्रयत्न केला नाहीं, तिच्या डोळ्यांतील अश्रूंचा अभिषेक आपल्या पायांवर होतो आहे हें त्यांना कळत होतं, तरी सुद्धां त्यांनी तिला वर उचलून घेतलं नाहीं; दीर्घ निश्वास सोडीत तेही निःशब्द बसून राहिले.

अशा अवस्थेंत पुष्कळ वेळ निघून गेल्यानंतर, उदास होऊन त्यांनीं म्हटलं, ' माझी काय अवस्था झाली आहे हे त्या एका देवालाच माहीत.

तुझ्या अप्रतिम सौंदर्यानं मी वेडा झालो आहे कीं खऱ्याखुऱ्या अर्थानं मी तुझ्यावर प्रेम करितों आहे हे मला सांगता येत नाहीं; विवेकबुद्धि माझ्यांत राहिली नाहीं, चांगलं वाईट जाणण्याची माझी शक्ती नष्ट झाली आहे, हें मात्र खरं. तुझ्या एका गोड शब्दासाठीं जीव देण्याची माझी तयारी आहे. तुझं हृदय जिंकण्यासाठीं मी खोटं बोलत नाहीं; मी खरं तेच सांगतों आहे. याला ईश्वर साक्षी आहे. मी स्वतःला विसरून गेलों आहे. जाऊं देत त्या सगळ्या गोष्टी. असं तूं एकदां आपल्या तोंडानं सांग, तुझ्याशीं लग्न केल्यानं तुला सुख होईल. कीं कांहीं झालं तरी मी तें केल्याशिवाय रहाणार नाहीं. जात, कूळ, मान, सन्मान आणि एवढा मोठा वंश कशाचाच मी विचार करणार नाहीं......नाहींतर......' सुरेन्द्रबाबूंचे डोळे भरून आले होते. आणि त्यांचा कंठ दाटत चालला होता. कांहीं क्षण गप्प राहून आणि स्वतःला सावरून ते पुढें म्हणाले, ' नाहींतर मालती, आमच्या सारख्यांना दाही दिशा मोकळ्या आहेत. जेव्हां सहनशक्तीच्या मर्यादेबाहेर गोष्टी जातील तेव्हां आत्मघात करून घेऊन सरळ नरकाचा रस्ता धरीन. '

आतां मात्र मालतीला रहावेना. रडक्या स्वरांत तिनं म्हटलं, ' असले शब्द तोंडांतून काढूं नका. माझे प्राण तुम्हीच वांचविले आहेत. माझी लाज तुम्हीच राखलीत आणि तुम्हीच मला आश्रय दिलात; नाहींतर आज मी जिवंत दिसलें नसतें. मी नीच आहे, तिरस्कारास पात्र आहे. पण कृतघ्न मात्र खास नाहीं, तुमची दया, तुमचे उपकार ह्या जन्मांत तरी मी विसरणार नाहीं. उपकारांची फेड अपकारानं कशी करीन ? '

सुरेन्द्रबाबूंनीं एक दीर्घ उसासा सोडीत म्हटलं, ' उपकार केलाय कीं अपकार केलाय तें देवालाच माहीत ! मला तर कांहींच कळत नाहीं. आज महिनाभर माझ्या हृदयांत काय चाललं आहे हें मी तुला कसं सांगूं ? वाईट वाटून घेऊ नकोस. इतक्या थोड्या दिवसांत एका स्त्रीचा मी गुलाम बनलों ! हें सांगतांना मला लाज वाटते. एक......एक......तूं कुणीहि का असेनास ......तूं कशीहि कां असेनास......मी पूर्वजांचा, कुळाचा अभिमानसुद्धां सोडून द्यायला तयार झालो आहे तुझ्यासाठीं.'

मालतीनं पूर्वीसारख्याच रडक्या स्वरांत म्हटलं, 'मी तुमच्या दासीची दासी सुद्धां व्हायला योग्य नाहीं. मी अशी कोण लागून गेलें आहे कीं त्यामुळें तुम्ही एवढं सहन करावं आणि स्वतःचं इतकं नुकसान करून घ्यावं? मी जन्माचीच दुःखी आहे, इतकी दया मला ह्या जन्मांत कुठं दिसून आली नव्हती.' क्षणभर थांबली आणि पुढें म्हणाली, 'माझा शेवट इथंच होऊ दे, अशी माझी देवाजवळ प्रार्थना आहे.'

सुरेन्द्रबाबूंनी प्रेमानं तिचा हात धरून तिला आपल्या जवळ बसवून घेत म्हटलं, 'परंतु कुठल्याच तऱ्हेनं तूं सुखी होत नाहींस!'

मालतीनें डोळे पुसून म्हटलं, 'आम्ही अगदीं कंगाल आहोंत.'

'पण मीं कंगाल नाहीं. माझं म्हणून जें कांहीं आहे तें सगळं तुझंच आहे.'

'मी माझीं स्वतःची गोष्ट सांगत नाहीं.'

'मग कुणाची गोष्ट सांगते आहेस! तुझं तर कुणीच नाहीं?'

'आतां माझं कुणी आहे कीं नाहीं हे देवालाच माहीत, परंतु मी त्यांना सोडून आले तेव्हां सगळीजणं होतीं.'

'हें कसं काय? नाव बुडल्यानंतर......'

'ते सगळं खोटं होतं. नाव—बिव कांहींच बुडाली नाहीं.'

आश्चर्यानं थक्क होऊन सुरेन्द्रबाबू मालतीकडे पाहूं लागले. कदाचित् त्यांना संशय आला असावा. ही सांगते आहे सें सगळं खरं कां खोटं? परंतु तिचा निर्मल चेहरा, ते निष्पाप डोळे आणि ते चटकन् येणारे अश्रू खोटं सांगतील असं त्यांना वाटलं नाहीं. तरी पण त्यांनी म्हटलं, 'मालती!'

'काय?'

'खरं सांगतेस तूं हें?'

मालतीनं त्यांच्याकडे पाहिलं, पाहतां पाहतां तिचे डोळे आंसवांनीं तरारले.

सुरेन्द्रबाबूंनीं मनांतल्या मनांत खजील होऊन, तिचे अश्रू पुसून म्हटलं, 'मालती, आतां सगळ्या गोष्टी मला सांग पाहूं.'

मालतीनं त्यांच्या गुडघ्यांवर डोकं ठेऊन सांगायला सुरवात केली, ‘ जन्मल्यापासून दुःखाच्या कुशींतच माझं पालन पोषण झालं. माझं सगळं कांहीं होतं. बाबांनीं स्वतःच्या सामर्थ्यानुसार मला चांगलं वर पाहून दिलं होतं; परंतु मी अभागिनी. एका वर्षाच्या आंत विधवा झालें. ज्यांच्याशीं माझं लग्न झालं त्यांना फक्त एकदांच काय तें मी पाहिलं. पुढें मी माहेरीं आलें. तिथेंच माझीं जवळजवळ पांच वर्षं निघून गेलीं. माझे बाबा हलुदपूरहून एका मैलांवर असलेल्या जमिनदाराच्या कचेरींत नोकरीला होते. पगार थोडाच मिळत होता, तरी पण आमचा निर्वाह कसाबसा चालत असे. ’

बोलतां बोलतां तिचा गळा दाटून आला.

सुरेन्द्रबाबूंनीं मध्येंच विचारलं, ‘ तुमच्या घरीं त्यावेळीं कोण कोण होतं ? ’

‘ सगळीं होतीं. बाबा, आई, आत्या, आम्ही दोघी बहीणी आणि एक धाकटा भाऊ; इतकीं माणसं आमच्या कुटुंबांत होतीं. चोरीच्या अपराधामुळं बाबांची नोकरी गेली. त्या वेळेपासून दररोज भिक्षेवरच आमचा निर्वाह चालत असे. एखाद्या दिवशीं खायला मिळालं तर मिळालं, नाहीं तर उपाशी. माझी आई एक सती होती. भिक्षा मागून जें कांहीं मिळेल तेवढ्यांत ती सगळ्यांचं भागवीत असे. कधीं मधीं आमच्यामुळं तिला उपासही काढावे लागत. तरी सुद्धां तिनं कुरकुर म्हणून कधींच केली नाहीं. कधीं कधीं तर तिला तीन–तीन, चार–चार दिवस उपाशी राहावं लागे. ’ एवढं बोलून मालती हुंदके देऊं लागली.

कांहीं वेळ गेल्यानंतर स्वतःला सावरून ती म्हणाली, ‘ बाबांना कशाचीच काळजी नव्हती. गांजा, अफू खाऊन वाटेल तिथं पडून राहात आणि चार चार, पांच–पांच दिवसपर्यंत घरीं येत नसत. ’

‘ माझा धाकटा भाऊ माधव वर्षभर आजारी होता. औषध पाण्याची व्यवस्था नसल्यामुळें तो बरा होत नव्हता. त्याचं काय झालं असेल...’

मालतीनं कृष्णा ब्राह्मणीची गोष्ट सांगितली, सदानंदाची माहिती सांगितली आणि शेवटीं छलनेविषयीं बोलतांना म्हणाली, ‘ छलनामयी लग्नाला योग्य झाली होती, परंतु आम्ही गरीब म्हणून तिच्याशीं लग्न करायला कुणीच

तयार होईना. ब्राह्मण जातींत मुलीचं लवकर लग्न झालं नाहीं तर जातीस मुकावं लागतं. आमचीही तीच स्थिती होण्याच्या बेतांत आली. माझ्या आईचं जेवण–खाणं बंद झालं. तिची रात्रीची झोंप उडून गेली. तरीसुद्धां माझे बाबा बेफिकीर होते. फक्त सदानंदाचाच काय तो एक आधार होता; परंतु तोही त्यावेळेस गांवांत नव्हता, आपल्या आत्त्याला घेऊन काशीला गेला होता. बाबांची नोकरी सुटल्यानंतर हळू हळू सहा महिने असेच निघून गेले. शेजारी पाजारी किती म्हणून मदत करतील ? सदानंदानी काशीला जातांना पन्नास रुपये दिले होते. तेही खर्च होऊन गेले–पुरे, त्यावेळची स्थिती सांगवत नाहीं माझ्याच्यानं आतां.' असं म्हणून मालती पुन्हां रडूं लागली.

सुरेन्द्रबाबूंचेहि डोळे भरुन आले. आपले अश्रू पुसून त्यांनी म्हटलं, ' पुरे, राहूं दे आतां, बाकीचं पुढें कधीतरी सांग. '

मालतीनं डोळे पुसून म्हटलं, ' नाहीं, आजच मी सगळं सांगून टाकणार आहे. लोक मला सुंदर म्हणत होते; कलकत्त्याला जाऊन पैसा कमवावा असा विचार माझ्या मनांत घोळूं लागला. एके दिवशीं रात्रीं मी गंगेच्या किनारीं आले. गंगेच्या कांठाकांठाने चालत मी कलकत्त्याला पोहोंचेन असा विचार केला होता, परंतु घाटावर येऊन पाहिलं तों एक मोठी नौका शीड उभारून चालली आहे; मला पोहतां येत होतं. गुपचुप जाऊन नौकेचं सुकाणूं धरून रहावं असं मनांत आलं. कलकत्ता आमच्या गांवापासून फार लांब नाहीं असं ऐकलं होतं, परंतु नक्की किती लांब आहे हे मला ठाऊक नव्हतं. कलकत्त्याला आपण रात्रीं जाऊन पोहचूं असं मला वाटलं होतं. आणि तेव्हांच हातांत धरलेला नौकेचा दांडा सोडून द्यायचा असं मी ठरवलं होतं. पाण्यांत उतरून पोहत पोहत थोडसं लांब गेलें तोंच हाता–पायांत माझी साडी अडकली. बुडतां बुडतां मी वाचलें. मोठ्या कष्टानं मी माझ्या हातांनं साडी फेडली, ती माझ्या हातांतनं सुटून कुठें वाहून गेली कोण जाणे. त्याच वेळीं ती नौका जवळ आली; पण माझ्या हातां-पायां-तली शक्ती नष्ट झाली होती. परत जाणंही शक्य नव्हतं; शेवटीं मनाचा धडा करून नौकेचा दांडा मी हातांनं घट्ट पकडून ठेवला आणि पाण्यांत लोंबकळत राहिलें. नौका पुढें पुढें जाऊं लागली. मोठ्या धैर्यानें मी त्या दांड्याला पकडून

ठेवलं. अशा तऱ्हेनं मी बरीच लांब आलें. परत फिरावं असा विचार माझ्या मनांत पुन्हां आला, परंतु इलाज नव्हता. शेवटीं दुसऱ्या दिवशीं पहांटे बायका घाटांवर स्नानाला येतील, त्यांच्याकडून एक साडी मागून घ्यायचा मी विचार केला. मला वस्त्र–हीन पाहून त्यांना खात्रीनं दया आली असती, आणि पुढें—पुढें काय झालं हें तुम्हाला माहीतच आहे.'

मालतीची करुण कहाणी ऐकून सुरेन्द्रबाबू पुष्कळ वेळपर्यंत निःशब्द बसून राहिले. नंतर हळूं–हळूं तिला आपल्याजवळ ओढून घेऊन म्हणाले, 'ज्यांच्यासाठीं तूं एवढे कष्ट सहन केलेस त्यांच्यासाठीं कांहीं केलंस?' मालतीनं मान हालवून म्हटलं, 'नाहीं.'

'कांहीं केलं नाहींस हे मला माहीत आहे, परंतु मला राहून राहून नवल वाटतं तें हें कीं, तोंड उघडून आपल्या मनांतली गोष्ट जिला सांगता येत नाहीं तिच्या हातून एवढं मोठं साहस झालं कसं?'

मालती स्वस्थ राहून त्यांचे शब्द ऐकत राहिली.

'महिन्याला किती पैसे पाठवले म्हणजे त्यांचा संसार सुरळीत चालेल?

'वीस रुपये.'

'मग महिन्याला पन्नास रुपये तिकडे पाठवून देत जा.'

'तुम्ही द्याल ते?'

सुरेन्द्रबाबू हंसून म्हणाले, 'हो, मीच देईन. आणखिन् हवे असले तरी देईन.'

इतक्या दिवसानंतर आपल्या जन्माचं सार्थक झालं असं मालतीला वाटलं!

सुरेन्द्रबाबूंनीं पुढें म्हटलं, 'त्या बरोबरच माझं एक काम कर. माझ्याशीं लग्न कर. मी नराधम आहें खरा, पण तुझ्या निर्मळ चरित्र्याला आणि नांवाला कलंक लावणार नाहीं.'

त्यांच्या छातीवर ठेवलेली आपली मान हालवून अस्फुट शब्दांत मालती म्हणाली, 'नाहीं. तेवढं बोलूं नका.'

'कां ? माझी जात, माझा धर्म, नष्ट होईल अशी तुला का भीती वाटते ? रंतु इथला मी जमिनदार आहे. माझ्याजवळ पैसा आहे. आणि ज्याच्याजवळ ैसा आहे त्याची जात नष्ट होत नाहीं.'

'परंतु मोठं काहूर माजेल समाजांत.'

'माजूं दे. ते सुद्धां टिकणार नाहीं फार दिवस.'

'कुलशीलाची काय वाट ?'

'मालती, एका दिवसासाठीं तरी मला ह्या सगळ्या गोष्टींचा विसर हूं दे. संसारांत कोणत्याही गोष्टींची मला कमतरता नाहीं. प्राप्ती झाली, पण ुख म्हणून मला एक दिवसही लाभलें नाहीं; एक दिवस तरी मला सुखी ोऊं दे.'

सुरेन्द्रबाबूंचे शब्द ऐकून मालतीच्या हृदयांत कालवाकालव झाली; ोठ्या कष्टानं आपले अश्रू आंवरून ती म्हणाली,

'माझ्या जीवनाच्या अंतापर्यंत मी तुमच्याजवळ राहीन.'

तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच घडून यावं अशी मी देवाजवळ प्रार्थना करीन. आयुष्यभर जरी तूं माझ्याजवळ राहिलीस तरी मला सुख मिळणार नाहीं. तूं अजून जग पाहिलं नाहींस, मी पाहिलं आहे. मी तुझ्या विश्वासाला पात्र नाहीं मला माहीत आहे; ज्या प्रेमाच्या आश्रयानं तूं आपलं आयुष्य सुखासमाधानानं ाढण्याच्या विचारांत आहेस, ते प्रेम विकून केव्हां चालता होईन ह्याचा नेम ाहीं; म्हणून मालती वेळेवरच तूं मला बांधून घे.'

मालतीनं लक्षपूर्वक सगळं ऐकून घेतलं. पुष्कळ दिवस शांतपणें, स्थिर चेत्तानं विचार केल्यानंतर तिनं निश्चयानं म्हटलं, 'समजा, बांधून घेतलं. रीसुद्धां मनांत आलं तर सुटून जायला कसली अडचण ? मग आहे तेच ाय वाईट आहे ? दुसऱ्या कोणत्याहि बंधनाची आवश्यकता नाहीं.'

'तुला नाहीं, पण मला आहे.'

'असली तरी तुमचं माझं लग्न होणं अशक्य कोटींतील आहे.'

'कां ? विधवेशीं लग्न होत नाहीं का ?'

सुरेन्द्रबाबूंचं सगळं शरीर शहारून उठलं, त्यांनीं विचारलं,

‘ तूं का वेश्या आहेस ? ’

‘ मग कोण आहे ? तुम्हीच विचार करून पाहा. ’

‘ छेः छेः ! असे शब्द तोंडावाटे काढूं नकोस. माझं तुझ्यावर जीवापलीकडे प्रेम आहे. ’

‘ म्हणूनच मी म्हणतें. नाहींतर लग्नाला मी केव्हांच तयार झालें असतें.’

‘ मालती. ’

‘ बोला. ’

‘ सगळं उघड करून नीट सांगशील ? ’

‘ सांगतें. माझ्या शरीराला तुमच्याशिवाय अजून पर्यंत कुणीच स्पर्श केला नव्हता. परंतु एका माणसाला मी माझं हृदय, प्रेम—सर्वस्व अर्पण केलं होतं. ’

‘ मग ? ’

‘ माझ्याशीं लग्न कर म्हणून मी त्याला गळ घातली.’

‘ मग काय झालं ? ’

‘ जात वाळीत टाकील ह्या भीतीनं त्यानं नकार दिला. ’

‘ मग तुझ्या प्रेमाचं काय झालं ? ’

‘ काय होणार ? ’

‘ त्याला अर्पण केलेलं तुझं हृदय तुला परत मिळालं ? ’

‘ मी वेश्या आहे, हे मी तुम्हाला पूर्वींच सांगितलं आहे. वेश्येच्या हातून काय होत नाहीं ? ’

‘ज्याच्यावर प्रेम करीत होतीस तो सदानंदच का ?’

‘ नाहीं, दुसराच आहे. ’

‘ मग तुला माणसं ओळखतां येत नाहींत म्हणायचं ! सदानंद तुझ्यावर प्रेम करीत होता, त्याला का विचारलं नाहींस तं ? ’

मालतीच्या शरीरांत एकदम वीज चमकून गेली. कांवरीबावरी झाली ती. पाऊस पडत होता त्यावेळीं तिनं सदानंदाच्या घरीं आश्रय घेतला होता तो दिवस,

त्यानं तिला आर्थिक मदत केली त्यावेळचा प्रसंग, काशीला जातांना पन्नास रुपये त्यानं दिले, हे सगळे प्रसंग तिला एका मागून एक आठवले. त्याच्या अपरंपार सहानुभूतीच्या मागें प्रेम दडलेलं पाहून तिला एकदम रडूं कोसळलं; तिनं मोठ्या कष्टानं आपलं रडूं आवरलं आणि सुरेन्द्रबाबूंना ते अश्रूं दिसूं नयेत म्हणून ते हळूंच पुसून टाकले.

सुरेन्द्रबाबूंनी पुन्हां विचारलं, ‘ मग पुढं काय झालं ? ’

‘ मी कलकत्त्याला निघालें होतें. ’

‘ नंतर ? ’

‘ माझ्यावर दया करून आपला आधार मला दिलात.’

प्रश्न विचारतांना सुरेन्द्रबाबूचें लक्ष ठिकाणावर नव्हतें. ते कसलातरी दुसराच विचार करीत होते.

थोडा वेळ विचार करून त्यांनीं म्हटलं, ‘ मालती, तूं एक रत्न आहेस ! रत्न उकिरड्यांत पडलेलं असलं तरी त्याचं खरं स्थान गळ्यांतच ! ’

‘ कुणी म्हटलं असं? एकादा ज्या रत्नाला आपल्या गळ्यांत स्थान देते त्याच रत्नाला दुसरा तिरस्कारानं लाथेनं भिरकावून देतो. माझं स्थान तुमच्या पायापाशीं. तेंच मी माझं परम सौभाग्य समजेन ! ’

सुरेन्द्रबाबूंनीं हंसून म्हटलं, ‘ मालती, तूं खुळी आहेस असं मला वाटत होतं, पण तशी तूं नाहींस...... ’

मालतीलाही हंसू आलं. पुष्कळ दिवसानंतर तिच्या चेहऱ्यांवर आज हंसू उमटलं होतं.

त्याच वेळीं एका दासीनं येऊन म्हटलं, ‘ बाबू, बाहेर अघोर बाबू आले आहेत. ’

सुरेन्द्रबाबूंनीं विस्मित होऊन विचारलं, ‘ अघोरबाबू ? काय बरं येण्याचं कारण ? ’

‘ त्यांनीं सांगितलं, फार जरुरीचं काम आहे. ’

सुरेन्द्रबाबूंनीं लगेच उठून उभं राहात म्हटलं, ‘ मालती, जाऊन येतो मी ! ’

'बरं हे अघोरबाबू कुठले कोण ?'

'नंतर सांगेन.'

'त्यांची सासुरवाडी कुठं आहे तें त्यांना विचारून घ्या.'

सुरेन्द्रबाबूंनीं हंसून विचारलं, 'तुझी ओळख आहे कीं काय ?'

'थोडीशी. पण तेच असतील तर.'

# ११

जो जन्माला येतो त्याला मरावं लागतंच, आकाशांत फेंकलेला दगड जमिनीवर पडतोच, खून केल्यानंतर फांशीं जावं लागतंच, चोरी केल्यानंतर तुरुंगवास कपाळीं येतोच. आणि जिवाभावानं प्रेम केल्यानंतर रडणं पाठीमागं लागतंच. जगातले हे नियम आहेत. हे नियम कुणी आणि कसे घालून दिले हें कळायला मार्ग नाहीं. रडायला ईश्वरी इच्छा कारण होते कीं, शिरावरचें ओझं कारण होतं तें एक रडणारांनाच ठाऊक. माझ्यासारख्या अभाग्याला त्यांतलें काय कळणार ? पण इच्छा मात्र होते कीं एकदां प्रेम करून रडून घ्यावं म्हणजे त्यांतलं खरं कारण कळून येईल ! परंतु त्याबरोबरच प्रेम करण्यांत धोका आहे असं म्हणतात. छाती फाडून जाण्याचा प्रसंग येतो म्हणतात, त्यामुळं मी प्रेमापासून शंभर हात दूर राहतो आणि विचार करतो की सहसा ह्या भानगडींत उडी घ्यायची नाहीं. आणि विशेष म्हणजे माझं नशीबही चांगलं नाहीं; कुणी सांगावं, ह्या भानगडींत सांपडून माझ्याच छातीचे तुकडे तुकडे व्हायचे! या सगळ्या विचारांचा परिणाम असा झाला कीं मी त्या इच्छेला सोड चिठ्ठी दिली आहे.

परंतु जिज्ञासा मात्र कांहीं अजून जात नाहीं. जिथं कुणी प्रेम करून रडूं लागतात तिथं मी डोकावून पाहूं लागतो. ह्या गृहस्थाचं हृदय आतां विदीर्ण होईल, ह्याची वाट पाहात विषर्ण आणि सांशंक मुद्रेनं तिथं बसलेला असतो. परंतु शेवटीं डोळे पुसून तो जेव्हां तसाच धडधाकड हृदयानं उठतो तेव्हां अतिशय निराश होतों. त्या लोकांचं हृदय विदीर्ण व्हावं अशी इच्छा करतो असा मात्र याचा अर्थ नाहीं हं, परंतु काय असेल कोण जाणे, तें संगळं डोळ्यांनी पाहण्याच्या इच्छेला मी कांहीं केल्या माझ्या मनांतून दूर करूं शकत नाहीं.

आजही ह्याच कारणासाठीं मी मालतीच्याकडे आलो आहे, तिथं येऊन मी काय पहातो आहें हें मी पुढें सांगणारच आहे, परंतु त्यापासून मी जे कांहीं शिकलो तें आधीं सांगणार आहें. प्रेम केल्यानंतर मनुष्याला देवाजवळ स्थान मिळतं आणि मालतीप्रमाणें त्या जगन्नियंत्याच्या पायांवर आपल्या अश्रूंचा अभिषेक जे करतात, त्यांचे अश्रूं कमलाच्या फुलाहूनही अधिक सतेज आणि मौल्यवान् होऊन जातात. स्वतःला विसरून, उचित–अनुचित् याचा विचार न करता, दुसऱ्याच्या चरणीं मालतीप्रमाणं जे आत्म–बलिदान करतात ते अजाणतां त्या परमात्म्याची साधना करतात आणि जीवन्मुक्त होऊन जातात. लोक त्यांना कदाचित् वेड्यांत काढतील आणि मीही पण प्रथम त्यांना वेडेच म्हणत होतों; परंतु असले वेडे जगांत क्वचितच सांपडतात. त्यावेळीं मला हें माहीत नव्हतं. अशा वेड्यांचं नुसत अनुकरण जरी केलं तरी हें तुच्छ जीवन सफल होऊन जाईल.

सुरेन्द्रबाबू निघून गेल्यानंतर दरवाजा बंद करून मालती किती रडली हें मी सांगत नाहीं; परंतु बाल्यावस्थेंतील त्या प्रेमांत आणि ह्या प्रेमांत किती भेद आहे याचाच ती विचार करीत असावी असं दिसत होतं. ह्या वेळीं आपलं सर्वस्व गमावून मालतीनं प्रेम केलं आणि तिच्या त्या प्रेमांत गाढ कृतज्ञतेचा भर ! मालती आपल्या सुखासाठीं आसुसलेली आहे असं आता कोण म्हणेल ? सुरेन्द्रबाबूंच्यासाठीं हंसत–मुखानं आपलं प्राण देखील द्यायला ती तयार झाली असती आणि कदाचित् असं झालं असतं तर तिला खरं सुख त्यांतच मिळालं असतं.

मालती स्वतःशींच म्हणत होती, ‘ माझ्या प्राणाहूनही तुम्हीं मला अधिक प्रिय आहांत. तुमच्या एका केसाला जरी धक्का लागला तर मी प्राण–त्याग करीन. माझ्यामुळं तुम्हाला कलंक लागेल. लोक तुम्हाला नाना प्रकारचीं दूषणं देतील. तें मी उघडच्या डोळ्यांनीं सहन कसं करूं ? आणि तुम्हालाही कसं सहन करायला लावूं ? माझं कुलशील कुणालाच माहीत नाहीं मला कुणीच ओळखत नाहीं. त्यामुळं मला कसलीच खंत वाटणार नाहीं. पण तुमची गोष्ट तशी नाहीं. तुम्हाला सगळे लोक ओळखतात. तुमची दुष्कीर्ती व्हायला किती उशीर ? वेश्येशी तुम्ही विवाह केला आहे असं लोक म्हणतील, लोक तुमच्या वर्मीं घांव घालतील, तुम्हाला घायाळ करतील, तुम्हालां समाजांत खालीं मान घालावी लागेल. हे मी होऊ देणार नाहीं. ’ मान हालवून मालतीनं म्हटलं, ‘ हें होतां कामा नये. ’

शांत होऊन मालती उठून बसली. डोळे पुसून आणि दोन्ही हात जोडून तिनं म्हटलं, ‘ देवा, ह्या जन्मांत मी जे कांहीं पाप आणि जे कांहीं अपराध कले आहेत ते सगळे तुला माहीत आहेत. परंतु त्या दिवशीं मात्र तूं मला विसरूं नकोस. जगांत माझ्यासाठीं आतां दुसरं स्थान राहिलं नाहीं—कधीं काळीं तो दिवस आलाच, कधीं काळीं माझ्या पतीचं माझ्या वरचं प्रेम उडालं तर त्या दिवशीं तुझ्या पायापाशीं मला थारा दे, पतिता म्हणून दूर लोटूं नको.’ त्या रात्रीं मालती तिथेंच झोपी गेली.

दुसरा दिवस उगवला. परंतु सुरेन्द्रबाबू परत आले नाहींत. मालती दिवसभर त्यांची वाट पाहात होती. रात्र बरीच उलटून गेल्यानंतर ते परत आले. पहिल्यापेक्षां त्यांचा चेहरा थोडा मलूल आणि म्लान झालेला पाहून मालती घाबरली.

खोलींत येताच त्यांनी हंसून म्हटलं,

‘ मालती, दिवसभर तूं माझी वाट पाहात होतीस ना ? ’

मालतीच्या गालांवर रक्तिमा चढली. तिनं कांहींच उत्तर दिलं नाहीं.

‘ काय करूं ? खटल्या–खोकल्या पायीं एक दिवसही फुरसत मिळत नाहीं. ज्याच्या जवळ जितका पैसा तितकाच व्याप त्याच्या पाठीमागं. ’

मालतीनं विचारलं, ‘ खटल्या–खोकल्यात पडतांच कां ? ’

सुरेन्द्रबाबूंनीं हंसून म्हटलं, ‘ पडतों कां ? तुला नंतर कळून येईल तें. पहिल्यांदा तू माझी होऊन जा, माझ्या सगळ्या गोष्टी स्वतःच्याच आहेत असं मानून घ म्हणजे मग तुला समजेल, मी खटल्या–खोकल्यांत कां पडतो तें ?

मालती विचार करूं लागली. कसला कोण जाणे !

सुरेन्द्रबाबूंनीं पुन्हां विचारलं, ‘ मालती, विचार केलास त्या गोष्टीचा ? ’

‘ कोणती गोष्ट ? ’

‘ वा : ! कोणती गोष्ट ? कालची गोष्ट आजच विसरून गेलीस वाटतं ?’

‘ विसरलें नाहीं. आहे, आठवण आहे. ’

‘ आठवण असेल परंतु त्याच्यावर विचार केलास कां ? ’

‘ हो, विचार केला; हें लग्न कदापि होणार नाहीं. ’

‘ होणार नाहीं. म्हणजे ? ’

‘ हें मी पूर्वीच सांगितलं आहे आपणाला. ’

‘ सांगितलं काय कपाळ ! मी तुझ्याशीं लग्न करणारच. ’

‘ मी तें होऊं देणार नाहीं. एवढा निर्धार होता तर आधींच कां लग्न केलं नाहीं ? जयावती मेल्यानंतर तुम्हीं दुसरी आणून ठेवली आहे हे आतां जगाला माहीत झालं आहे. ’

सुरेन्द्रबाबू विचारांत गढून गेले.

कांहीं वेळ विचार केल्यानंतर ते म्हणाले, ‘ मी सुद्धां हाच विचार करीत होतों. ठीक आहे, जाऊं द्या.......मी......’

‘ माझ्याशीं तुम्ही लग्न केलं तर मी विष खाईन. ’

सुरेन्द्रबाबूंनीं हंसून म्हटलं, ‘ तें नंतर पाहतां येईल. ह्या वेळीं तर मी सात दिवसाच्या आंत लग्न करायचं ठरवलं आहे. ’

‘ तर मग सात दिवसांच्या आंतच मी इथून जाईन. ’

सुरेन्द्रबाबूंनीं विस्मयानें चकित होऊन विचारलं,

‘ कुठें जाणार तूं ? ’

‘ वाट दिसेल तिकडे. ’

‘ फुकट मरशील. ’

‘ मरणार नाहीं; मला मरण यायचं नाहीं. ज्या प्रवाहांत प्रवाहपतिते प्रमाणं जीवन कंठायला निघालें होतें त्याच प्रवाहांत परत जाऊन पडणार !

‘ मग लग्नबंधनाचा स्वीकार नाहीं करणार तू ? ’

‘ नाहीं. ’

मालतीचा दृढ निश्चय बघून मालती खोटं बोलत नाहीं ह्याची सुरेन्द्र-बाबूंची खात्री झाली.

थोडा वेळ विचार करून, शुष्क हास्य करून ते म्हणाले, ‘ तूं तरी काय करणार त्याला ? तुमचा हा स्वभावधर्मच आहे. बरं आहे. जशी तुझी मर्जी. ’

मालतीनं ह्या वेळीं कांहींच उत्तर दिलं नाहीं. मूक भावानं तो तिरस्कार सहन केला. पुष्कळ वेळपर्यंत कुणीच बोललं नाहीं.

नंतर सुरेन्द्रबाबूंनीं विचारलं, ‘ घरीं पैसे पाठविलेस ? ’

मालती रडूं लागली. मान हालवून तिनं सूचित केलं, ‘ नाहीं. ’

‘ कां ? ’

मालती गप्प बसली. मालती रडते आहे हें आतां त्यांच्या लक्षांत आलं; त्यांनीं विचारलं, ‘ तुझ्याजवळ पैसे नव्हते ? ’

‘ नव्हते. ’

‘ मुळींच नव्हते ? ’

‘ कुठले असणार ? ’

‘ इथं येऊन तुला इतके दिवस झाले, तूं अजून पैसे घेतलेसच नाहीं का ? ’

मालती कांहींच बोलली नाहीं. मालतीजवळ एक पैसाही नव्हता हें सुरेन्द्रबाबूंना माहींत होतं तरी सुद्धां त्यांनीं तो प्रश्न विचारला होता.

कांहीं वेळानं तिचा हात धरून तिला आपल्याजवळ बसवून घेत ते म्हणाले, ‘ आपण होऊनच जर तूं अशी कंगाल होऊन राहूं लागलीस तर मी तरी त्याला काय करूं सांग ? एकही साडी नेसणार नाहीं, काय जरूरी आहे

त्यांची ? असं म्हणून किती दिवस तूं घालविणार आहेस ? तोंड उघडून तुला काय हवं, हें तूं सांगणार नाहीस तर मला तरी तें कसं कळावं ? '

खिशांतून नोटांचा एक गठ्ठा काढून तिच्या हातांत देत ते म्हणाले, ' हे ठेऊन घे. ह्या रकमेंतून तुला जितके पाठवायचे असतील तितके पाठव, आणि उरलेले विना–संकोच खर्च करून टाक. आणि हें पाहा, मधून मधून पैसे मागत जा; ' नंतर थोडसं हंसून म्हणाले, ' पैसे शिलकेंत कसे टाकायचे हे शिकायला सुरवात कर आतां. '

मालती गप्प बसून ऐकत होती.

सुरेन्द्रबाबूंनीं पुढं म्हटलं, ' आज पैसे पाठवायला विसरूं नकोस. '

' कसे पाठवूं ? '

' रजिस्टर करून. '

' माझ्या हातून नाहीं होणार तें. दुसऱ्या कुणाच्या तरी नांवानं तुम्हीच पाठवून द्या. '

' कां ? तुझा पत्ता लागेल ह्याची भीती वाटते तुला ? '

' हो. '

' तर मग माझे वकील–अघोरबाबू–त्यानांच हें काम करायला मी सांगतों. ते कलकत्त्यांत राहातात, तिथूनच ते पाठवीत जातील. '

' हां, तें ठीक होईल. पण त्यांना कुणी विचारायला आला तर ? '

' जसं त्यांना बरं दिसेल तसं उत्तर देतील ते. '

' असं नको बाई. तुमचं नांव त्यांनीं कुठल्याही तऱ्हेनं सांगूं नये असं त्यांना बजावून सांगा. '

' ठीक आहे. '

# १२

जयावती मेली होती पण तिची आई अजून जिवंत होती.

नारायणपुराहून थोडं दूर उत्तरेकडे बाजपुर नांवाचं गांव होतं. त्या गांवांतच एक घर होतं. आणि त्या घरांतच जया आणि तिची आई राहात असत. त्यांचा उदर निर्वाह कसा चालला होता हे त्यांचं त्यांनाच माहीत. ऐकिवांत असं आहे कीं, गांवांतल्या दोन चार गुंडांना देखील तें माहीत होतं, परंतु तें जाणून घ्यायची ना आम्हाला आवश्यकता, ना इच्छा. जाऊं द्या ती गोष्ट.

अशाच प्रकारें कांहीं दिवस गेले, आणि नंतर नारायणपूरच्या जमिन-दारांच्या खास महालांत जयावतीनं कशी जागा पटकावली हे माहीत नाहीं; परंतु ज्या वेळीं तिला तिथं जागा मिळाली त्या वेळीं तिच्या आईनेंही तिथें प्रवेश करून घेतला, आणि दोघांनीं मिळून आपलं बस्तान चांगलंच बसविलं. परंतु जयाच्या आईचं दैव चांगलं नव्हतं असं दिसतं, कारण चार—पांच महिन्यानंतर दोघींनीं एकमेकांशीं भांडायला सुरवात केली. कांहीं दिवसानंतर अशी पाळी आली, कीं दररोज सकाळ संध्याकाळ एकमेकींशी भांडल्याशिवाय, एकमेकींना शिव्या शाप दिल्याशिवाय त्या अन्नग्रहण करीत नसत.

अशा स्थितीत आणखी कांहीं दिवस गेले. सहा महिन्यानंतर जयाची आई महालांत राहायची लालसा सोडून, आपल्या पहिल्या जुन्या घरांत राहाव-यास गेली. तो महाल सोडायला तिला भाग पाडलं, असंच तिनं जातांना जे कांहीं प्रकार केले, त्यावरून वाटतं. कारण जातांना तिनं आपलं खूप उर बडवून

घेतलं. आणि आपल्या मुलीचा चांगलाच उद्धार केला. यावरून तो महाल सुखासुखी सोडावयाची तिची इच्छा नव्हती हे स्पष्ट दिसून येत होतं. तेव्हां पासूनच त्या हरामजादीनं पुन्हां महालांत पाऊल ठेवतां काम नये असा सुरेंद्र-बाबूचा कडक हुकूम होता. ती पुनः पुन्हां येत होती, घरंत वावरत होती. परंतु त्याचा उपयोग कांहींच झाला नव्हता. नाना प्रकारची शिवीगाळ करून खरीं खोटीं आसवं डोळ्यांत उभीं करून, छाती बडवून घेऊन आणि शेवटीं नोकरांकडून गचांडी खाऊन ती परत बाजपूरला आपल्या घरीं जात होती. दर एक–दोन महिन्यांनी हा हैदोस चालायचा. त्यांत तिला आंतल्या आंत कांहीं तरी लाभ होत होता; नाहीं तर ह्या क्षुल्लक गोष्टीसाठीं ती इतक्या दूर कशाला आली असती ? तिच्या पूर्व चरित्रावरून पुष्कळच कमी मेहनतींत ह्या सगळ्या गोष्टींचा लाभ तिला करून घेतां आला असता, असें म्हणायला कांहींच हरकत नाहीं. जाऊं द्यात त्या सगळ्या गोष्टी, पोटच्या मुलीवर तिचं फार प्रेम होतं आणि ती कुमार्गी असली तरी तिच्यावरील प्रेमामुळेंच ती तिला भेटायला येत होती, असंच समजूं. असेच दिवस जात होते. नंतर जयावती गंगेंत बुडून मेली असं जेव्हां तिनं ऐकलं तेव्हां उर बडवून घेऊन आणि मोठमोठ्यानं ओरडून ओरडून बाजपूरच्या अर्ध्या रहिवाश्यांना तिनं आपल्या घरासमोर गोळा केलं होतं.

बाजपुरची बरीच वस्ती कुणब्या–माळ्यांची होती. कुणब्यांच्या घरांतील म्हाताऱ्या, प्रौढा आणि तरण्या बायकांचं संमेलन जयाच्या आईच्या ओसरीवर बघतां बघतां भरलं. आश्चर्यानें डोळे मोठे भरून आणि तोंड बन्द करून सगळ्यांनीच ऐकलं. जयावतीच्या गांवाएवढी मोठी होडी जवळ जवळ पांचशें दास–दासींना घेऊन कलकत्त्याच्या अफाट डोहांत बुडून गेली !

नंतर जयाची आई म्हणाली, ‘ ज्यांनीं ज्यांनीं म्हणून पाहिलं त्यांचं म्हणणं असं, कीं एवढी मोठी नौका सगळ्या कलकत्ता शहरांत नव्हती. ’

एका म्हातारीनं दुजोरा देत म्हटलं, ‘ हो, नव्हतीच मुळीं. ’

एक मध्यम वयाच्या बाईनं विचारलं, ‘ काय किंमतीची होती ती ? ’

‘ अग, किंमत काय त्यांवर लिहिलेली असते ? ’

ती बाई गप्प बसली.

जयाच्या आईनं म्हटलं, ‘ स्वतः लाटसाहेब सुद्धां पहायला आले होते. ’

सगळ्या तरुणी कानांत प्राण आणून ऐकूं लागल्या.

जयाची आई पुढें म्हणाली, ‘ स्वतः लाटसाहेब सुद्धां छातीवर हात मारून घेऊन रडत होते. माझ्या मुलीवर सगळ्यांचंच प्रेम होतं ! ’

एवढं बोलून जयाच्या आईनं पदरानं आपल्या डोळ्याचे कोपरे पुसले; आणि काय केलं म्हणजे पुढच्या जन्मीं जयावतीचं भाग्य आपणाला लाभेल असा विचार जमलेल्या बायका मनांतल्या मनांत करूं लागल्या.

जयाच्या आईनं म्हटलं, ‘ तर जयाच्या रूपाला काय मर्यादा होती ? साक्षात् लक्ष्मीची प्रतिमा ती ! आहा, कसं सरळ नाक, किती चांगले डोळे, किती रेखीव भुंवया आणि शरीराचा बांधा किती मोहक ! नांव ठेवायला तिळ-भर जागा नव्हती. ’

तरुणी तर गप्प बसल्याच, परंतु जयाच्या आईच्या म्हणण्यांत असत्याचा लवलेश तरी आहे अशी शंका कुणीच काढली नाहीं.

जयाच्या आईनं बोलणं चालू केलं, ‘ बाबूंचं काय तिच्यावर कमी प्रेम होतं ? मागितल्या वेळीं हवं तें तिला ते देत असत. एवढे मोठे राजासारखे बाबू. त्यांच्या डोळ्यांत भरणं म्हणजे काय सोपी गोष्ट आहे ? ’

ही गोष्ट मनांतल्या मनांतच सगळ्यांनींच खरी धरली.

‘ मीही आतां जास्त दिवस जिवंत राहणार नाहीं—हें दुःख मी कसं सहन करूं ? ’

ह्या गोष्टीविषयीं कांहीं जणांना संशय आला, परंतु सुखासुखी सहानु-भूति प्रकट करायला कोण माघार घेणार ?

एकीनं विचारलं, “ जमिनदार बाबूंचं काय झालं ? ’

जयाच्या आईनं उत्तर दिलं, ‘ ते जिवंत आहेत. ते दुसऱ्या जहाजांत होते ना त्यामुळें ते बचावले.”

‘ तर काय दोघं वेग-वेगळ्या जहाजांत होतीं ? ’

जयाची आई म्हणाली, ‘ नाहीं तर काय ! ’

‘ त्या सगळ्यांचं काय झालं ? ’

‘ ते बिचारे सगळे बुडून गेले. ’

ती वेळ अशाच तऱ्हेनं निघून गेली. ‘ संध्याकाळ होत चालली आहे, घरीं पुष्कळ कामं पडली आहेत. जें झालं तें होऊन गेलं, तूं तरी आतां काय करणार ? ’ असं म्हणत एक एक आपापल्या घरीं निघून गेल्या.

जयाच्या आईनं कसं तरी उकडून खालं आणि दरवाजा बंद करून घेतला. तिला झोप येत नव्हती तोंपर्यंत मधून मधून मोठमोठ्यानं रडून ओरडून कलकत्त्या एवढ्या मोठ्या नौकेची आणि लाटसाहेबांच्या रडण्याची आठवण ती शेजाऱ्या पाजाऱ्यांना करून देत होती.

दुसऱ्या दिवशीं पहांटेस जयाची आई नारायणपुरला निघून गेली. तोच रस्ता, तोच घाट, झाडांची तीच रांग, सगळ्या गोष्टी त्याच–सगळ्या त्याच परिचित गोष्टी. ह्याच रस्त्यानें आपण नारायणपूरला जात होतों, ह्याच रस्त्यानं ऊर बडवून घेत परत येत होतों, ह्याची जयाच्या आईची आठवण जागी झाली. पण आतां जया जिवंत नव्हती, पूर्वीप्रमाणं आतां भांडणही होणार नव्हतं कीं उर बडवून घेण्याचा तमाशाही करायला नको होता. हजारों वेदनांनी तिचं हृदय व्याकुळ होऊन गेलं, परंतु ती व्याकुलता आपल्या हजारों किंकाळ्यांनीं शान्त करीत ती चालली होती. ज्यांच्या ज्यांच्या घरांसमोरून म्हणून ती जात होती त्यांना हाक मारून, हातांतलीं सगळीं कामं टाकून एकदां तरी पाहून जावं लागत होतं.

शेवटीं सुरेन्द्रबाबूंच्या हवेलीसमोर ती जाऊन पोंहचली. जयाच्या किती तरी स्मृती त्या हवेलींत जिवंत होत्या—जयाच्या आईनं सहस्त्रपटीनं आणखिन् आपला आवाज चढवून किंकाळ्या फोडायला सुरवात केली. प्रथम पुढल्या फाटकांतून आंत जायला तिला बंदी होती, परंतु ह्या वेळीं एखाद्या वाघिणीसारखी डरकाळ्या फोडींत इतक्या वेगानं ती आंत घुसली कीं तिला अडविण्याची हिम्मत दरवानाला सुद्धां झाली नाहीं. उलट दहा पावलं सगळे मागेंच सरकले.

नुकंच जेवण–खाण आटोपून घेऊन सुरेन्द्रबाबू वामकुक्षी करायला चालले होते तोंच त्यांच्या कानांवर किंकाळ्या पडल्या, जयाची आई वावटळी-सारखी आली असावी हें त्यांच्या लक्षांत आलं.

आल्यानंतर वेड पांघरून जयाला परत करायची मागणी करून ती जवळच बसली. त्यानंतर एकामागून एक मागण्यांचा तिने सपाटाच चालविला. तिनं भीक्षा, निवेदन, कैफियती असे नाना प्रकार करून सुरेन्द्रबाबूंना त्राही त्राही करून सोडलं. त्यानंतर डोकं फोडून घेणं, छाती बडवून घेणं, आणि झिंज्या उपटून घेणं वगैरे जे प्रकार तिने केले त्यांचं वर्णन करणं माझ्या

एवढं सगळं आटोपल्यानंतर शेवटीं पैशाची मागणी करीत तिनं म्हटलं आपल्या जवळ विष खायला एक पैसाही नाहीं, दया करून सुरेन्द्रबाबूंनीं पैसे दिले नाहींत तर आपण उपाशी मरून जाऊं, नाहींतर गळफांस लावून जिथं तिची जयावती गेली आहे तिथं आपणही जाऊं.

हे सगळं ऐकून सुरेन्द्रबाबूंनीं म्हटलं, ‘ जें व्हायचं तें होऊन गेलं, आतां मला हे सांग, किती पैसे दिले तर तुझं चालण्यासारखं आहे ? ’

जयाच्या आईनं डोळे पुसून म्हटलं, ‘ बाबा, मला असे किती पैसे लागतात ? मी विधवा आहे, माझं कुणीच नाहीं—मला असे कितीसे पैसे लागणार ? ’

‘ स्पष्टच सांग ना तुला किती पैसे पाहिजेत तें. ’

‘ दर महिन्याला पंधरा रुपये मिळाले तरी भागण्यासारखं आहे. ’

‘ ठीक आहे, मिळत राहतील. तहाहयात दर महिन्याला पंधरा रुपये कचेरींत येऊन घेऊन जात जा. ’

महिना पंधरा रुपायांचं अभिवचन मिळाल्यानंतर जयाच्या आईनं किती तरी आशीर्वाद दिले आणि कितीतरी गोड गोड शब्द तिने तोंडावाटे काढले. जातांना ती पूर्वीप्रमाणें रडत गेली नाहीं, तर उलट विचार करीत गेली. जयावती मेली होती; आईच्या हृदयाला दुःख हें होणारच. परंतु मुलीच्या मृत्युमुळं थोडासा फायदाही झाला हा विचार जातां जातां तिच्या मनांत येऊन गेल्या-शिवाय राहिला नाहीं.

सुरेन्द्रबाबूंचा निरोप घेऊन जयाची आई तशीच आपल्या गांवीं गेली नाहीं. दास–दासी राहात असत तिथं जाऊन हजर झाली. तिथें किती तरी तिच्या ओळखीचीं माणसं होतीं. जयाच्या आईच्या दुःखांत त्यांनींही भाग घेतला आणि एक दोघींनीं रडूनसुद्धां घेतलं. जयाची आई पुष्कळ वेळपर्यंत बोलत बसली होती, शेवटीं सुरेन्द्रबाबूंच्या दयेची गोष्टही तिनं सांगितली. बोलण्याबोलण्यांत जेव्हां तिनं ऐकलं कीं, तिच्या जयाच्या गादीवर एक स्त्री नुक्तीच येऊन विराजमान झाली आहे आणि बाबूंनीं तिला मोठ्या सन्मानानं बगिचा–महालामध्यें ठेवलं आहे, तेव्हां तिच्या वागणुकींत संपूर्णपणें फरक पडला. तिच्या डोळ्यांतून ज्वाला बाहेर पडूं लागल्या आणि देश–काल परिस्थितीचा विचार न करतां तिथल्या तिथें बगीचा–महालाच्या मालकीणीचा ग्राम्य शब्दांत तिनं चांगलाच उद्धार केला. तिच्या किंकाळ्यांचा आवाज हळूं हळूं मोठा होऊं लागला. अदम्य उत्साहानं तिनं पुन्हां आपल्या झिंज्या उपटून घेतल्या आणि छाती बडवून घ्यायला सुरवात केली. तिचा तो अवतार पाहून दास–दासी घाबरून गेल्या. तिला शान्त होण्याचा पुष्कळांनीं उपदेश केला. त्यांनीं तिला धाक दपटशा देऊन पाहिलं आणि शेवटीं 'तूं हा प्रकार असाच चालूं ठेवलास तर बाबू येऊन तुझा पगार बंद करतील' हेही सांगून पाहिलं. पण तिनं कशाकडेचं लक्ष दिलं नाहीं, आणि कुणाचंच ऐकलं नाहीं. अखेरीस नेहमीच्या मार्गाचा अवलंब करून त्यांनीं एकदांची जयाच्या आईच्या तावडींतून आपली सुटका करून घेतली.

ती बाहेर आली आणि तडक बगीचांतल्या महालाकडे निघाली. मुलीबद्दलचं तिचं दुःख चौपट वाढलं होतं, तिच्या हाडांहाडांतून हिंसक अग्नीच्या ज्वाला भडकत होत्या. आपल्या मुलीला बुडवून तिच्या जागीं ही हरामजादी बसली आहे, हा जयाच्या आईचा कटाक्ष. ती गर्जत मर्जत बगीच्याच्या बंगल्यांत शिरली. समोर दिसलेल्या दासीवरच क्रोधानं आपले लाल–लाल डोळे फाडून म्हणाली,

'ती डांकीण कुठं आहे ?'

ती दासी बिचारी नवी होती; भिऊन दोन पावलं मागें सरून ती म्हणाली, ‘ ती.........तिथं ! ’

जयाच्या आईनं जसा प्रश्न केला होता तसंच तिला उत्तर मिळालं. दासीला प्रश्नाचा अर्थ समजला नव्हता आणि जयाच्या आईला उत्तराचा अर्थ समजला नव्हता. पुन्हां एकदां दासीकडं पहात तिनं विचारलं, ‘ कुठाय ती ? ’

तिनं बोट दाखवलं आणि तिथून ती सटकली.

जिना चढून जयाची आई वर गेली. तिथं एक एक खोली आपल्या पायाखालीं पालथी घालूं लागली. पण तिला कुठेंच कुणीही दिसेना. परंतु तिथला थाटमाट मात्र दिसल्यावांचून राहिला नाहीं. किती सामान, किती उत्तम सजावट ! पूर्वीं ती सुरेन्द्रबाबूंच्या घरीं राहिली होती, पण अशा प्रकारचा थाट आणि अशा प्रकारची सजावट तिनं पूर्वीं कधींच पाहिली नव्हती. खोलीची शोभा पाहतांच ती नागिणीसारखी फूत्कार टाकूं लागली. हे वैभव, हे ऐश्वर्य वास्तविक पाहतां, जयावती जिवंत असती तर, तिचंच झालं असतं. म्हणजे आपल्याच मालकीचं झालं असतं असं तिला वाटलं.

अशा प्रकारें मनांत तर्क वितर्क लढवीत असतां तिला एका खोलींत एक स्त्री दृष्टीस पडली.

ती स्त्री पाठमोरी बसली होती. दासी समजून जयाच्या आईनं तिला हांक मारून विचारलं, ‘ अग ए, तुझी मालकीण कुठं आहे ? ’ विलक्षण कर्कश आवाज ऐकून त्या स्त्रीनं तिच्याकडे दचकून पाहिलं. त्या स्त्रीने साधीं वस्त्रं परिधान केलीं होतीं आणि अंगावर तर एकही दागिना नव्हता. जयाची आई त्या स्त्रीच्या चेहऱ्याकडे पाहून मुग्ध होऊन गेली.

तिनं जरा नरमाईनंच विचारलं, ‘ तू कोण आहेस बाई ? ’

‘ मी इथंच राहतें. तुम्ही बसून घ्या. ’

जयाच्या आईनं त्या स्त्रीला विचारलं, ‘ तूं किती दिवसांपासनं इथं आहेस ? ’

‘ महिन्यापेक्षां थोडा अधिक काळ लोटला असेल. ’

‘ तुझी मालकीण कुठं आहे ? आप.या मालकीणी बरोबर तूं आली आहेस का ? ’

त्या स्त्रीनं मान हालवून विचारलं, ‘ त्यांच्याशीं तुमचं कांहीं काम आहे का ? ’

‘ लहानसहान काम नाहीं माझं. त्या हरामजादीचं आज मी डोकं कापून खाणार आहे. ’

असं बोलतां बोलतां तिच्या चेहऱ्यावर तिचे पूर्वीचेच भाव परत आले होते; तिचा तो अवतार, तो आवेश आणि ती क्रूर नजर सगळींच्या सगळीं प्रकट झालीं.

‘ मी कोण आहे माहीत आहे तुला ? मी जयाची आई. सगळा देश मला:ओळखतो. हरामजादी डाखीण ! माझ्या मुलीला खाऊन बसली आहे, आज मी तिला खाऊन टाकीन--खाऊन टाकीन--खाऊन टाकीन--( दांत ओठ खात ) तिला खाऊन टाकीन तेव्हांच परत जाईन, खाऊन टाकीन---खाऊन टाकीन--जरूर खाऊन टाकीन--सगळं कांहीं स्वाहा करूनच मी घरीं परत जाईन. ’

ती स्त्री आपला श्वास कोंडून हे सगळं पहात होती.

‘ अग ए हरामजादी, मी तुला जरूर गिळंकृत करीन ( छाती बडवून ) अग ए अभागिनी, तुझा शंभरदा सत्यानाश होईल--छिनाल--डाकीण ( झिंज्या ओढीत ) तुला खाऊन टाकीन---तुला चावून टाकीन---तुला कच्ची खाईन---आई दुर्गेच्या चरणावर तुझी छाती फोडून रक्ताचा अभिषेक करीन---आणि तसंच तुझं कपाळ फोडून त्याची हाडं चढवीन, ( जमिनीवर डोकं आपटून ) ---अग ए अभागिनी, असंच ( दांत ओठ खांत )---कां कुठं आहे ती ? ’

जिच्यामुळें इतकं रण माजलं होतं ती पुढेंच बसली होती, परंतु जयाच्या आईला तें माहीत नव्हतं. कदाचित् तिला ते माहीत असतं तर त्या दिवशीं कांहीं तरी वाईट प्रसंग आला असता.

मालतीनं तिच्या जवळ जाऊन तिचा हात पकडीत म्हटलं, ‘ तुम्ही जरा गप्प व्हा...... ’

'मी गप्प होऊं ?......तूं छिनाल ! हें सांगणारी तूं कोण ? माझ्या मुलीला ती गिळून बसली आहे आणि मी गप्प बसूं ?' (पुन्हां एकदां तिनं डोकं जमिनीवर आपटलं.)

एवढा मोठा जाड गालीचा नसता तर जयाची आई आपलं डोकं फोडून घेतल्याशिवाय घरीं परत गेली नसती. हे मालतीच्या लक्षांत येऊन ती म्हणाली,

'त्या आज इथं नाहींत.'

'इथं नाहींत ?'

'नाहींत.'

'मग मी एक क्षणभर सुद्धां इथून हलणार नाहीं. हरामजादीला पाहीन-खांईन-आणि मग जाईन.'

मालतीनं हंसून म्हटलं, 'जातां कां ? आनंदानं इथंच राहा ना. पाहा किती उशीर झाला आहे ! तुमचं जेवणखाण अजून व्हायचं असेल ना.'

'जेवणखाण ? सगळं एकदमच करीन.'

'अरेरे ! मुलीचं दुःख ! आईला काय वाटत असतं, याची मला चांगली कल्पना आहे.'

जयाची आई थोडीशीं नरम पडून म्हणाली, 'तूंच पाहा बरं मुली.'

'तें काय मला समजत नाहीं ? परंतु तुम्हीं तरी काय करणार सांगा ? पोटांत दोन चार घांस तर टाकलेच पाहिजेत. हें दरिद्री पोट ऐकणार आहे कां ?'

'खरं सांगतेस तूं, मुली.'

'म्हणूनच म्हणतें थोडं खायला आणून देऊं कां इथं ?'

'आणतेस ? बरं आहे, मुली. घेऊन ये.'

'जया आक्का तुमच्या किती गोष्टी सांगत होती !'

'सांगत होती ? कां बरं सांगणार नाहीं ? तूं तिला पाहिलं होतंस ?'

'हो, किती तरी दिवस आम्हीं एकत्र होतों. तिला पाहिलं नाहीं असं कसं बरं होईल ?'

'तर काय तूं तिच्या बरोबरच होतीस ?'

'हो, तिनं मला देशावरनं आणलं होतं. ती किती तरी गोष्टी सांगत असे माझ्याजवळ. त्या सगळ्या गोष्टींत तुमच्याच जास्त असायच्या.'

'असणार नाहींत तर काय होईल ?'

'ती फार चांगली होती.'

'अग, असली मुलगी सुद्धां मरावी ? बरं तुझी ती डांकीण कुठली आहे ?'

'कलकत्त्याची.'

'हरामजादीनं बाबूंना कांहीं तरी खाऊं पिऊं घातलं आहे असं वाटतं.'

'असंच कांहीं तरी ऐकिवांत आहे.'

'परंतु आज मी तिचं सगळं खाऊं पिऊं घालणं बरोबर करून टाकीन.'

'जरूर करा मग जा. तसलीच आहे ती !'

'तेव्हांच जाईन मी. त्या डांकणीला मंत्र--तंत्र येतं काय ?'

'मंत्र तंत्र ? सगळं कामरूप देशाहून शिकून आली आहे असं ऐकलं आहे मी. मनुष्याला मेंढरूं करून टाकते असं म्हणतात. बाबूंना तर तिनं असं करून टाकलं आहे कीं ती ऊठ म्हणाली तर ते उठतात आणि बस म्हणाली तर बसतात.'

जयाच्या आईचा चेहरा थोडासा सुकून गेला. ती म्हणाली, 'मंत्र-तंत्र मलाही येतात.'

'काय न झालं यायला ? दुपारीं जेव्हां मालकीणबाई येतील तेव्हां मी दाखवून देईन त्यांना.'

'एखाद्याला मूठ मारतां येते कां तिला ?'

'हो, येते तर—'

'केव्हां येईल ती ?'

'दुपारीं.'

दुपार व्हायला फारसा वेळ नाहीं हें जयाच्या आईनं खिडकींतून बाहेर डोकावून पाहिलं.

थोडं इकडं तिकडं पाहात तिनं म्हटलं, 'परंतु माझीं आज पुष्कळ कामं पडलीं आहेत. आतां जातें मी. उद्यां पुन्हां परत येईन.'

असं म्हणून ती जायला उठली.

'नाहीं, नाहीं, आज इथंच खाऊन–पिऊन जा.'

'फार उशीर होतोय्.'

'नाहीं, मुळींच उशीर होणार नाहीं.'

'तर मग लवकर आण. मुली, तुझं नांव काय बरं?'

'मालती.'

'आपल फारच चांगलं नांव आहे!'

मालतीनं म्हटलं, 'एक गोष्ट मी तुम्हाला अजून सांगितलीच नाहीं. जया आक्काकडून मी दहा रुपये उसने घेतले होते. ती तर आतां नाहींच, तिच्या ऐवजीं तुम्हीच ते घ्या आणि माझ्या शिरावरील ऋणाचा भार हलका करा. माझ्यावर उपकार होतील तुमचे.'

मालती काय म्हणाली तें जयाच्या आईच्या लक्षांत आलं नाहीं. म्हणून तिनं विचारलं,

'काय करूं म्हणतेस?'

'ते दहा रुपये तुम्हीच घेऊन टाका.'

'मला देतेस तूं?'

'हो.' असं म्हणून मालतीनं तिच्या हातांवर दहा रुपये ठेवून दिले.

जयाची आई पुष्कळ वेळपर्यंत मालतीकडं पाहून म्हणाली, 'मुली, तूं चांगल्या घरांतली मुलगी दिसतेस.'

जयाच्या आईचे डोळे पाण्यानं भरून आले.

ती पुन्हां म्हणाली, 'मुली, चांगल्या घराण्यांतली मुलगी आहेस तूं नाहींतर......हें पाहा, मी तुला आतां खरं सांगतें—माझ्या जयाच्या हातांत किती तरी पैसे खेळत असत, परंतु मी तिची आई असूनही तिनं मला कधीं सुद्धां दहा रुपये दिले नाहींत.'

एवढं बोलून जयाच्या आईनं आपल्या डोळ्याचे कोपरे हळूच पुसून घेतले.

थोड्या वेळानंतर मालती म्हणाली, ' आम्ही दीन दुःखी असलों तरी आम्हांला सुद्धां धर्म आहे. '

' हो, आहे तर. पण धर्म सगळेच कुठं पाळतात ? '

' जाऊं द्या तें. उद्यां पुन्हां येणार ना ? '

' हो......पण......हो, कां येणार नाहीं ? '

' मग ही गोष्ट आज मालकिण बाईला सांगून ठेऊं ना ? '

' हो. पण नको; आतां सांगण्याची कांहीं जरूर नाहीं. '

कामरूप देशांत बाण सोडायची शिकलेली विद्या जयाच्या आईला बेचैन करून सोडत होती—आणि मालतीच्या लक्षांत तें आलं होतं.

जयाच्या आईनं सुकलेल्या चेहऱ्यानं म्हटलं, ' तर मग मी आतां जातें, मधून मधून तुझ्याकडे येत जाईन बरं. '

' जरूर येत जा, हं. '

ही हकीकत ऐकून सुरेन्द्रबाबू पोट धरूधरून हसले. नंतर त्यांनीं विचारलं,

' तुझ्याबरोबरही तिनं भांडण केलं तर ? '

' भांडण कसलं ? उलट चांगलं सूत जमलंय आमचं. '

' बऽऽरं ! मग सूत जमलं तर तुमचं ? '

' हो ! '

' परंतु स्वतःच्या मुलीशीं कधींच जमलं नाहीं तिचं, तिच्याशीं ती नेहमीं भांडत असे. '

' हो, तें मी ऐकलं. '

' कुठून ? '

' मनांतल्या दुःखामुळें तिनं आपण होऊनच थोडंबहुत सांगितलं. '

जयाच्या आईच्या मनांतील दुःख काय होतं हे मात्र मालतीनं उघड करून सांगितलं नाहीं.

'घरांत घुसतां क्षणींच तिनं तुला खूप शिवीगाळ केली असेल ?'

मालतीनं हंसून म्हटलं, 'मला नाहीं शिवीगाळ केली, त्या जखिणीला केली–जिला तुम्ही कलकत्त्याहून आणली आहे तिला.'

'ती जखीण तर तूच आहेस.'

'मीच कशी ? मी कलकत्त्याहून थोडीच आलें आहे ?

'म्हणून काय झालं ? तूंच तर आहेस ती.'

'तिनं मला ओळखलं सुद्धां नाहीं; ती मला दासी समजत होती.'

सुरेन्द्रबाबूंनी दुःखी होऊन म्हटलं, 'असंच असलं पाहिजे. एरवीं तिची समजूत कशी पडली असती ?'

'पण त्यामुळेंच मी तिच्या तावडींतून सही सलामत सुटलें, नाहींतर तिनं कदाचित् मला जिवंत सोडलं नसतं आज.'

'मारून टाकलं असतं ?'

'कदाचित्.'

'मग ?'

'ती हरामजादी इथं नाहीं असं मी तिला सांगितलं. हे ऐकून ती म्हणाली, तिला येऊ दे खरी, खाऊन टाकीन तिला.'

सुरेन्द्रबाबू हंसू लागले.

मालती पुढे म्हणाली,

'नंतर तिनं विचारलं, तिनं तुम्हाला खाऊं बिऊं घातलं आहे कीं काय. मी म्हटलं, हो. असं वाटत खरं, नाहींतर तिच्या शब्दांवर बाबू इतके नाचले नसते.'

'बऽऽरं, तर मग मी हें सगळं करतों तर ?'

'करीत नाहीं ?'

'आतां नाहीं, पुन्हां सांगेन तें. नंतर ?–'

'नंतर त्या जखिणीस मंत्र–तंत्र, जादूटोणा येतो का म्हणून तिनं विचारलं. मी म्हटलं, हो येतो तर. कामरुप देशाहून ही विद्या ती शिकून आली आहे असं ऐकतें. त्यावर तिनं उत्तर दिलं, आपल्यालाही ती विद्या अवगत आहे.

परंतु मनांतल्या मनांत ती फार भिऊन गेली होती हे मला दिसत होतं. पुन्हां तिनं मला विचारलं—तिला मूठ मारतां येते? मी म्हटलं–हो, येते.'

हे ऐकून सुरेन्द्रबाबू खूप हंसले आणि हंसता हंसता त्यांनीं विचारलं, 'हे सगळं ऐकून ती पळून गेली वाटतं?'

'हो.'

'पुन्हां ती आतां इथं कधींच येणार नाहीं.'

'असं कसं होईल? तुमच्या त्या जखिणीकडे नाहीं येणार ती, माझ्या-कडे येईल.'

'वाटेल त्यांच्याकडे तिला येऊं दे, तूं मात्र आतां माझ्याजवळ ये.'

मालती त्यांच्याजवळ गेल्यानंतर तिचे दोन्ही हात धरून ते म्हणाले, 'मालती, किती दिवस तू अजून अशी जोगीण होऊन राहणार? तुझं हें रूप माझ्याच्यानं आतां बघवत नाहीं.'

मालती गालांतल्या गालांत हंसून म्हणाली, 'दागिने घातले तर मी अधिक सुंदर दिसणार आहे होय?'

'तुझ्या सौंदर्याला सीमा नाहीं आणि ज्याला सीमा नाहीं त्यांत अधिक भर घालता येत नाहीं. पण कांहीं नाहीं तरी निदान माझ्यासाठीं तरी'...

'दागिने घालावे लागतील?'

'हो.'

'दागिने घालायला माझी हरकत नाहीं, पण मी दागिने घालावे, हा तुमचा हट्ट कां हें आधी मला सांगा.'

'माझा हट्ट कां हें सांगितलं तर तुला दुःख नाहीं का होणार?'

'मुळींच नाहीं.'

'तर मग सांगतों, ऐक. तुझ्या या साध्या सुध्या मूर्तीत विलक्षण तेज आहे; तुला स्पर्श करायला सुद्धां धीर होत नाहीं. सात्विक तेजःपुंज आणि निर्मळ असं तुझं हें स्वरूप पाहिल्यानंतर माझी पापं माझ्यासमोर उत्कट रितीनें उभीं राहतात. तुला सांगायला कसलीच हरकत नाहीं कीं, तुझ्या जवळ मी येऊन बसलों म्हणजे मला भिती वाटूं लागते! पूर्णांशानं मी तुझ्यांत मिसळून

जाऊ शकत नाहीं. म्हणूनच तुझ्या अंगांवर दागिने चढवून तुझं पावित्र्य थोडंसं तरी कमी करावं असं मला वाटतं.'

मालती कांहींच बोलली नाहीं; खालून वरपर्यंत तिनं आपल्या शरीराला न्याहाळून घेतलं, स्वतःचं प्रतिबिंब आरशांत निरखून पाहिलं. आपण खरोखरीच उज्वल आहोत, आपल्यांत तेज आहे, अजून भूतकाळांतील पुण्याई आपल्याला सोडून गेली नाहीं आणि अजूनहि पावित्र्याची छाया आपल्या शरीरावर आहे असं तिला वाटतं. रात्रीच्या वेळीं त्या निस्तब्ध खोलींत मालतीला थोडासा भ्रम झाला. आरशांत एका कलंकित देवीची मूर्ति आहे आणि त्या मूर्तीजवळ तिचे अकलंकित असे आराध्य देव सुरेंद्रबाबू बसले आहेत असं दिसल्यासारखा तिला भास झाला.

विस्मयाने आणि आनंदाने बेहोप होऊन मालतीने आपले डोळे मिटून घेतले.

दुसऱ्या दिवशीं काळोख पडल्यानंतर सुरेन्द्रबाबूंनी नटवर मोहनच्या वेषांत मालतीच्या मंदिरांत प्रवेश केला. जाई जुई, बकुल आणि कामिनी आदि फुलांच्या माळा त्यांच्या गळ्याला वेष्टून त्यांच्या छातीवर रुळत होत्या. त्यांच्या एका हातांत फुलांचा मोठा गुच्छ होता आणि दुसऱ्या हातांत मखमली पेटी. अंगावर रेशमी वस्त्र धारण करून आणि पायांत जरीचा चढाव घालून ते एकदम मालतीच्या समोर येऊन उभे राहिले. त्यांचा तो वेष बघून मालतीनं हंसत हंसत विचारलं, 'आज हें काय चालवलंय ?'

'सांग बरं तूच ?'

'मला काय माहीत ?'

सुरेन्द्रबाबूंनी कृत्रिम गंभीरता धारण करून म्हटलं,

'तूं पूजा करतेस ना ?'

'हो.'

'मग तुझ्या घरांत चंदन आहे, त्या चंदनाचा मला टिळा लाव. आज माझं लग्न आहे.'

'कुणाशीं ?'

'पहिल्यांदा टिळा लाव मग सांगतो.'

खालीं जाऊन मालतीनं चंदन सहाणेवर घासून आणलं आणि त्याचा टिळा सुरेन्द्रबाबूंना लावून म्हटलं,

'हं. सांगा आतां.'

'तुझ्या लक्षांत अजूनही नाहीं आलं ?'

नंतर सुरेन्द्रबाबूंनीं आपल्या गळ्यांतील फुलांच्या सगळ्या माळा मालतीच्या गळ्यांत घातल्या आणि त्या मखमली पेटींतून नाना प्रकारचे मूल्यवान् दागिने काढून तिच्या अंगावर घातले. मालतीनें तसले दागिने पूर्वीं सगळ्या जन्मांत कधींच पाहिले नव्हते. विस्मित होऊन ती त्यांच्याकडे पहातच राहिली. सगळे दागिने तिच्या अंगावर चढवून आणि तिचं चुंबन घेऊन सुरेन्द्रबाबू म्हणाले, 'तुझ्याशीं माझं लग्न झालं, इतक्या दिवसानंतर तूं माझी पत्नी झालीस. आतां तूं पळून जाणार नाहींस. जी माळ आज मी तुझ्या गळ्यांत घातली ती तुला जन्म—जन्मांतरींही काढतां येणार नाहीं.'

दोघांचेही डोळे भरून आले, कांहीं वेळ कुणीच एकमेकांशीं बोललें नाहीं.

नंतर डोळे पुसून सुरेन्द्रबाबू म्हणाले, 'आतां चल आणि आपलं घर संभाळ. ह्या जीवनांत सदा सुखी रहा असा मी तुला आशिर्वाद देतों.'

मालती त्यांना नमस्कार करून त्यांच्याजवळ जाऊन बसली. तिच्या डोळ्यांतले अश्रू आज खळत नव्हते. वारंवार ती आपले डोळे पुशीत होती आणि पुनः पुन्हां ते भरून येत होते. सुरेन्द्रबाबूंच्या लक्षांत ती कां रडते आहे हे येतांच त्यांनीं विचारलं, 'मालती, आज आई—बापांची तुला आठवण येते आहे कां ?'

मालतीनं मान हलवून म्हटलं, 'हो.'

'माझ्या मनांत होतं तें तूंच तर मला करूं दिलं नाहींस. आतां असं राहूं नये अशी माझी इच्छा होती. तूं माझी झालीस त्याचवेळीं निश्चय केला होता कीं उघडपणें तुझ्याशीं लग्न करीन, पुन्हां एकदां गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून तुझ्या आई—बापांना घेऊन येईन. लोकांनीं कितीहि नांवं ठेवलीं तरी

मी त्याची पर्वा करणार नाहीं, मी तरी सुखी झालो असतो—' नंतर एक दीर्घ श्वास सोडून ते म्हणाले, 'ती आशा तर आतां नष्ट झाली.'

कांहीं वेळ थांबून त्यांनीं पुन्हां विचारलं, 'आतां तरी घरीं चलणार ना?'

'कुठं?'

'तुझ्या घरीं, जिथं मी रहातो तिथं.'

'ते घर माझं नाहीं.'

'तर मग तूं त्या घरीं कधींच येणार नाहींस?'

'नाहीं.'

'हं. मला असं वाटलंच होतं.'

## १४

दुःखाचे दिवस लवकर संपत नाहींत हें खरं. तरी पण संपतातच हळूहळू. माधवच्या मृत्यूनंतर शुभदाचे दिवसही असेच हळूहळू निघून गेले. ते पावसाचे दिवस होते, आकाशांत ढगांची गर्दी झाली होती आणि रस्त्यांवर व घाटांवर चिखल झाल्यामुळें पाय घसरत होते. पावसाळा संपून आतां शरद् ऋतूची सुरवात झाली होती. आकाशांत आतां ढग नव्हते, रस्त्यांवर घसरण नव्हती आणि रस्ते व घाट सुकून कोरडे झाले होते. म्हणून मधून पांढऱ्या ढगांचे पुंज ध्येयहीनाप्रमाणें आकाशांत फिरून कुठं तरी निघून जात होते. पावसाळ्यांत निसर्गदेवता नेहमी क्लांत दिसायची आणि तिच्या डोळ्यांतून सारखा वर्षाव व्हायचा. पण

आतां तसं कांहीं होत नव्हतं. कधीं कधीं निसर्गदेवतेचा चेहरा भकास दिसतो आणि तिच्या डोळ्यांतून दोन चार थेंब गळतात खरे, पण तें सारं क्षणभरच. लगेच अश्रू पुसून ती हंसू लागते. भूतकाळांतील दु:खानं कधीं कधीं आभाळां-तील एखाद्या कोपऱ्यांतून 'गडगड' करीत ती रडते खरी, परंतु त्या रडण्यां-तही आतां सातत्य उरलें नव्हतें. नेहमी एकाच चाकोरींतून जीवन कंठायचा कंटाळा निसर्गदेवतेला सुद्धां येतो असं ह्याच्यावरून दिसतं. परिवर्तन झाल्या-शिवाय जग चालणं कठीण होऊन जातं हें सगळ्यानांच समजतं, परंतु हें सम-जत नाहीं फक्त. शुभदाच्या भाग्य-विधात्याला! आपल्या जीवनाकडे पाहिल्या-वर शुभदेला ह्या गोष्टींची सारखी जाणीव होत होती आणि तशीच सदानंद चक्रवर्तीला सुद्धां. गांवांतलीं चार माणसं नेहमी पाहात होतीं—शुभदा घाटा-वरून स्नान करून परत येत होती, घरचं कामकाज करीत होती. परंतु रोज थकत, खंगत चाललेली होती.

म्हाताऱ्या बाया म्हणत, 'विचारी आतां फार दिवस कांहीं काढीत नाहीं. अरेरे!'

ज्या समवयस्क होत्या त्या म्हणत, 'देवानं असलं दुर्भाग्य वैऱ्याला सुद्धां देऊ नये.'

पाठीमागे समळींच 'अरेरे' म्हणत असत. परंतु तिच्या तोंडावर म्हणा-यला त्यांना लाज वाटत होती. कदाचित् 'अरेरे' हा शब्द शुभदाच्या बाबतींत उच्चारायला योग्य नव्हता. कुठला तरी दुसरा शब्द,—ज्याचं अस्तित्व नाहीं, ज्याचा कुणी प्रयोग केला नाहीं किंवा करायची वेळ आली नाहीं—असा शब्द कुणी हुडकून काढला तर शुभदाच्या बाबतीत उच्चारायला कदाचित् तो योग्य ठरला असता. म्हणूनच शुभदा आली कीं कुणी तिच्या समोर बोलायचं नाहीं, सगळीं तोंड मिटून रहात. नदींत स्नान करीत असतांना मुलेंबाळें दंगा करून एकमेकांवर पाणी उडवून हंसून खिदळून आणि आपल्या धांद-लीने कलकलाट करून प्रौढ स्त्रियांच्या शिव-पूजेंत व्यत्यय आणित असत. परंतु एखाद्या अस्पृश्य जातींतल्या स्त्रीप्रमाणें घाटाच्या एका कोपऱ्यावर कळशी घेऊन जेव्हां शुभदा पाण्यांत उतरत असे तेव्हां तीं मुलेंबाळें गप्प

होऊन आपल्या आईचा किंवा दुसऱ्या कुणातरी ममतेच्या माणसाचा पदर धरून तिच्याकडे गपचुप टक लावून पाहात असत. ती निघून गेल्यानंतरही पुष्कळ वेळपर्यंत त्यांच्या धांदलीला आणि हंसण्याखेळण्याला सुरवात होत नसे.

शुभदा हंसणं—रडणं सगळंच विसरून गेली होती. रडण्याची तर आतां तिडीक बसून गेली होती आणि जुन्या गोष्टी घोळीत बसण्यांत तिला लाज वाटत होती. आजकाल तिचं घर सुनं झालं होतं; छलना सासरी गेली होती, रासमणि दिवसभर कुठेतरी असायची, आणि हारान मुकर्जी ? आजकाल तो थोडासा चांगला वागत होता. रोज दोन्हीं वेळां घरीं येत होता, पूर्वीप्रमाणेंच पैसे मागून घेत होता आणि पुन्हां बाहेर निघून जात होता. शुभदा सारा दिवस स्वयंपाकघराच्या जमिनीवर पदर पसरून पडलेली असे. संध्याकाळ झाली कीं ती उठत असे, गंगेवर जाऊन पाणी आणत असे, दिवा लावत असे आणि स्वयंपाक करीत असे.—काळजीपूर्वक एक ताट वाढून आपल्या नवऱ्यासाठीं झाकून ठेवीत असे, आणि सदानंदाला खावू—पिऊ घालीत असे. पुन्हां सकाळ, नंतर संध्याकाळ आणि नंतर रात्र.

रोजच्याप्रमाणें शुभदा आजही दुपारीं स्वयंपाकघरांत पदर पसरून आडवी झाली होती. बाहेरून कुणीतरी पुरुषी आवाजांत हांक मारली, ‘ आईसाहेब ! ’

शुभदानं ऐकलं, पण बोलली नाहीं. कुणीतरी दुसऱ्यालाच हांक मारीत असेल असं तिला वाटलं.

त्यानं पुन्हां हांक मारली, ‘ अहो आईसाहेब ! कुणी घरांत आहे का ? ’

शुभदानं बाहेर येऊन विचारलं, ‘ कोण ? ’

‘ मी पोस्टमन, पत्र आलं आहे. ’

शुभदाला मोठं आश्चर्य वाटलं—पत्र कुणाचं ? जवळ जाऊन म्हणाली, ‘ दे इकडे. ’

‘ हें पत्र असंच मिळणार नाहीं आईसाहेब, हें रजिस्टर,—श्री शुभदा देवींच्या नांवावर आलं आहे, त्यांची सही पाहिजे. ’

रजिष्टरचा अर्थ शुभदाला नीट कळाला नाहीं; ती तशीच म्हणाली, ‘ दे इकडे. शुभदा माझंच नांव आहे. ’

पोस्टमननें पत्र काढलं आणि त्याशिवाय दुसरा एक कागद काढून तो म्हणाला, ‘ याच्यावर सही करा. ’

शुभदाला लिहितां येत होतं. ती म्हणाली, ‘ दऊत–टांक दे. ’

पोस्टमन तिच्याकडे पाहात हंसून म्हणाला, ‘ दऊत–टांक मी कुठून आणूं ? तुमचं घर आहे, घरांत दऊत–टांक नाहीं ? ’

‘ पाहतें, हं, ’ असं म्हणून शुभदानं वर, खालीं सगळीकडे हुडकलं. शेवटीं तिला छलनाची एक अर्धी फुटलेली दऊत सांपडली. पण तिच्यांतली शाई सुकून गेली होती. पाणी घालून शेवटीं शाई कशी तरी तयार केली परंतु लेखणी कुठे होती ?

एकदम शुभदेला माधवच्या दप्तराची आठवण झाली. वरच्या खोलींत एका कोपऱ्यांत चवरंगावर बसून माधव आणि छलना अभ्यास करीत असत, ललना त्यांची मास्तरीण होत होती. शुभदेनं वर येऊन पाहिलं, एका कोपऱ्यांत त्याच चौरंगावर त्याचप्रमाणें शाई लागलेल्या कपड्यांत एक दप्तर गुंडाळून ठेवलं होतं. शुभदा फार दिवस झाले, इकडे आली नव्हती आणि तिने इकडे नजर देखील फिरविली नव्हती. ही ललनाची खोली होती, ललना मेल्यानंतर ती आजच ह्या खोलींत आली होती. दप्तर हातांत घेऊन तिनं तें हळू हळू उघडलं – एक फुटकी स्लेट पाटी, अर्धा फाटून गेलेला एक चित्रबोध, प्रश्नोत्तरांचं पहिलं पुस्तक, दोन दगडी पेन्सिली, दोन चाकू, दोन लेखण्या आणि जुन्या पंचांगांतून फाडलेलीं चार-पांच चित्रें—एवढं साहित्य त्यांत होतं. शुभदाने फक्त एक लेखणी घेऊन तें दप्तर मोठ्या कष्टाने तसेंच बांधून ठेविलें. माधवची ती आवडती मालमत्ता होती.

खालीं येऊन शुभदानं पत्र घेतलं. खोलींत जाऊन पत्र फोडून पाहिलं. तों त्यांतून एक पन्नास रुपयांची नोट निघाली. खात्रीनं कांहीं तरी घोटाळा झाला असला पाहिजे असा विचार करून पोस्टमनला बोलावण्यासाठीं ती बाहेर

आली, परंतु मोठ्यानं हाक मारूनही तो परत आला नाहीं. तेव्हां निरुपाय होऊन ती नोट घेऊन ती खोलींत परत आली.

कांहीं वेळ गेल्यानंतर आपली चूक लक्षांत येऊन पोस्टमन परत येईल असं शुभदाला वाटलं. परंतु तो परत आला नाहीं आणि दुसऱ्या दिवशीं सुद्धां त्या बाजूला फिरकला नाहीं. मग मात्र शुभदानं सदानंदाला ती गोष्ट सांगितली. सदानंदानं विचार करून म्हंटलं, ‘ घोटाळा तर झाला नाहीं ? ह्या गांवांत तुमच्याच नांवाची दुसरी बाई कुणीच नाहीं आणि शिवाय हारान मुखोपाध्यायांचं घर असा वर पत्ता आहे; तेव्हां हे पत्र तुमच्याच नांवानं आलं आहे हे निश्चित. परंतु कलकत्त्यांत तुमचं कोण आहे ? ’

‘ कलकत्त्यांत माझं कुणीच नाहीं. ’

दुसऱ्या दिवशीं पोस्ट ऑफिसांत चौकशी करून आल्यानंतर सदानंदानं म्हटलं, ‘ अघोरनाथ बसू नांवांच्या वकीलानं कलकत्त्याहून हे पैसे पाठविले आहेत. ’

शुभदानं विस्मित होऊन म्हटलं, ‘ या नांवाच्या कुठल्याच माणसाला मी ओळखत नाहीं. ’

‘ मग ? ’

‘ तूंच काय तें बघ बाबा. ’

सदानंदानं हंसून म्हटलं, ‘ काय करूं ? रुपये घ्यायचे नसतील तर परत करून टाका. ’

‘ बाबा, जेव्हां मुलंबाळं होती, उपाशीं मरत होती, तेव्हां सुद्धां मी हे रुपये घेतले नसते. हे पैसे माझे नाहींत, तूं परत करून टाक ते. ’

थोडासा विचार करून सदानंद म्हणाला, ‘ कलकत्त्याला मी स्वतःच जाऊन हे पैसे कुणी पाठविले आहेत ह्याचा पत्ता लावतों. तोंपर्यंत हे पैसे तुमच्याच जवळ राहूं देत—परत पाठविण्यासारखे असतील तर परत पाठवून देऊं. ’

'पाठविण्यासारखे वगैरे कांहीं नाहीं. तूं हे पैसे तुझ्याच बरोबर घेऊन जा आणि त्यांना परत करूनच ये. कदाचित् दुसऱ्या कुणाचे तरी असतील, चुकून माझ्या नांवानें पाठवून दिले आहेत.'

'जे काय करायचं ते तिथंच जाऊन ठरवितों.'

'हो, तसंच कर बाबा.'

# १५

श्री अघोरनाथ बसु वकील महाशय आपल्या कचेरीच्या एका प्रशस्त खोलींत बसले होते. त्यांच्या समोर टेबलाच्या दुसऱ्या बाजूला नारायणपुरचे जमिनदार श्री सुरेन्द्रनाथ बसले होते. टेबलावर दाव्यांच्या कागदपत्रांचा ढीग पडला होता. ते दोघे अस्वस्थपणें कागद-पत्र उलटण्यांतच मग्न झाले होते.

कांहीं वेळेनंतर आपली मान वर करून सुरेन्द्रबाबू म्हणाले,

'अघोरबाबू, कदाचित् हा दावा मी जिंकणार नाहीं.'

'आतांच कांहीं सांगतां येत नाहीं.'

'कां नाहीं सांगतां येत? खात्रीनं सांगतां येईल, हा दावा मी हरणार हें मला स्पष्टच दिसत आहे.'

'परंतु हायकोर्टच्या नंतर सुद्धां आपल्याला मार्ग मोकळा आहे.'

''आहे, परंतु इतकं दूर जायची माझी इच्छा नाहीं.'

'तर मग मालपुरंची इस्टेट गमावून बसणार?'

'दुसरा उपाय तरी काय आहे?'

'भलं भक्कम उत्पन्न नाहींसं होईल.'

'होईल खरं! जवळ जवळ अर्धं उत्पन्न नाहींसं होईल.'

अघोरबाबू गप्प बसले. सुरेन्द्रबाबूंचा अंदाज खरा ठरणार हे त्यांनी मनांत कळून चुकलं होतं. त्यामुळें ते खिन्न होऊन गेले होते.

त्याचवेळीं एका नौकारानें येऊन म्हटलें, 'एक गृहस्थ तुम्हाला भेटायला आले आहेत.'

अघोरबाबूंनी त्याच्याकडे पाहून विचारलें, 'कोण?'

'ओळखीचा नाहीं. दिसायला कुणी ब्राह्मण पंडित वाटतो.'

'त्याला जाऊन सांग कीं सध्यां मला फुरसत नाहीं.'

कांहीं वेळानें नौकरानें पुन्हां येऊन म्हटलें, 'ते जात नाहींत, म्हणतात फार जरूरीचं काम आहे.'

अघोरबाबू चिडल्यासारखे झाले—तरी त्यांनीं सुरेन्द्रबाबूंकडे वळून विचारलं, 'इथंच बोलवूं का त्याला?'

'काय हरकत आहे?'

त्यांनी नौकराला त्या गृहस्थाला पाठवून द्यायचा हुकूम केला. कांहीं वेळानंतर एक लांबरुंद आणि गोऱ्यापान रंगाचा एक ब्राह्मण येऊन तिथे उपस्थित झाला. गळ्यांत जानवं, डोक्यावर शेंडी, कपाळावर गंधाचा टिळा वगैरे ब्राह्मणाचीं लक्षणं त्याच्या अंगावर कांहींच नव्हतीं. तो बिन कांठाचं एक धोतर नेसला होता आणि अंगावर एक मळकं उपरणं होतं. तो अनवाणीच आला होता. त्याच्या पाठीवर गुढघाभर धूळ सांचली होती. दोघेही त्याच्याकडे पाहूं लागले. अघोरबाबूंनी म्हटलं, 'बसा.'

ब्राह्मण जवळच्याच चौरंगीवर आसनस्थ होऊन म्हणाला,

'वकीलसाहेब, बाबू अघोरनाथ बसूंच्याकडे.......'

'माझंच नांव अघोरनाथ आहे.'

'तर माझं काम तुमच्याशींच आहे. सांगायचं आहे तें इथंच सांगू का?

'हो, कसलीच हरकत नाहीं.'

त्यानें आपल्या मळक्या उपरण्यांतून एक लिफाफा बाहेर काढून म्हटलें, ' शुभदा देवीला हे पैसे आपणच पाठविले होते कां ? '

अघोरबाबूंनी तो लिफाफा न्याहाळल्यानंतर म्हटलें,

' हो मीच पाठवून दिले होते. '

ब्राह्मणानें विस्मित होऊन विचारलें, ' हलुदपुरच्या हारान मुकर्जींच्या घरीं शुभदा देवीला ? '

' होय, त्यांनाच. '

' कां ? '

' माझ्या अशीलाच्या सांगण्यावरून. '

' कोण हे तुमचे अशील ? '

अघोरबाबूंनी सुरेंद्रबाबूकडे कटाक्ष फेकून म्हटलें, ' तें सांगतां येत नाहीं. '

' तर मग हे पैसे परत घ्या; जिला तुम्ही हे पैसे पाठविले होते ती ह्यांचा स्वीकार करीत नाहीं. ती तुम्हालाही ओळखत नाहीं. आणि तुमच्या अशीला-नाही ओळखत नाहीं. ही गोष्ट सांगून तुम्हाला पैसे परत करायला तिनं मला मुद्दाम पाठवून दिलं आहे. चुकून दुसऱ्यांच्या ऐवजीं आमचाच पत्ता पाकिटावर तुम्ही लिहिला असाल अशी आमची कल्पना होती. '

अघोरबाबूंनीं हंसून म्हटलं, ' वकीलांच्याकडून चूक सहसा होत नाहीं.'

' होत नाहीं तर ठीक आहे. हे आपण परत घ्या आतां— '

' मला तेंही करतां येत नाहीं. अशीलाच्या सांगण्याविरुद्ध मला जाता येत नाहीं. '

' तर मग त्यांना विचारून कळवा म्हणजे मी पुन्हां येऊन पैसे परत करून जाईन.'

तो ब्राह्मण उठून चालला होता पण सुरेन्द्रबाबूंनी त्याला थांबवून विचारलं, ' आपलं नांव ? '

' माझं नांव सदानंद चक्रवर्ती. '

सुरेंद्रबाबू नांव ऐकतांच एकदम दचकले...कांहीं वेळ त्याच्याकडे पाहून त्यांनी विचारलें,

'आपण इथं उतरला आहांत कुठं ?'

'उतरायचं कुठं याचा अजून विचार केला नाहीं. गांवाहून निघालों तो सरळ इथेंच आलों आणि आजच परत जायचा विचार आहे.'

सुरेन्द्रबाबूंनी अघोरबाबूकडे पाहून म्हटलें, 'आतां जाईन, रात्रीं पुन्हां येऊन जाईन.' पुन्हां त्यांनी सदानंदाकडे वळून म्हटलें, 'आपल्याशीं मला थोडंसं बोलायचं आहे.'

'बोला.'

'इथं नाहीं. माझ्या घरीं. माझं घर इथून जवळच आहे आणि आपली हरकत नसली तर आपणही माझ्या घरीं चलावं अशी माझी इच्छा आहे. तिथंच मी तुमच्याजवळ जें बोलायचं आहे तें बोलेन.'

सुरेन्द्रबाबूंच्या घरीं जायला सदानंदाची कसलीच हरकत नव्हती. दोघेहि गाडींत येऊन बसल्यानंतर सदानंदानें विचारलें, 'ह्या पूर्वीं आपल्याला कधीं पाहिल्याचं मला आठवत नाहीं...पण...पण...' आपण कधीं मला पाहिलं आहे ?'

'नाहीं, कधींहि पाहिलं नाहीं; परंतु मी तुम्हाला ओळखतो.'

'ओळखतां ? कसं ?'

'घरीं चला, तिथंच सांगेन.'

कांहीं वेळानें गाडी घरीं येऊन पोहोंचली. नंतर सुरेन्द्रबाबू म्हणाले, 'मी ब्राम्हणच आहे, उशीर झाला आहे तेव्हां आपण भोजन वगैरे इथंच आटोपून घ्या. आपली कांहीं हरकत नाहीं ना ?'

'मुळींच नाहीं.'

जेवणखाण उरकून जेव्हां ते दोघे एकत्र बसले तेव्हां सुरेन्द्रबाबूंनी विचारलं, 'शुभदा देवीची स्थिति गरीबीची नाहीं काय ?'

'शुभदादेवीची परिस्थिति गरीबीची आहे, म्हणून का—'

'समजलों. म्हणून दान कां घेतील असंच ना ?'

'हो थोडंसं असंच आहे. विशेषतः दान देणाऱ्याचं नांव माहीत नसतांना... '

'परंतु त्यांत हरकत कसली आहे? जो दान करतो आहे तोच म्हणतो आहे, ह्याच्यांत चूक–बिक कांहीं नाहीं; सत्पात्रीं दान होतें आहे.'

'कुणी दान दिलं आहे हें?'

'घटकाभर समजा कीं अघोरबाबूंनीच... '

'अघोरबाबूंना काय अधिकार आहे?'

सुरेन्द्रबाबूंनी थोडंसं दचकून म्हटलं, 'परंतु दान करायचा अधिकार सगळ्यानांच आहे.'

'असूं शकेल; म्हणून सगळ्यांनींच कां त्याचा स्वीकार करावा?'

'करूं नये; परंतु ज्यांची स्थिति चांगली नाहीं त्यांनी स्वीकार कां करूं नये?'

सदानंद थोडासा रागावून म्हणाला, 'अशा तऱ्हेची भीक न घेता सुद्धां शुभदा देवींचं चांगलं चाललं आहे.'

'आजकाल चालत असेल कदाचित्, परंतु पूर्वीं चालत नव्हतं ना?'

'ह्या गोष्टींचा संबंध? बरं ह्या गोष्टी आपल्याला कळल्या कशा?'

'मला सगळं माहीत आहे. हारानबाबू एक पैसाही घरीं आणून देत नाहींत. उलट त्यांना किती तरी दुर्व्यसनं आहेत, त्यामुळेंच म्हणतों कीं जो आपल्या मुलाबाळांचं पालन–पोषण करीत नाहीं, त्याच्या घरचा संसार इतरांच्या मदतीवरच चालत असला पाहिजे.'

सदानंद संकटांत पडल्यासारखा दिसला. थोडा वेळ तो कांहींच बोलला नाहीं.

सुरेन्द्रबाबूंनीं पुन्हां विचारलं, 'सध्यां हारानबाबू काय करतात?'

'कांहींच नाहीं.'

'समजलं. तुमच्याच मदतीवर त्यांचा संसार चालू आहे असंच ना?'

'मदत परमेश्वर करीत असतो. मी एक दरिद्री क्षुद्र प्राणि.'

'छलनामयींचं लग्न झालं?'

'हो, झालं.'

'कुठें ? कुणाशीं ?'

'आमच्याच गांवांत. शारदाचरण रायशीं.'

'माधवची प्रकृती कशी आहे ?'

'तो गेला सगळ्यांना सोडून. फार दिवस झाले त्याला.'

'अरेरे ! त्यांची मोठी मुलगी आतां कुठं असते ?'

सदानंदानं विस्मित होऊन म्हटलं, 'कुठं आहे याचा अर्थ ? ती सुद्धां आतां हयात नाहीं.'

'हयात नाहीं ?'

'हो. गंगेंत बुडून आत्महत्त्या करून घेतली तिनं.'

'तुम्हांला कसं कळालं ? तिचं प्रेत सांपडलं होतं कां ?'

'प्रेत नाहीं सांपडलं; गंगेच्या कांठीं पडलेली तिची साडी सांपडली होती. त्यामुळेंच तिनं आत्महत्त्या केली असं सगळ्यांना समजलं.'

'याबद्दल आतां कुणाला संशय तर नाहीं ना ?'

'मुळींच नाहीं.'

त्यानंतर कांहीं वेळ दोघेही गप्पच होते.

थोड्या वेळानं पुन्हां सुरेन्द्रबाबूंनीं म्हटलं, 'समजा, तिनंच पैसे पाठविले असले तर ?'

'कुणी ? ललनानें ?'

'ललना कोण ? तिचं नांव काय ललना होतं ?'

'हो.'

'मला वाटलंच तें—ललनाच. ललना—छलना दोघी बहिणी ना ?'

'हो.'

'तर मग समजा तिनेंच पैसे पाठविले असले तर ?'

'मेली तिनं ?'

'हो तिनंच. गंगेच्या किनारी तिची साडी सांपडली म्हणून ती मेली असं सिद्ध होतं का ? आणि तिनेंच हे पैसे पाठविले असले तर ?'

सदानंद फारच अस्वस्थ होऊन गेला. कांहीं क्षण खालीं मान घालून विचार केल्यानंतर तो म्हणाला. ‘ ती जिवंत नाहीं, असती तर पत्र पाठविल्यावांचून ती राहिली नसती. ’

‘ पत्र लिहायला तिला लाज वाटत असली तर ? ’

‘ मी ललनेला ओळखतों. लाज वाटण्यासारखं कृत्य तिच्या हातून कधींच होणार नाहीं आणि जिवंत असली तर ती लपून रहाणार नाहीं. ’

‘ ती मेली नाहीं, जिवंत आहे. तिनेंच हे पैसे पाठविले आहेत; आणि इतकंच नव्हे तर आतां ती दर महिन्याला पाठवून देत जाईल. ’

सदानंदानं आपलं मस्तक दाबून विचारलं, ‘ आपलं नांव ? ’

‘ सुरेन्द्रनाथ राय ’

‘ निवासस्थान ? ’

‘ नारायणपूर. ’

‘ आपल्याला हारानबाबूंची सारी हकीकत कशी कळली ? ’

‘ ललनानें सांगितली. ’

‘ ललनाने सांगितली ? नाहीं, ती मेली आहे. ’

‘ ती मेली नाहीं. आनंदांत आहे. ’

‘ ती स्वर्गांत आहे. ’ असं म्हणून सदानंद जायला निघाला.

सुरेन्द्रबाबूनीं ओरडून म्हटलं, ‘ सदानंदबाबू, थांबा जरा... ’

‘ नाहीं. मी जातों... ’

‘ थांबा... आणखिन् एक गोष्ट... ’

‘ ती कधीं भेटली तर तिला सदानंदाने आशीर्वाद दिले आहेत असं सांगा. ’

‘ तिच्या आईला सांगा... ’

‘ हो, स्वर्गांत गेली आहे म्हणून ! ’ सदानंद हळू हळू निघून गेला तो परत फिरला नाहीं कीं त्यानं मागं वळून पाहिलं नाहीं.

सदानंद निघून गेल्यानंतर सुरेन्द्रबाबू किती तरी वेळ आश्चर्यचकित होऊन काष्ठवत् स्तब्ध बसले होते. कांहीं दिवसांपूर्वीं जर असा प्रसंग घडला

असता तर ते कदाचित् त्यावेळीं हंसले असते; परंतु आज त्यांचे डोळे भरून आले होते.

त्याच वेळीं एका नौकरानं बाहेरून ओरडून विचारलं, 'बाबू, गाडी तयार करूं का ?'

'हो, कर तयार.'

छेः छेः—जाणून बुजून मनुष्य असलं विष सुद्धां खाऊन पचावितो !

# १६

रात्र बरीच झाली होती तरी अजून मालती आपल्या खोलींत 'सीता-वनवास' वाचीत बसली होती. पुस्तक वाचीत असतांना ती किती रडली, कित्तीदां तरी तिनं आपले डोळे पुसले. तरी ती पुस्तक वाचीतच होती. किती सुरेख होतं तें पुस्तक ! खालीं ठेववत नव्हतं अगदीं !

ह्याच वेळीं बाहेर दारांत उभें राहून गद्गद् स्वरांत कुणी तरी हांक मारली; 'ललना.'

मालती शहारून उठली—तिच्या हातून पुस्तक आपोआप गळून पडलं.

'ललना !'

मालतीच्या हृद्याचा थरकांप झाला. तिनं क्षीण स्वरांत विचारलं, 'कोण ?'

सुरेन्द्रनाथ हंसत हंसत खोलींत आले आणि पुन्हां त्यांनी त्याच आवाजांत हांक मारली, ' ललना ! '

' तुम्ही ? '

' हो, मी ! कशी पकडली, चोरी एकाची ! नांव बदलून फसवायचा विचार होता का ? '

' कुठे ? '

' पुन्हां खोटं ? ' नंतर तिच्या ओठांचं चुंबन घेत सुरेन्द्रबाबू म्हणाले, ' सगळं ऐकलं ! होतीस ललना—झालीस मालती. '

' कुठं ऐकलं ? '

' कलकत्त्यांत. '

' कलकत्त्यांत तर मला कुणीच ओळखत नाहीं. '

' कलकत्त्यांत तुला कुणीच ओळखत नाहीं हे खरं आहे, परंतु तुला ओळखणारा हलुदपुराहून तिथं आला होता. '

' कोण ? '

' तुझा सदा दादा नोट परत करायला अघोरबाबूंच्याकडे आला होता. '

' नोट परत करायला ? '

' हो. '

' सदा दादा ? '

' हो, हो, सदा दादाच. '

मालती गप्प बसली.

कांहीं वेळाने सुरेन्द्रनाथच म्हणाले, ' कां, गप्प कां राहिलीस ? '

' कसा आहे सदा दादा ? '

' खुशाल आहे. तुझी आईसुद्धां खुशाल आहे. त्यांची स्थिती सुधारली आहे म्हणून त्यांनीं तूं केलेल्या दानाचा स्वीकार नाहीं केला. सदानंदबाबूंच्या मुळं परत त्यांना चांगले दिवस लाभले आहेत. '

' माझं नांव ललना आहे हें कसं माहीत झालं ? '

'सदानंदानं सांगितलं. गंगेत बुडून तूं जीव दिलास अशीच सगळ्यांची समजूत होती.'

मालतीनं एक दीर्घ निश्वास सोडला.

'तूं जिवंत असून आनंदांत आहेस असं मी त्याला सांगितलं.'

'कां सांगितलं तुम्ही हें?'

'तर मग काय खोटं बोलूं? तू जिवंत आहेस आणि आरामांत आहेस. होय, आहेस ना?'

'हो आहे. परंतु ही गोष्ट काय सदादादानें आपण होऊन विचारली होती?'

'नाहीं, मी आपण होऊनच सांगितली आणि तुझ्या आईला पण सांगायला सांगितलें.'

'मीच पैसे पाठवून दिले होते हे सुद्धां सांगितलं कां?'

'हो.'

'सगळा घोटाळा करून टाकला तुम्ही. तो वेडा आहे. मी जिवंत आहे हें सगळ्या गांवभर सांगत हिंडेल तो. मी मेले आहे अशीच जर त्या लोकांची समजूत होती तर तुम्ही निष्कारण मला कां परत जिवंत केलंत?'

सुरेन्द्रबाबूंना दुःख होऊन ते हंसून म्हणाले, 'ज्याला तुम्ही वेडा-खुळा समजत होतां, वास्तविक पाहाता तो तसा मुळींच नाहीं. कधी काळीं तो खुळा असेल, परंतु आज तो तसा राहिला नाहीं. हलुदपुरांत तूं जिवंत असल्याची बातमी त्याच्यामुळं फुटणार नाहीं. तूं आपण होऊनच स्वतः गुप्त रहाते आहेस तोंपर्यंत तो तुला प्रकट करणार नाहीं.'

'हें तुम्हाला कसं कळलं?'

'मला कळलं. तूं जिवंत आहेस हे तुझ्या आईला सांगायला जेव्हां मी त्याला सांगितलं तेव्हां तो म्हणाला—' लाज वाटण्यासारखी गोष्ट ललना कधींच करणार नाहीं—स्वतःला कधींच लपवून ठेवणार नाहीं—ती जिवंत नाहीं—ती मेली आहे.—' मी म्हटलं, 'ती खुशाल आहे.'—त्यानं म्हटलं 'नाहीं, ती स्वर्गांत आहे.' 'थांबा जरा सदानंदबाबू,' मी म्हटलं, तेव्हां तो म्हणाला—

'नाहीं, मी जातों. ती भेटली तर सदादादानं तिला अनेक आशीर्वाद दिले आहेत असं सांगा.' मालती, माझाच तर्क खरा ठरला—जें विष मी पिऊन चुकलों आहे तेंच विष तोही पिऊन चुकला आहे. माझं भाग्य चांगलं म्हणून माझ्या बाबतींत त्या विषाचं अमृत झालं आणि त्याच्या बाबतींत हालाहल!'

मालती खालीं मान घालून ऐकत होती. रडायची तिला फार इच्छा होत होती; परंतु लाज वाटत होती.

'आणखिन् एक शुभ-समाचार. तुझ्या छलनाचं लग्न झालं.'

मालतीनें मान वर करून विचारलें, 'झालं? कुठें? कुणाशीं?'

'त्याच गांवांत; शारदाचरण का कोण—त्यांच्याशीं.'

मालतीच्या लक्षांत सगळ्या गोष्टी आल्या. मनांतल्या मनांत त्याला सहस्र धन्यवाद देत ती म्हणाली, 'छलनाशीं लग्न करील तर तोच करील हे मला थोडं फार माहीत होतं.'

'ते तुला कसं माहीत झालं? पूर्वीपासून बोलणीं चालली होतीं का?'

'नाहीं, बोलणीं चाललीं नव्हतीं. परंतु छलनाशीं लग्न करायला मी त्याला विनवलं होतं. परंतु त्यावेळीं वडिलांच्या भीतीनं तो तयार झाला नव्हता. नंतर मी मेलें असं समजून, दया येऊन त्यानं लग्न केलं असावं असं वाटतं.'

'वडिलांची भीति कसली?'

'ते फार लोभी गृहस्थ आहेत. मुलाच्या लग्नानिमित्तानें त्यांना पैसे उकळायचे होते.'

'मग ते तयार कसे झाले? तुझ्या वडिलांच्याजवळ तर तें सामर्थ्य नव्हतंच!'

'कुणाला माहीत!'

मालतीनं मनांत विचार केला—ज्या प्रेमामुळं सुरेन्द्रबाबूंचं एवढं परिवर्तन झालं, आपल्या मुलावरील त्याच प्रेमाच्या प्रभावामुळें कदाचित् तेही तयार झाले असतील—परंतु हा विचार मालतीनं उघड रीतीनं त्यांना बोलून दाखवला नाहीं.

काळजी करण्यासारखी सामग्री आज मालतीला बरीच मिळाली होती. त्यामुळें तिला जास्त वेळ बोलत बसावं असं वाटत नव्हतं. परंतु त्याच वेळीं तिला माधवची आठवण झाली. तिनं विचारलं, ' माधव कसा आहे तें विचारलं होतं ? '

' तो बरा आहे. '

मालतीनं सुटकेचा एक श्वास सोडला. बराच वेळपर्यंत ती रात्रीं जागत राहिली होती. तिच्या मनांत किती तरी गोष्टी येऊन गेल्या. तिचं अंतःकरण सारखं तळमळत होतं. तिला वाटलं—'सदानंद पैसे परत करायला आला होता, त्यांच्या घरांत आतां कसलीच कमतरता नाहीं ! मीही आतां पैसे पुन्हां पाठविणार नाहीं ! ' त्यानंतर शारदाचरणचा विचार तिच्या मनांत आला. पहिल्यांदा त्याला तिनें शंभर धन्यवाद दिले होते. आतां मनांतल्या मनांत तिनें सहस्र धन्यवाद दिले. मनांतल्या मनांत म्हणाली—' मला क्षमा करा, त्यावेळीं पुरतं ओळखलं नव्हतं मी तुम्हाला. आतां कदाचित् पुन्हां मी तुमच्या दृष्टीस पडणार नाहीं. परंतु जिवंत जीव आहे तोंपर्यंत तुमची ही दया मी विसरणार नाहीं. हृदयांत नेहमीं तुमचीच पूजा करीत आले होतें, ह्यापुढेंही सदैव करीत राहीन. '

तिनं आपल्या हृदयाचा ठाव घेऊन पाहिला. शारदाचरणची अस्पष्टशी छाया अजूनही तिथून लोप पावली नव्हती. आज पुन्हां ती जास्तच उज्ज्वल झाली. मनांतल्या मनांत म्हणाली, ' माझे पती म्हणतात कीं तो सदानंद आहे; नाहीं, नाहीं, तो सदानंद नव्हे; शारदाचरण ! '

# १७

सदानंद परत गांवीं आला. रस्ता चालतांना तो आपल्याशींच विचार करीत आला होता; त्याचें मन ठिकाणावर नव्हतें. रस्त्यानें त्याला कुणी अडवून विचारी, 'दादा, कुठून आलांत ?' दादा मान हलवून 'हूं' म्हणत असे. एकानं त्याला विचारलं, 'कुठं गेलां होता ?' सदानंदानं त्याच्याकडे पाहात म्हटलं, 'घरीं चाललों.' या दरम्यान प्रश्न विचारणाऱ्याचे बैल एका शेतांत घुसले होते; शिव्या देत देत तो बैलांच्या मागें धावला. सदानंद परत आपल्या रस्त्यानें चालूं लागला. बैलांना घेऊन परत आल्यानंतर तो आपल्याशींच म्हणाला, 'वेड्याचं डोकं आज ठिकाणावर दिसत नाहीं; किती विचित्र गृहस्थ आहे हा.'

नंदा हलवायाच्या चौकटीला पाठ टेकून रामू मामा तंबाखू पीत बसले होते. धुळीनं भरलेले सदानंदाचे पाय पाहून त्यानें विचारलं, "अरे सदानंद, चार-पांच दिवसांत तूं दिसला नाहींस? कुठं गेला होतास ?'

सदानंदानं वळून देखील न पाहतां पाठीमागें बोट दाखवून म्हटलं, 'तिथं !'

'कुठं ? ब्राह्मणपाड्याला ?'

'हो.'

'इतके दिवस ?'

'हो.' एवढंच तुटकपणें उत्तर देऊन तो पुढें चालूं लागला. रामू मामाला राग आला. तो म्हणाला, 'हत्तिच्या! काय बडबडला कुणाला ठाऊक! समजलंच नाहीं.'

रामू मामाचे शब्द सदानंदानें ऐकले नाहींत, किंवा त्याला ऐकावेसे वाटले नाहींत. तो सरळ शुभदाच्या जवळच जाऊन थडकला. नोट तिला परत देत म्हणाला, 'कांहींच पत्ता लागला नाहीं.'

शुभदा म्हणाली, 'उगीच एवढा त्रास घेतलास. नसता हेलपाटा!'

सदानंद कांहींच बोलला नाहीं.

शुभदानं पुन्हां विचारलं, 'मग ह्या पैशांचं काय करायचं?'

'तुमच्या मर्जीला येईल तें करा. पैसे तुमचे आहेत—झाली इच्छा तर वांटून टाका नाहींतर जवळ ठेऊन द्या. कधीं काळीं पत्ता लागलाच तर परत पाठवून द्या.'

निरुपाय होऊन शुभदानं ते पैसे पेटींत ठेवून टाकले.

सदानंदानं विचारलं, 'हारान काका कुठं आहेत?'

शुभदानं शेजारच्या खोलीकडं बोट दाखवून म्हटलं,

'झोपले आहेत.'

'कुठं गेले होते?'

'गेले होते—आतांच परत आले आहेत.'

त्या दिवशीं संध्याकाळीं मोठं वादळ होऊन पाऊस आला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं शुभदानें नित्य नियमाप्रमाणें स्वैपाक केला. जेऊन-खाऊन हारानबाबूंनें म्हटलं, 'थोडे पैसे तरी दे.'

'आज कुठं जाऊं नका. आकाश कसं ढगाळून गेलं आहे! रात्रीं पाऊस आला तर?'

'येऊं दे.'

'परतायला त्रास होईल.'

'नाहीं होणार. आज फार काम आहे, जावंच लागेल.'

काय काम होतं तें शुभदाला माहीत होतं.

ती म्हणाली, 'आज एकादशी आहे, वन्संची प्रकृती बरी नाहीं—बेशुद्ध पडून आहेत.'

हारानबाबूनें शुभदेचं म्हणणं मनावरच घेतलं नाही. कडोसरीला पैसे लावले आणि ठिगळं लावलेलीं पायताणं हातांत घेऊन व डोक्यावर छत्री उघडून, धोतर हातांत धरून तशा चिखला पाण्यांतून ते घराबाहेर पडले. शुभदानं एक दीर्घ श्वास सोडून म्हटलं, ‘ स्वभाव ! ’

शुभदाचा तर्क खरा ठरला. एक प्रहर रात्र होते न होते तोंच पावसाला सुरवात झाली. आजकाल शुभदाला बारिकसा ताप येत होता. परंतु ही गोष्ट तिनं दुसऱ्याला सांगितली नव्हती आणि स्वतःलाही त्याची जाणीव होऊ दिली नव्हती; रात्रीं थंडी वाजून जेव्हा तिला ताप येत असे तेव्हां तिला तापाची जाणीव होत असे.

पावसाला सुरवात होताच तिला थंडी वाजून ताप आला—हाताला जें लागल तेंच अंगावर ओढून घेतलं. बरीच रात्र उलटून गेल्यानंतर शुभदाला झोंप आली. पावसाची संतत धार हळू हळू कमी होत चालली होती. थकलेल्या शरीरानं अर्ध—जागृत अवस्थेंत हळू हळू दाराची कडी कुणीतरी काढीत आहे असा तिला भास झाला; इतक्यांत खाड्‌कन दरवाजा उघडला गेला. खोलींत दिवा मणमण करीत जळत होता. कुणी तरी एक मनुष्य खोलींत शिरलेला त्या दिव्याच्या प्रकाशांत डोळे उघडून पाहतांच तिला दिसला. त्याच्या हातात कळकीचा सोटा होता. त्याचं सगळं शरीर शाईनं माखलेलं होतं आणि मधून मधून त्यावर चुन्याचे पांढरे पांढरे पट्टे होते. शुभदाचं सारं अंग भीतीनं शहारून उठलं. तिनं ओरडून म्हटलं, ‘आई ! आई !’ ‘चुप !’ वज्र—गंभीर आवाज ऐकून भीतीनं शुभदानं आपले डोळे बन्द करून घेतले.

दोनदां ठक्—ठक् करून सोटा आपटीत तिच्या बिछान्याजवळ जाऊन म्हणाला, “ तुझ्या पेटीची किल्ली दे. ” तो आवाज घोगरा होता. तो आवाज कानीं पडतांच मुद्दाम प्रयत्न करून घोगऱ्या आवाजांत तो बोलला होता असं वाटत होतं.

शुभदा कांहीच बोलली नाहीं.

त्यानें पुन्हा घोगऱ्या आवाजांत, जमिनीवर पुन्हा सोटा आदळीत म्हटलं ‘ किल्ली दे नाहीं तर गळा दाबून प्राण घेईन. ’

मग शुभदा उठून बसली, उशीच्या खालून किल्ल्यांचा जुडगा काढून त्याच्या जवळ फेकीत हळू हळू शांतपणें म्हणाली, ‘ माझ्या पेटीच्या उजव्या खणांत पन्नास रुपयांची एक नोट आहे—तीच घे; मात्र डाव्या बाजूला कांहीं विश्वेश्वराचा प्रसाद आहे त्याला हात लावूं नकोस. ’ तिला यत्किंचितही भीती वाटत नव्हती इतक्या शांतपणें ती बोलली.

चुना—शाई फासलेल्या मनुष्यानें किल्ली घेऊन पेटी उघडली. डाव्या बाजूच्या कप्प्यांत त्यानें मुळीच हात घातला नाहीं; मात्र उजव्या बाजूच्या कप्प्यांत हात घालून त्यानं ती पन्नास रुपयांची नोट काढून आपल्या कडोस-रीला लावली. शुभदानं ज्याप्रमाणें करायला सांगितलं होतं त्याप्रमाणें करून इतक्या सफाईनं आणि सहजतेनं ती पेटी उघडून उजव्या खणाचा पत्ता त्यानें लावला कीं त्यावरून वाटतं, कीं त्या माणसाला त्या पेटीची चांगलीच माहिती होती म्हणून तो लागला. तेव्हां जेव्हां तो खोलींतून बाहेर जाऊं लागला तेव्हां एक मोठा सुस्कारा टाकून शुभदा म्हणाली, “ नोटीवर नांव लिहिलं आहे, कदाचित् नंबरही आहे—नोट मोडतांना सावधान हं ! ”

